# श्रीमद्भगवदगीता

(संस्कृत -मराठी)

सौ.मानसी वैद्य - ठाणे




अथ श्रीमद्भगवद गीता उपनिषद्सु

**अध्यात्मिक उनत्ती करताना मानवी विचारांचे व्दंव दाखविणारे काव्य**

**अनेक व्यक्ती व त्यातील व्याख्या**

**अथ**- गीतेच्या रचने आधीपासून असलेल्या ज्ञानाचा पुन:प्रचार ( दुसऱ्याचे ऋणी )

**श्री**- श्रेष्ठ,**मद**- मत, **भग**- कल्याणकारी ,**ग**- गती **वद**- सांगितलेले **गीता**- अनुष्टुभ छंद ज्यात गाणारा स्वतःस विसरून जातो असे गायलेले काव्य **सु**- श्रेष्ठज्ञान **उपनिषद** - विशाल असे ज्ञान थोडक्यात शब्दबध्द करून गुरूच्या पायाजवळ बसून ऐकलेले ज्ञान

**अथ श्रीमद्भगवद गीता उपनिषद्सु**-पूर्वापासून चालत आलेल्या श्रेष्ठ ज्ञानगती देणारे,सर्वमान्य श्रेष्ठ मत असलेले,थोडक्यात सांगितलेले व गाण्यायोग्य असे ज्ञान ज्याचा ह्याने प्रचार करणे सहज होईल

A

**अम्बा,अंबिका,अंबालिका -** अम्बा - मूळप्रकृती , अंबिका - प्रकृती , अंबालिका - पिंड (मूळप्रकृती हि सांब सदाशिव ह्यांच्या अंकित आहे बळजबरीमुळे ती स्त्रीरूप धारण करून पुरुषप्रमाणे ढाल बनते व नाश करते)

**ओक्षहिनी सेना**- अक्ष-मूळआधांर,**सातअक्ष**- पाच ज्ञानेंद्रिये,मन,बुध्दि**दहाअक्ष**- पाचज्ञानेंद्रिये व असंस्कारित अहंकारीत मन

**अधिरथ , राधा**- (रथ - शरीर ,राधा - आनंद ) कर्णावस्थेत (ऐकलेले ज्ञान) देहभावातच आनंद मिळतो जो असा आहे तो

**अर्जुन**- अर - चिरत जाणारा ( वाईट विचार चिरणारा),विरोध चिरत जाणारा,श्रेष्ठ साधक जो आपले लक्ष विचलित न करता ब्रह्म स्वरूपाकडे जातो.ह्या साधकाची उच्चावस्था,**अभिमन्यु** (देहभाव रहित) अवस्था आहे त्याचे प्रकृतीरूप उत्तरा (पत्नी) आहे त्याच्या पोटात (त्यानंतर) दुर्घट (कठीण) अशी अवस्था (परीक्षा) आहे (परिक्षित-शेवटची परिक्षा) साधक येथे भांबावतात.त्यानंतर ब्रह्मस्थिति जवळच आहे.

**अभिमन्यू**- ( अभिमान गमावणे ) कुंडलिनी चक्र (सहस्त्रात) ओलांडल्यावर साधक अभिमान गमावतो अर्थात देहाभीमानाची मृत्यु होते.

**असुर** -मायाबध्द जीव (अप्रगतीशील)

**अश्वत्थामा -**श्वासरहित अवस्था ( फक्त श्वास रहित अवस्था हि ब्रह्मस्थिति मानणारा अहंकारी).

**अनंतविजय**- साधनेत स्थिर असणाऱ्या साधकाचा नेहमीअनंताच्या विजयाकडे नेणारा पिंडशरीरातील नाद

B

**भीष्म**- सात प्रथम अवस्था ओलांडून आठवी समाधी अवस्था पण सबीज समाधी (समाधी आठ प्रकारच्या आहेत) ह्याचा निर्धार

**भगवान गोपाळश्रीकृष्ण**- (भग - कल्याण,गो - इंद्रिय,पाल - पालन,श्री - श्रेष्ठ,कर्षण - दिव्य शक्तिचे आकर्षण व धारणा) **---** सत्य असत्य ह्याचा निर्णय करणारी उच्च,संतुलित,अच्युत बुध्दि,रथाचा स्वामी आत्मा आहे (शरीर रथ) .**बुध्दि सारथी व मन लगाम** ( भगवान श्रीकृष्ण अर्थात अच्युत बुध्दि पाचही इन्द्रिय काबूत ठेवून वृत्तिच्या झगड्यात भाग न घेता (नि:शस्त्र) साधकाला मार्गदर्शक असून हि स्थिर बुध्दि साधकाला ज्या ठिकाणी जायचे आहे त्या शेवटल्या पदापर्यन्त घेऊन जाते.अशी बुध्दि हि रात्री साधना करणाऱ्यास प्राप्त होते ( श्रीकृष्ण जन्म) जी आठवी पायरी आहे.मध्यरात्री देवत्व वास असणाऱ्या अवस्थेत उच्च स्थिर बुध्दि जन्म घेते जी आनंदमय अवस्थेत इंद्रियासोबत (गोकुळ) वाढते व (व्रज-निर्धार) साधना कर्मकरण्यासाठी ( व्दिज होऊन, पालन करणारे एक व जन्म दुसऱ्याकडून ) निर्धार करते,त्यासाठी इंद्रियांना वळवून योग्य दिशेने नेते.ह्याअवस्थेत **बला अतिबला** सिध्दि प्राप्त असल्याने थोड्या आहारात क्षुधा शान्त होते जी **दुर्वास** (कठीण साधना काळात आवश्यक आहे) अवस्थेस तृप्ती देते.

**भीम**- धर्मानुसार प्राप्त प्रचंड शक्ती.(वायु,प्राणायाम व्दारा प्रचंड शक्ति),

**ब्रूहन्नडा** - तपानंतर आलेली समाधि स्थिती हि उत्तर अवस्था आहे,ज्याने साधक विरक्त अवस्था प्राप्त करतो.ज्यात तो नाचतो हि अवस्था (दक्षिण-पुर्वावस्था) उत्तर अवस्था असून उच्च-देहमय आहे हि सहज साध्य(स्त्री-देह)असे समजल्याने वाईटवृत्ती पराभूत होतात (ह्या अवस्थेत इंद्रिये अतिशय उत्तेजित होतात व बुध्दि भ्रष्टता येऊन योगी सामान्य होण्याचा धोका असतो ज्यास गो-ग्रहण असे म्हणतात) दक्षिण हि पूर्वावस्था आहे ज्यात त्रिगुणाचा प्रभाव आहे तो कमी करण्यास तेथे इतर (भीम,नकुल--) अवस्था लागतात.ज्या दु: प्रवृतींना मागे हटवतात.समाधी किवा देहत्याग हा ह्या उत्तर म्हणजे उच्च अवस्थेत करतात.

**बुध्दि**- (बुद - बुडबुडा,धी - सागर) सागरातील एक बुडबुडा जेव्हा बुध्दि-संकल्प थांबतात तेव्हा सागराशी मिलन होते.

**भुरीश्रवा**- (भूर - मधुर,चांगले,श्रवा - ऐकणे ) योग्यास एका अवस्थेत अनेक प्रकारचे नाद एकु येतात त्याच अवस्थेत अडकून राहिलेला साधक,असा पुढे न जाणारा साधक

C

**चेकितान**- (कित - रोग हरण ) - निरोगी शरीर असणारा

D

**द्रोणाचार्य**- अध्यात्मिक साधनेत उन्नत (द्रोण - कुंडलिनी स्थान) आकाशमार्ग स्थितीत संकल्प ढळल्यामुळे सुंदर अशा शरीरात स्थित,अविद्या ज्ञानात तरबेज

**धृतराष्ट्र** -- (धृत = धारण करणारा राष्ट्र = पिंडशरीर ) शरीर धारण करणारे जीव जन्मतः आपल्या अध्यात्मिक (शक्ती) उनतीबद्दल अंधारात (आंधळे) असतात.

**धृष्टधुम**- (धुं - वायु ,न - अवस्था) वायु अवस्था प्राप्त जी अग्निअवस्थेनंतर येते.

**धृष्टकेतू -**(धृष्ट - धारणा, केतु - घोडा,श्र्वास) श्र्वासरहित अवस्था धारण केलेला

**धर्म**- पिंडधर्म (पिंडधर्मानुसार साधना करणारा साधक)

**द्युलोक**- वायुची आकाशतत्वामुळे भयंकर गती असते,त्याच्या अनुभवास धुम्रवर्ण कारण आहे, म्हणून**द्यु**लोक असे म्हणतात

**द्युत**- वाईट प्रवृतीशी केलेली स्पर्धा ( चागल्या प्रवृतींची हार)

**द्रौपदी**- द्रुत गतीने पंचप्राणाच्या साह्याने प्रगती करणारी वृत्तीकाया

**दु:**- वाईट प्रवृत्ती ज्या चागल्या प्रवृतीना नष्ट करतात.

**दु:शल्ला**- छिनाल

**देवकी वासुदेव**- देव अवस्थेचा वास असणारी

**दुंदुभी** - डमडम आवाज

**देवदत्त धनंजय**- धनंजय नाडीवर (हृदयाकडून मेंदूकडे जाणारी नाडी) प्रभुत्व मिळवून देवरूप अवस्थेतील साधकाचा पिंडदेहातील नाद (देवदत्त शंख)

G

**गंगा -** ज्ञानगंगा

**गो -**गायी प्रमाणे इंद्रिये जी वेगाने प्रगती पथाकडे नेतील

**गणेश**- (व्यासांनी श्रीगणेशांना त्याचे लिखाण करावयास सांगितले.) भगवान व्यास रचीत गीता महान बुध्दिमंताना विचाराने कळेल व जे सांगणाऱ्याची पाठराखण करतात.हे तेजाचे रूप असून साधक तेजाच्या अवस्थेत वि**द्यु**त गतीने ज्ञान मिळवतो म्हणून शेंदूर रंग.हया अवस्थेत ॐकाराचा नाद होतो व हि अवस्था गंभीर आहे.

**गोपगोपी -** अनेक इतर अवस्था ज्या समाधी बरोबर नांदतात,

**गदा**- (गद - प्रहार) (गदायुध्द- वकृत्वयुध्द) युध्दात वाईट प्रवृत्तीच्या (ऊर-जंघा-भावना) वर्मावर हल्ला करूनच पराभव करता येतो.

**गोकुळ**- इंद्रियधारी शरीर

**गांधारी** - (गन्ध - ज्ञान,अरि - शत्रू) बुध्दिमान जीवांची एक अवस्था ज्यात ज्ञानी असून आंधळेपणाने अनुकरण करणे,ज्यामुळे जीव अज्ञानांच्या संगतीत अजुनच घोर अंधाराकडे जातो.(ज्ञानाशी शत्रुत्व)

I

**इंद्र** - जीवात्मा,सुबुध्दि असणाऱ्या देहवृतींचा (दहा गाव - दहा इंद्रियांचा राजा - जीवात्मा )राजा जो एक अवस्था ओलांडून दुसऱ्या अवस्थेत जातो.अर्थात दहा बांध ओलांडून शरीररुपी शेतीची मशागत करतो.

J

**जीवात्मा**-योगी पुर्ण समाधी (जवळ जवळ मृत्यु) अवस्थेतून परत येतो तेव्हा परत येतो तरी पिंडप्रकृती नेहमी प्रमाणेच कार्य करते हे जो घडवतो तोच आत्मा किंवा जीवात्मा

**जयद्रथ** -(जय - विजय,रथ - शरीर) श्र्वासरहित अवस्था प्राप्तीचा साधकाचा अहंकार ज्याने पुढिल अवस्था अर्थात देहभावरहित अभिमन्यू अवस्थेस लाथाडणे,साधारण संसारिक प्रवृतीशी संग असणाऱ्या छिनाल वृत्तिमुळे असे होणे.

जनार्दन - इंद्रियांचे अर्दन-मर्दन करणारा

K

**काशीराज**- (काश - अच्छादन ) आकाशाचे अच्छादन म्हणजे ओमकार

**कौन्तेय** - (कुन्त - चिरणे,भाला) जो कुरुक्षेत्ररुपी (कर्मक्षेत्र) शेतीची तीक्ष्णकर्माने मशागत करतो. ( शरीर - क्षेत्र,कौन्तेय - क्षेत्रज्ञ )

**कुरुक्षेत्र**- कर्मक्षेत्र

**कुन्तीभोज**- ( कुन्त - चिरणे,भोज - अवस्थेत असणारा ) सर्व लहान अवस्था चिरून परा अवस्थेत असणारा

**कंस** - (कसं- कापणे) चागल्या वृत्ति ना बाधक किवा साधना मार्गास अडथळा आणून नाश करणाऱ्या-आणणाऱ्या अवस्था-वृत्ती ह्या वृत्ति सहा अवस्थांचा नाश करतात (यम नियम इत्यादी) सातवी अवस्था धारणा हि स्त्रीरूप असून तिचा नाश होत नाही

**किचक**- (कीच-वाईटवृत्ती) रंध्र मोकळे झाल्यावर साधना फळस्वरूप मिळालेल्या शक्तींचा भोग घेण्यासाठी उपयोग करणारी वृत्ती,जिचा विरक्त (बृहन्नडा) अवस्था नाश करते.

**कंक**- ब्राह्मण (१२ वर्षे तपानंतर) **वल्लभ**- संन्यास ग्रहणानंतर प्राप्त विविध क्रिया करणारे ज्ञान

**कुंती** - (कुंत - तीक्ष्ण) तीक्ष्णपणे साधना करणारी प्रवृती **कुमारी**- अपरिपक्व अवस्था ज्यात ऐकिव ज्ञानाच्या बळावर (दु:र्वास - कठीण काळाचे ज्ञान) कठीण साधनेचे ज्ञान मिळाल्यासारखे वाटणे ( कर्ण - कानाने ऐकलेले ज्ञान)

**कर्ण**- कानाने ऐकले ज्ञान फक्त ऐकिव ज्ञान असलेले दुप्रवृतीकडे झुकतात (देहबुध्दिकडे झुकतात)

**कवच कुंडले**- देहभाव,ज्याचे ब्रह्मवृत्तीत केलेले दान ( त्याचा त्याग)

**कृप**- आपल्या ज्ञानाचा उपयोग न करता केवल क्रोध व भांडणासाठी उपयोग करणारा साधक (कृप-कृपण)

M

**माद्र**- अद्र - साधनेची जडावस्था,ती उलंघून रोगरहित अवस्था प्राप्त करणारा साधक

**मिथिला - (मित्थ्या- मायावी) माया**

**मणिपुष्प** -चन्द्रमा दर्शन झालेल्या साधकाचा पिंडनाद (सह देव) ज्याचे बरोबर देवस्वरूप आहे.

**मत्स्यगंधा**- ज्ञानगंध असलेली जी परातत्वापर्यन्त गेलेल्या साधकाची (पराशर) सुश्रुषा करते अश्या ज्ञान गंगेवर परा अवस्थेपर्यन्त गेलेला साधक मोहित होऊन (मध्यमार्गात ज्ञानसूर्य मध्यानी असताना) साधना भोग करण्याची इच्छा करतो पण हि सात चक्ररूप कुंडली विकसित नसते म्हणून तिला १६ कलांनी युक्त करून (परिपक्व) साधना भोग योग्य होतो अश्या स्थितीत **व्यास** अर्थात विशाल-खोलवर विंचार करू शकणारी बुध्दिचि अवस्था प्राप्त होते.

मधुसूदन - चांगल्या वाटणाऱ्या पण उन्नतीस घातक विचारांचा नाश करणारा

N

**नियोग**- शरीरभावाच्या वर राहण्याची वृत्ती ( देहबुध्दिच्यावर)

**निरोध** - कुशलपणे वृत्तीना संस्कारवश करणे.

**नकुल** - सर्प मारणारा / भक्षक ( साधक जो कुंडलिनी (सर्प) पूर्ण अवस्थेत गेल्यावर त्यापुढील अवस्थेत जातो,कुंडलिनीच्या मार्गात राहत नाही)
**अश्व पारखी**- (अ - विरहित श्व- प्राण) जो सर्वोच्च अवस्था जाणतो

**नरकासुर**- (असुर - ज्ञान विरोधी) जो शरीरस्थित १६००० साधना न केलेल्या नाड्यानी कुमार्गाने आचरण करून अधोगतीस जातो त्यास ज्ञान साधना रूप पत्नीसह स्थिर बुध्दिरूप श्रीकृष्ण मध्यरात्री (रात्रीच्या अध्यात्मिक साधना करतात तेव्हा) मारतो.

**नंद यशोदा**- आनंदमय स्थिति,यश देणारी अवस्था

दिवसरात्र - साधारण माणसासाठी संसारिक गोष्टी दिवस पण त्या नसणे हा योग्याचा दिवस

P

**पुरूजित**- (पुर - गाव,पिंडशरीर,पुरातन ) पिंडशरीर जिंकणारा

**पंडू**- पाच ज्ञानेद्रिये,पाच वायु **पंड** = ज्ञान **ऊ**- अंतिम अवस्था,साधक जो ब्रह्मचर्य पाळणारा (नपुंसक) ज्ञानी साधक जो व्यावहारिक लाभापासून दूर असतो त्यास लोक नपुंसक किंवा षंढ समजतात,

**पांचाल**- पंचप्राण शरीर

**पांचाली**- ( पंत्र्च + अली ) पंचतत्व ह्याचा पंचप्राणाशी झालेला संयोग,जो साधकास वेगाने ब्रह्मरूपाकडे नेतो

**पांचजन्य**- भगवान श्रीकृष्णाच्या शरीराचा नाद (पूर्णावस्थेतील नाद)

**पौण्ड्र**- (पौण्ड्र - महाबलशाली ,वृकोदर - सर्वभक्षक) भीम अवस्थेतील साधकाच्या पिंडशरीरातील नाद

**पराशर**- परा अवस्थेपर्यन गेलेंला साधक

पाप - प - पतन अप - प्राप्त

R

**राधा**- धारा उलट झालेली ( साधनेने कुंडलिनी उलट दिशेने जाते) जन्मतः असणाऱ्या प्रवाहा विरुध्द

S

संयाति - यात - यात्रा करणे , सम-याती - एक-दुसऱ्याच्या साह्याने

सुर - उन्नतीकडे नेणारी वृत्ती

सांख्य - प्रस्थापित तत्वज्ञान,संख्येवर आधारित

**शुन्य**-काहीतरी असल्याच्या प्रकृतीतील भास- मुळमाया

**सांब**- महादेव

**शंतनू**- (शं- कल्याणकारी , तनु - शरीर ) कल्याणकारी अध्यात्मिक पिंड

**सत्यभामा**- ज्ञान साधना

**सुभद्रा**- एक वर्षाच्या संन्यस्थ अवस्थेनंतर येणारी सुअवस्था जी साधनेसाठी योग्य आहे.

**सहदेव** - देव अवस्था जी नकुल अवस्थेच्यापेक्षा लहान, देवपण व कुंडलिनी जागृत झाल्यावर सुंदरपण वाढवणारी (कुंडलिनी जागृत झाल्यावर साधक सुंदर होतो असे म्हणतात)

**स्वर्गारोहण**- कुंडलिनी मार्गास स्वर्गमार्ग असे म्हणतात,ह्यात वरच्या स्तरावर प्रथम वृत्तीकाया (द्रौपदी) व नन्तर (चारही इतर वृत्ती - पांडव ) इतर गोष्टी नाश पावतात,फक्त एक स्थिर अवस्था शेवटपर्यंत पुढे जाते.

**स्वर्ग** - कुंडलिनी मार्ग (सु- शुभ,अर - गती)

**सैरंध्र**- (रंध्र - छिद्र) योगनाड्या उघडल्यावर - मोकळ्या झाल्यावर मिळणारी गतीमान सेवा,

**संमोहन**- पूर्ववृत्तीचे विस्मरण.

**सुदर्शन चक्र**- (सु-चांगले,दर्शन - जीवनदर्शन) जो पर्यन्त साधकाची देहभावना आहे तो पर्यन्त ते सव्य गतीत आहे जेव्हा समाधी स्थिति येते तेव्हा देहभाव नाहिसा होतो व ते अपसव्य गतीने वेगाने फिरते अश्या स्थितीत जयद्रथ अवस्थेचा वाईट प्रवृत्ती चिरत जाणारा साधक नाश करतो

**शिखंडी** - कुंडलिनी जागृत अवस्था जि स्त्रीलिंगी आहे व समाधी पुरुषलिंगी आहे.सबीज समाधी (भीष्म) शिखंडी अवथेच्या साह्याने (वेगाने प्रगती करणारा साधक) ओलांडतो (नाश करतो) हि अवस्था पूर्ण ३६ गुण नाहीसे झाल्यावर वेगाने प्रगती करणारा साधक प्राप्त करतो व निर्विकल्प समाधीत जातो. ( ७ चक्राच्या १४ विद्या- वर जाणे व खाली येणे आहेत )

**सात्यकी**- सर्व कर्म ईश्र्वरास अर्पण करणाऱ्या श्रेष्ठ साधकाची अवस्था

**सोमदत्त**- (सोम - चन्द्र,दत्त - देणारी) साधकास चन्द्रदर्शन देणारी अवस्था

**शंख** - साधकाच्या अवस्थेनुसार पिंडशरीराचा नाद

**सुघोष**- कुंडलिनी शान्त झालेल्या साधकाचा पिंडनाद (न - कुल - यमनियमरहित नकुल)

**संजय**- जय-पराजय समान मानणारी स्थितप्रज्ञ अवस्था

T

तत्व - (तत् - परमअवस्था,त्व - प्राप्त करणे)

U

**उर्वशी**- उर+वशी  महान साधकास वश करणारी माया

**उत्तमौजा**- (उत- वर,तम - अतिश्रेष्ठ,ओज - उत्क्रांत) उत्क्रतीच्या अतिश्रेष्ठ अवस्थेत असलेला

**युयुधान,सात्यकी**- सत्य-आत्मा, युयु- युध्द सत्यप्राप्तीसाठी केलेले युध्द-साधना.

**युधामन्यु** - (युध - संघर्ष ) वाईट प्रवृतीचा राग येऊन संघर्ष करणारा

**युधिष्ठिर**- युध्दात ( अंर्तयुध्दात स्थिर) स्थिर बुध्दि असणारा.(यमनियमांनी स्थिर मिळालेली बुध्दि)

**उत्तरगोग्रहण**- समाधी अवस्थेजवळ परत (साधनेच्या १३ व्या वर्षी ) वाईटप्रवृती जोरदार हल्ला करतात ज्यास विरक्त अवस्था (बृहन्नडा) हेच सामर्थ्य परतवून लावते.

V

**व्यास-** (जीवन वर्तुळ) शून्य अर्थात गोलाच्या सर्वात मोठ्या (विशाल) अंतरावरून विचार करणारी बुध्दिमत्ता

**विराट**- जीवात्म्याचे विशाल स्वरूप

**विकर्ण** -वाईट गोष्टीचे कर्णाने (ऐकून) ज्ञान असणारा - व तसेच वर्तन असणारा

Y

**यज्ञ** - प्रयत्न ज्यात साधनेनंतर काही शिल्लक राहात नाही.

**यमुना**- यम + उना ( यम - यमनियम , उना - शून्य अवस्था ) यमनियमांच्या पलीकडील अवस्था काळरहित अवस्था **कालिंदी-यमुना**

**यादव सेना**-(अद - खाद्य) म्हणजे नष्ट होणारे सैन्य (शरीर) जे दुर्योधनाने मागितले.

युधामन्यु - (युद्ध - युद्ध,संघर्ष, मन्यु - क्रोध) - असद वृत्तींवर क्रोध येणारा

युयुधान सात्यकी - (युयु - युद्ध , सात् - सत्य,आत्ना ) सत्यासाठी (आत्मप्राप्तीसाठी) युद्ध करणारा

**वनवास**- १२ वर्षे साधना,१ वर्ष साधना शक्ती गुप्त ठेवणे व दुरुपयोग टाळणे

## अनुक्रमणीका



# श्रीमदभगवदगीता अध्याय पहिला

# “अर्जुनविषादयोग”

**सर्व साधारण साधक हा सामाजीक प्रवाहाने बांधलेला असतो,समाज हा संसारिक विषयांनी व तत्वज्ञानाने भरलेला आहे,तो प्रवाह कापून आत्मउद्धारासाठी साधकास निवृत्त मार्गाकडेपुढे जाण्यास मनाची अस्वस्थता येते.**

धृतराष्ट्र उवाच

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।

मामकाः पाण्ड़वाश्र्चैव किमकुर्वत संजय ।।१।।

धृतराष्ट्र उवाच

धर्मक्षेत्रे,कुरुक्षेत्रे,समवेताः,युयुत्सवः ।

मामकाः,पाण्ड़वाश्र्चैव,किमकुर्वत,संजय ।।१।।

धृतराष्ट्र - साधनामार्गात प्रगती न करणारा,त्याचे ज्ञान नसलेला म्हणजे अंध साधक,संजय- जय पराजय सारखे मानणारी स्थितप्रज्ञ स्थिति.

धर्मक्षेत्र - जीवात्म्याने पुर्वसुकृतात धारण-ग्राह्य संस्कार, कुरुक्षेत्र - या जन्मी त्यास प्राप्त झालेले शरीर,ह्याचे उत्क्रांती मार्गातील व्दंव्द

धर्म - पिंड धर्मानुसार ग्रहण योग्य संस्कार

कुरुक्षेत्र - पिंड धर्मानुसार उत्क्रांतीसाठी कार्य करणे (कुरु - करणे,कार्य)

धर्मक्षेत्र- कुरुक्षेत्र --- पूर्व ग्रहण संस्कार व उत्क्रांतीसाठी कर्म अर्थात वृत्ती कर्म जे ग्रहण करता येतील त्या क्षेत्री (पिंड व जीवात्म्याचे पूर्व संस्कार ह्यांनी बनलेल्या पिंडशरीरात)

धृतराष्ट्ररुपी अंध साधक विचारता झाला-विचार करू लागलात्या अंध साधकाने स्थितप्रज्ञ अवस्थेत (-असलेल्यास) प्रश्न विचारला? धर्मक्षेत्र व कुरुक्षेत्र ह्यात एकत्रित प्रवृत्ती युध्दासाठी जमलेल्या असताना माझ्या पुत्रांनी ( अंध साधकाच्या शंभर कुप्रवृत्ती व पाच (पंड - ज्ञान,उत्क्रांतीकडे जाणारे) सुप्रवृत्ती) ह्यांनी काय केले?

धृतराष्ट्र म्हणाले - हे संजय ! धर्मभूमि कुरुक्षेत्रात एकत्रित,युध्दाची इच्छा असणाऱ्या माझ्या व पांडूच्या पुत्रांनी काय केले ?

दृष्टा तु पाण्ड़वानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।

आचार्यमूपसगड़म्य राजा वचनमब्रवीत ।।२।।

दृव्ष्टा,तु, पाण्ड़वानीकम्,व्यूढम्,दुर्योधन:,स्तदा ।

आचार्यम्,उपसगम्य,राजा,वचनम्,अब्रवीत् ।।२।।

दुर्योधन - अहंकार,द्रोण - दोन भागांवर असलेली कुंडलिनी जी अध होऊन मूलाधारात स्थित आहेद्रोणाचार्य - अवि**द्या**जाणणारे,कर्मकांडात गुंतलेले साधक.

दुर्योधन (अहंकार) पांडव (उत्क्रांतीकडे जाणारी धर्मस्थित,ज्ञानेंद्रिय शक्ति ) सेनेची व्यूह रचना पाहून (अवि**द्या** जाणणाऱ्यास) द्रोणाचार्यांस सांगू लागला.

संजय म्हणाले,त्यावेळी राजा दुर्योधनाने व्यूहरचनायुक्त पांडवांची सेना बघून व द्रोणाचार्यांकडे जाऊन हे सांगितले.कि--

पश्यैतां पाण्ड़ुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।

व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ।।३।।

पश्य,एताम्,पाण्ड़ुपुत्राणाम्,आचार्य,महतीम्,चमूम् ।

व्यूढाम्,द्रुपदपुत्रेण,तव,शिष्येण,धीमता ।।३।।)

कुबुध्दि व पूर्वसुकृत साधकाच्या बाल्यावस्थेपासून एकत्र (ज्ञान व अवि**द्या** ज्ञान) असलेल्या ठिकाणी वाढतात)(**धृष्टधुम**-(धुं - वायु ,न - अवस्था) वायु अवस्था प्राप्त जी अग्निअवस्थेनंतर येते.द्रु- गती, हे आचार्य वायुसाधना करून उच्चावस्था प्राप्त केलेल्या व वेगाने प्रगती करणाऱ्या आपल्या शिष्याने केलेल्या सैन्याची व्यूहरचना पहा.

हे आचार्य ! आपल्या बुध्दीमान शिष्य द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नव्दांरा व्युहाकारउभी केलेल्या पांडूपुत्रांच्या ह्या मोठ्या सेनेस पहा.

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।

युयुधानो विराटश्र्च द्रुपदश्र्च महारथ: ।।४।।

अत्र,शूरा:,महेष्वासा:,भीमार्जुनसमा:,युधि ।

युयुधान:,विराट:,च,द्रुपद:,च,महारथ: ।।४।।)

भीम - सुविचारी निर्धारशक्ती,विराट-द्रुपद -(विश्र्वरूप विराट,द्रू - वेगाने,पद -स्थिती) विश्र्वरूप विराटाकडे वेगाने जाणारी अवस्था

धृष्टकेतुश्र्चेकितान: काशिराजश्र्च वीर्यवान् ।

पुरूजित्कुन्तिभोजश्र्च शैब्यश्र्च नरपुग्ङव: ।।५।।

धृष्टकेतु,चेकितान:,काशिराज:,च,वीर्यवान् ।

पुरूजित्,कुन्तिभोज:,क,शैब्य:,क,नरपुग्ङव: ।।५।।

**धृष्टकेतु,चेकितान** – (केतु - घोडा,वेगवान साधना करणारा,कित - रोग हरण करणे,ज्यांची साधना वेगवान आहे व ज्यांचे शरीर निरोगी आहे **काशीराज**- (कश-व्याप्त)(मूळप्रकृती,शरीर व साधना ह्यांना) साधनेस योग्य शरीर व्याप्त करणारे **पु -** अनेक (पुरुजित - अनेकांवर विजय),कुंतीभोज - (कुंत - भाला,तीक्ष्ण ,भोज - भोजन) साधनामार्गातील अडचणी तीक्ष्ण मार्गाने दूर करणारा,

युधामन्युश्र्च विक्रान्त उत्तमौजाश्र्च वीर्यवान् ।

सौभद्रो द्रौपदेयाश्र्च सर्व एव महारथा: ।।६।।

युधामन्यु:.क,विक्रान्त,उत्तमौजा:,वीर्यवान ।

सौभद्र:,द्रौपदेया,क,सर्व,एव,महारथा: ।।६।।

युधामन्यु - (मन्य - क्रोध,अभिमान) वृत्तीयुध्दात सात्विक क्रोध उत्पन्न झालेला,विक्रांत - वृत्तीयुध्दात उत्क्रांती करणारा, उत्तमौजा - उत्तम गुण धारण करणारा (साधनेतून सिध्द शक्ती धारण करणारा) सौभद्र - (सु - चांगला,भद्र - कल्याणकारी) षोडशकलायुक्त अभिमन्यू (तरुण)

ह्या सेनेत मोठे-मोठे धनुष्य असणारे तसेच युध्दात भीम व अर्जुनासारखे समान शूरवीर सात्यकी व विराट तसेच महारथी राजा द्रुपद,धृष्टकेतु व चेकितान तसेच बलवान काशिराज,पुरुजित,कुंतिभोज व मनुष्यांत श्रेष्ठ शैब्य,पराक्रमी युधामन्यु तसेच बलवान उत्तमौजा,सुभद्रापुत्र अभिमन्यु तसेच द्रौपदीचे पाचही पुत्र असे सर्व महारथी आहेत.

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध व्दिजोत्तम ।

नायका मम सैन्यस्य सञ्ज्ञार्थ तान् ब्रवीमि ते ।।७।।

अस्माकम्,तु,विशिष्टा:,ये,तान्,निबोध,व्दिजोत्तमा ।

नायका:,मम,सैन्यस्य,संञ्ज्ञार्थ,तान्,ब्रवीमि,ते ।।७।।

हे ब्राहमण श्रेष्ठ ! आपल्या पक्षात सुध्दा जे प्रधान आहेत,त्यांना सुध्दा आपण पहा,आपल्या माहितीसाठी माझ्या सेनेत असलेले जे सेनापती आहेत,ते कोण कोण आहेत ते सांगतो.

भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जय: ।

अश्र्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ।।८।।

भवान्,भीष्म:,क,कर्ण:,च,कृप:,च,समितिञ्जय: ।

अश्र्वत्थामा,विकर्ण:,च,सौमदत्ति:,तथा,एव,च ।।८।।)

सौमदत्ति - (सोम - चंद्र) भूरिश्रवा - ( भूरि - उत्तम ,श्रवा - ऐकणे) साधनेतील उत्तम नाद ऐकण्याची अवस्था,त्या अवस्थेतच आनंद मानणारा

अश्र्वत्थामा- शुन्यावस्थाच अंतिम समजणारा

कर्ण - ऐकीव ज्ञान

आपण - द्रोणाचार्य व पितामह भीष्म तसेच कर्ण व संग्रामविजयी कृपाचार्य तसेच अश्वत्थामा,विकर्ण व सोमदत्ताचा पुत्र भूरीश्रवा.

अन्ये च बहव: शूरा मदर्थे त्यक्तजीविता: ।

नानाशस्त्रप्रहरणा: सर्वे युध्दविशारदा: ।।९।।

अन्ये,च,बहव:,शूरा:,मदर्थे,त्यक्तजीविता: ।

नानाशस्त्रप्रहरणा:,सर्वे,युध्दविशारदा: ।।९।।

तसेच माझ्यासाठी जीवनाच्या आशेचा त्याग करणारे बरेचसे शूरवीर अनेक प्रकारच्या शस्त्रांनी सुसज्जित व सर्वच्या सर्व युध्दात चतुर आहेत.

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।

पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ।।१०।।

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।

अपर्याप्तस्,तत्,अस्माकम्,बलम्,भीमाभिरक्षितम् ।।१०।।

भीष्मपितामहव्दांरा रक्षण केलेली आपली हि सेना सर्व प्रकारांनी अजेय आहे व भीमाव्दांरा रक्षित हि सेना जिंकण्यासाठी उत्तम आहे.

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिता: ।

भिष्ममेवाभिरक्षन्तु भवन्त: सर्व एव हि ।।११।।

अयनुषु,च,सर्वेषु,यथाभागम्,अवस्थिता: ।

भिष्मम्,एव,अभिरक्षन्तु,भवन्त:,सर्व,एव,हि ।।११।।

हयासाठी सर्व मुख्य जागी आपल्या-आपल्या ठिकाणी स्थित असलेल्या तुम्ही सर्व नि:संदेहपणे भीष्मपितामह हयांचेच रक्षण करावे.

तस्य सत्र्जनयन् हर्षं कुरुवृध्द: पितामह: ।

सिंहनादं विनद्योच्चै: शख्ङं दध्मौ प्रतापवान् ।।१२।।

तस्य,सत्र्जनयन्,हर्षम्,कुरुवृध्द:,पितामह: ।

सिंहनादम्,विनद्य,उच्चै:,शख्ङं,वध्मौ,प्रतापवान् ।।१२।।

शंख - योग्याचे शरीर,सिंह - हिंसक वृत्ती

कोरवांत वृध्द अश्या महाप्रतापी भीष्म हयांनी दुर्योधनाच्या हृदयात आनंद उत्पन्न करत उच्च-स्वरात सिंहाच्या डरकाळी समान गरजणारा शंख वाजवला.

तत: शख्ङश्च भेर्यश्च पणवानकगोमुखा: ।

सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमूलोऽभवत् ।।१३।।

तत:,शख्ङख,भेयं,च,पणवानकगोमूखा: ।

सहसा,एव्,अभ्यहन्यन्त,स:,शब्द:,तुमूल:,अभवत् ।।१३।।

त्यानंतर शंख व नगारे तसेच ढोल,मृदंग व नरसिंघे वगैरे एकाच वेळी वाजू लागले,त्यांचा तो शब्द मोठा भयंकर होता.

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।

माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ।।१४।।

ततः,स्वेतैः,हयै,मुक्ते,महति,स्यन्दने,स्थितो ।

माधवः,पाण्डवाः,च,एव,दिव्यौ,शङ्खौ,प्रदध्मतुः ।।१४।।

त्यानंतर सफेद घोडयांनी युक्त उत्तम रथात बसलेल्या श्रीकृष्ण महाराज व अर्जुन ह्यांनी सुध्दा अलौकिक शंख वाजविले.

पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः ।

पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ।।१५।।

पाञ्चजन्यम्,हृषीकेशः,देवदत्तम्,धनञ्जयः ।

पौण्ड्रम्,दध्मौ,महाशङ्खम्,भीमकर्मा,वृकोदरः ।।१५।।

श्रीकृष्ण महाराजांनी पांच्यजन्यनामक,अर्जुनाने देवदत्तनामक व भयानक कर्म करणाऱ्या भीमसेनांने(भीमाने)पौण्ड्रनामक महाशंख वाजविला.

आनंतविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः।

नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ।।१६।।

अनंतविजयम्,राजा,कुन्तीपुत्रः,युधिष्ठिरः ।

नकुलः,सहदेवश्च,सुघोषमणिपुष्पकौ ।।१६।।

कुंतिपुत्र राजा युधिष्ठिर ह्याने अनन्तविजयनामक व नकुल व सहदेव ह्यांनी सुघोष व मणीपुष्पक नावाचा शंख वाजविला.

काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।

धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ।।१७।।

काश्य:,च,परमेष्वास:,शिखण्ड़ी,च,महारथ: ।

धृष्टद्युम्नो,विराट:,च,सात्यकि:,च,अपराजित: ।।१७।।

द्रुपदो द्रौपदेयाश्र्च सर्वश: पृथ्विवीपते ।

सौभद्रश्र्च महाबाहु: शख्ड़ान्दध्मु: पृथक् पृथक् ।।१८।।

द्रुपद:,द्रौपदेया:,च,सर्वश:,पृथ्विवीपते ।

सौभद्र:,च,महाबाहु:,शख्ड़ान्,दध्मु:,पृथक्,पृथक् ।।१८।।

श्रेष्ठ धनुष्य असणाऱ्या काशीराज व महारथी शिखण्डी तसेच धृष्टद्युम्न तसेच राजा विराट व अजेय सात्यकी,राजा द्रुपद तसेच द्रौपदीचे पाँच पुत्र व मोठ्या भुजा असलेल्या सुभद्रापुत्र अभिमन्यु-ह्या सर्वांनी,हे राजन ! सर्व बाजूंनी अलग अलग शंख वाजविले.

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।

नभश्र्च पृथिर्वी चैव तुमुलो व्यनुनादयन् ।।१९।।

स,घोष:,धार्तराष्ट्राणांम्,हृदयानि,व्यदारयत् ।

नभ:,च,पृथिविम,च,एव,तुमुल:,व्यनुनादयन् ।।१९।।

तसेच त्या भयानक शब्दाने आकाश व पृथ्वी व्यापून धृतराष्ट्र अर्थात आपल्या पक्षातील लोकांचे हृदय विदिर्ण केले.

अथ व्यवस्थितान्दृव्ष्टा धार्तराष्ट्रान् कपिध्वज: ।

प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्ड़व: ।।२०।।

अथ,व्यवस्थित:,दृष्टा,धार्तराष्ट्रान्,कपिध्वज: ।

प्रवृत्ते,शस्त्रसंम्पाते,धनु:,उयम्य,पाण्ड़व: ।।२०।।

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ।।२१।।

हृषीकेशम्,तदा,वाक्यम्,इमम्,महीपते ।

सेनयो:,उभयो:,मध्ये,रथम्,स्थापय,अच्युत ।।२१।।

हृषीकेश - इंद्रियांवर संयम असणारा ,अच्युत - कोठल्याही बाजूस वृत्ती न जाऊ देणारा,स्थिर समबुध्दी

हे राजन ! ह्यानंतर कपिध्वज अर्जुनाने व्यूह करून सज्ज असलेल्या-संबंन्धियांना पाहून,शस्त्र चालवायच्या तयारीने धनुष्य उचलित हृषीकेश श्रीकृष्ण महाराजांना हे वचन सांगितले कि - हे अच्युत ! माझ्या रथाला दोन्ही सैन्याच्या मध्ये उभे करावे.

यावदेतान्निरीक्षेऽहं योध्दुकामानवस्थितान् ।

कैर्मया सह योध्दव्यमस्मिन्नरणसमुद्यमे ।।२२।।

यावत्,एतान्,निरीक्षे,अहम्,योध्दकामान्,अवस्थितान् ।

कै,मया,सह,योध्दव्यम्,अस्मिन्न,रणसमुद्ययमे ।।२२।।

व जोपर्यंत मी युध्द क्षेत्रात युध्दाच्या इच्छेने तयारीत असलेल्या ह्या विपक्षी योध्दयांना,युध्दरुप व्यापारात मला कोणा-कोणाशी युध्द करावयाचे आहे,ते निरखून पाहात नाही तोपर्यंत रथ मधोमध उभा ठेवावा.

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागता: ।

धार्तराष्ट्रस्य दुर्बुध्देर्युध्दे प्रियचिकीर्षव: ।।२३।।

योत्स्यमानान्,अवेक्षे,अहम्,ये,एते,अत्र,समागता: ।

धार्तराष्ट्रस्य,दुर्बुध्दे,युध्दे,प्रियचिकीर्षव: ।।२३।।

दुर्बुध्दी दुर्योधनाचे युध्दात हित पाहणारे जे जे राजा लोक ह्या सेनेत आले आहेत,त्या युध्द करणाऱ्यांना मी पहातो.

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।

सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ।।२४।।

एवम,उक्त:,हृषीकेश:,गुडाकेशेन,भारत ।

सेनयो,उभयो,मध्ये,स्थापयित्वा,रथोत्तमम् ।।२४।।

गुडाकेश - आळस निद्रा जिंकणारा

भीष्मद्रोणप्रमुखत: सर्वेषां च महीक्षिताम् ।

उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरुनिति ।।२५।।

भीष्मद्रोणप्रमुखत: सर्वेषां च महीक्षिताम् ।

उवाच,पार्थ,पश्य,एतान्,समवेतान्,कुरुन्,इति ।।२५।।

संजय म्हणाले -हे धृतराष्ट्र ! अर्जुनव्दांरा ह्याप्रकारे सांगितल्याप्रमाणे महाराज श्रीकृष्णांनी दोन्ही सैन्याच्या मध्ये भीष्म व द्रोणाचार्य ह्यांच्या समोर तसेच संपूर्ण राजांसमोर उत्तम प्रकारे रथास उभे करून अशाप्रकारे सांगितले कि - हे पार्थ युध्दासाठी एकत्रित झालेल्या ह्या कौरवसेनेस पहा.

तत्रापश्यत्स्थितान् पार्थ: पितृनथ पितामहान् ।

आचार्यान्मातुलान्भ्रातृन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ।

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।।२६।।

तत्र,अपश्यत्,स्थितान्,पार्थ:,पितृन्,अथ,पितामहान् ।

आचार्यान्,मातुलान,भ्रातृन्,पुत्रान्,पौत्रान,सखींन् ।।२६।।

ह्यानंतर पृथापुत्र अर्जुनाने त्या दोन्ही सेनेत स्थित काका-चुलतभाऊ,आजोबा-पणजोबा,गुरु,मामा,भाऊ व त्यांचे पुत्र व त्यापुत्रांचे पुत्र तसेच मित्र,सासरे व सहृदय ह्यासर्वांना पाहिले.

तान्समीक्ष्य स कौन्तेय: सर्वानबन्धूनवस्थितान् ।

कृपया परायाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।।२७।।

तान्,समीक्ष्य,स:,कौन्तेय:,सर्वान्,बन्धून्,अवस्थितान् ।

कृपया,पराया,आविष्टो,विषीदन्,इदम्,अब्रवीत्।।२७।।

त्या उपस्थित सर्व बंधूंना पाहून तो कुन्तीपुत्र अर्जुन अत्यंत करुणेने युक्त होऊन शोक करत असे म्हणाला-

दृव्ष्टेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ।।२८।।

दृव्ष्टा,इमम्,स्वजनम्,कृष्ण,युयुत्सुम्,समुपस्थितम् ||२८||)

सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति |

वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ||२९||

सीदन्ति,मम,गात्राणि,मुखम्,च,परिशुष्यति |

वेपथु:,च,शरीरे,मे,रोमहर्ष:,च,जायते ||२९||

अर्जुन म्हणाले- हे कृष्ण ! युध्द क्षेत्रात जमलेल्या युध्दाच्या अभिलाषी ह्या स्वजनसमुदायास पाहून माझे अंग शिथिल झाले आहे,तोंडाला कोरड पडली आहे,तसेच माझे शरीर कंप पावत आहे,अंगावर रोमांच उभे राहिले आहेत.

गाण्डीवं स्त्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते |

न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मन: ||३०||

गाण्डीवम्,स्त्रवते,हस्तात,त्वक,च,एव,परिदह्यते |

न,च,शक्नोमि,अवस्थातुम्,भ्रमतति,इव,च,मे,मन: ||३०||

हातातून गांडीव धनुष्य सुटत आहे व त्वचा सुध्दा जळत आहे,तसेच माझे मन भ्रमित होत आहे,ह्यामुळे मी निट उभा राहण्यास सुध्दा असमर्थ आहे.

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव |

न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ||३१||

निमित्तानि,च,पश्यामि,विपरीतानि,केशव |

न,च,श्रेय:,अनुपश्यामि,हत्वा,स्वजनम्,आहवे ||३१||

हे केशव ! हि लक्षणे विपरीत आहेत असे मला दिसते,तसेच युध्दात स्वजन-समुदायास मारून कल्याण सुध्दा दिसत नाही.

न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च |

किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ||३२||

न काङ्क्षे,विजयम्,कृष्ण,न,च,राज्यम्,सुखानि,च ।

किम्,न:,राज्येन,गोविन्द,किम्,भोगै:,र्जीवितेन,वा ।।३२।।)

हे कृष्ण ! मी ना विजय ना राज्य ह्याची अपेक्षा करतो ना सुखांची अपेक्षा करतो,हे गोविंद ! आम्हाला अश्या राज्याचे काय प्रयोजन आहे? किंवा अश्या भोगांचा व जीवनाचा काय लाभ?

येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगा: सुखानि च ।

त इमेऽवस्थिता युध्दे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ।।३३।।

येषाम्,अर्थे,काङ्क्षितम्,न:,राज्यम्,भोगा:,सुखानि,च ।

त,इमे,अवस्थिता:,युध्दे,प्राणान्,त्यक्त्वा,धनानि,च ।।३३।।)

आम्हाला ज्यांच्यासाठी राज्य,भोग व सुख अभिष्ट (हवे) आहे,तेच हे सर्व धन व जीवनाची आशा सोडून युध्दासाठी उभे आहेत.

आचार्या: पितर: पुत्रास्तथैव च पितामहा: ।

मातुला: श्वशुरा: पौत्रा: श्याला: सम्बन्धिनस्तथा ।।३४।।

आचार्या:,पितर:,पुत्रा:,तथा,एव,च,पितामहा: ।

मातुला:,श्वशुरा:,पौत्रा:,श्याला:,सम्बन्धिन,तथा ।।३४।।)

गुरुजन,मोठेभाऊ-काका,पुत्र व त्याचे प्रकारे आजोबा,मामा,सासरे,नातु,मेव्हणे तसेच आणखी सुध्दा सगेसंबंधी लोक आहेत.

एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसुदन ।

अपि त्रैलोकयराज्यस्य हेतो: किं नु महीकृते ।।३५।।

एतान्,न,हन्तुम्,ईच्छामि,घ्नत:,अपि,मधुसुदन ।

अपि,त्रैलोक्यराज्यस्य,हेतो:,किम्,नु,महीकृते ।।३५।।)

हे मधुसुदन ! माझ्या मारण्याने अथवा तीनही लोकांच्या राज्यासाठी जर मी ह्यांना मारण्याची इच्छा करीत नाही,तर फक्त पृथ्वीच्या राज्याबद्दल आणखी वेगळे काय आहे?

निहत्य धार्तराष्ट्रान्न: का प्रीति: स्याज्जनार्दन ।

पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिन: ।।३६।।

निहत्य,धार्तराष्ट्रान्,न,का:,प्रीति:,स्यात्,जनार्दन ।

पापम,एव,आश्रयेत्,अस्मान्,हत्वा,एतान्,आततायिन: ।।३६।।)

हे जनार्दन धृतराष्ट्राच्या पुत्रांना मारून आम्हाला काय प्रसन्नता होईल?ह्या आततायिंना मारून तर आम्हाला पापच लागेल.

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान् ।

स्वजनं हि कथं हत्वा सुखिन: स्याम माधव ।।३७।।

तस्मात्,न,अर्हा,वयम्,हन्तुम्,धार्तराष्ट्रान्,स्वबान्धवान् ।

स्वजनम्, हि,कथम्,हत्वा,सुखिन:,स्याम,माधव ।।३७।।

त्यासाठी हे माधव ! आपल्याच बांधव धृतराष्ट्राच्या पुत्रांना मारण्यास आम्ही (आम्ही मारणे) योग्य नाही,कारण आपल्याच कुटुंबास मारून आम्ही कसे सुखी होऊ?

यद्ध्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतस: ।

कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ।।३८।।

यद्ध्यपि,एते,न,पश्यन्ति,लोभोपहतचेतस: ।

कुलक्षयकृतम्,दोषम्,मित्रद्रोहे,च,पातकम् ।।३८।।

कथं न ज्ञेयमस्माभि: पापादस्मान्निवर्तितुम् ।

कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यभ्दिर्जनार्दन ।।३९।।

कथम्,न,ज्ञेयस्,अस्माभि:,पापात्,अस्मात्,निवर्तितुम् ।

कुलक्षयकृतम्,दोषम्,प्रपश्यभ्:,जनार्दन: ।।३९।।

जरी लोभाने भ्रष्टचित्त झालेले हे लोक कुलाच्या नाशासाठी उत्पन्न झालेल्या दोषांना व मित्रांना विरोध करण्यात पाप समजत नाहित,तरी सुध्दा हे जनार्दन ! कुळनाशासाठी उत्पन्न झालेल्या दोषांना जाणणारे आम्ही ह्या पापापासून दूर होण्याचा का विचार करू नये?

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्मा: सनातना: ।

धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ।।४०।।

कुलक्षये,प्रणश्यन्ति,कुलधर्मा:,सनातना: ।

धर्मे,नष्टे,कुलम्,कृत्स्नम्,अधर्म,अभिभवति,उत ।।४०।।)

कुळाच्या नाशाने सनातन कुळधर्म नष्ट होतात,धर्माचा नाश झाल्यावर संपूर्ण कुळात बरेच पाप पसरते.

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रिय: ।

स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंक्ड़र: ।।४१।।

अधर्माभिभवात्,कृष्ण,प्रदुष्यन्ति,कुलस्त्रिय: ।

स्त्रीषु,दुष्टासु,वार्ष्णेय,जायते,वर्णसंक्ड़र: ।।४१।।)

हे कृष्ण ! पाप अधिक वाढल्याने कुळातील स्त्रिया अत्यंत दुषित होतात,व हे वार्ष्णेय ! स्त्रिया दुषित झाल्यावर वर्णसंकर उत्पन्न होतो.

सक्ड़रो नरकायैव कुलन्घानां कुलस्य च ।

पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रिया: ।।४२।।

सक्ड़र:,नरकाय,एव,कुलन्घानाम्,कुलस्य,च ।

पतन्ति,पितर:,हि,एषाम्,लुप्तपिण्डोवकक्रिया: ।।४२।।

वर्णसंकर कुळघातियांना व कुळास नरकात घेऊन जाण्यासच आहे,लुप्त झालेल्या पिंड व जल क्रिया असलेल्या श्राध्द व तर्पण वंचित ह्यांचे पितर सुध्दा अधोगतीस जातात,

दोषैरेतै: कुलन्घानां वर्णसक्ड़रकारकै: ।

उत्साद्यन्ते जातिधर्मा: कुलधर्माश्च शाश्वता: ।।४३।।

दोषै:,एतै:,कुलन्घानाम्,वर्णसक्ड़रकारकै: ।

उत्साद्ययन्ते,जातिधर्मा:,कुलधर्मा:,च,शाश्वता: ।।४३।।

ह्या वर्णसंकरकारक दोषांनी कुळघातियांचा सनातन कुळधर्म व जाति-धर्म नष्ट होऊन जातो.

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।

नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ।।४४।।

उत्सन्नकुलधर्माणाम्,मनुष्याणाम्,जनार्दन ।

नरके,अनियतम्,वास:,भवति,इति,अनुशुश्रुम ।।४४।।

हे जनार्दन ! ज्यांचा कुळ-धर्म नष्ट झाला आहे,अश्या मनुष्यांचा अनिश्चित काळपर्यंत नरकात वास असतो,असे आम्ही ऐकून आहोत.

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।

यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यता: ।।४५।।

अहो,बत,महत्पापम्,कर्तुम्,व्यवसिता:,वयम् ।

यत्,राज्यसुखलोभेन,हन्तुम्,स्वजनम्,उद्यता: ।।४५।।

आम्ही बुध्दीमान असून सुध्दा महान-पाप करण्यास तयार झालो आहोत,जे राज्य व सुखाच्या लोभाने स्वजनांना मारण्यास उद्युक्त झालो आहोत.

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणय: ।

धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ।।४६।।

यदि,माम्,अप्रतीकारम्,अशस्त्रम्,शस्त्रपाणय: ।

धार्तराष्ट्रा:,रणे,हन्यु:,तत्,ये,क्षेमतरम्,भवेत् ।।४६।।)

जर मला शस्त्ररहित व सामना न करणाऱ्यास शस्त्र हातात घेऊन धृतराष्ट्राचे पुत्र रणात मारून टाकतील तरी सुध्दा ते मरण माझ्यासाठी अधिक कल्याणकारक असेल.

एवमुक्त्वार्जुन: सङ्ख्ये रथोपस्थ उपाविशत् ।

विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानस: ।।४७।।

एवम्,उक्त्वा,अर्जुन:,संङ्ख्ये,रथोपस्थ,उपाविशत् ।

विसृज्य,सशरम्,चापम्,शोकसंविग्नमानस: ।।४७।।

संजय म्हणाले - रणभूमीत शोकाने उव्दिग्न मनाच्या अर्जुनाने ह्या प्रकारे सांगून,बाणासहित धनुष्याचा त्याग करून रथाच्या मागच्या भागात बसले.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्याय: ।।१।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय दुसरा

## “सांङ्ख्ययोग”

**कोठलाही नवीन साधक हा साधन मार्गात शिरण्यापूर्वी अनेक विचारांनी भांबावलेला असतो,ह्यात गुणात्मक प्रकृती हेच सत्य त्यास दिसते व नक्की काय करावे ते समजत नाही ह्यासाठी त्यास प्रथम तव्त्वज्ञान माहित करून घेऊन संशय दूर होणे आवश्यक आहे.ह्यासाठी बहुगुणात्मक प्रकृतीची व तत्वज्ञानाची प्रथम ओळख केली आहे**

संजय उवाच

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।

विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूधन: ।।१।।

तम्,तथा,कृपया,अविष्टम्,अश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।

विषीदन्तम्,इदम्,वाक्यम्,उवाच,मधुसूधन: ।।१।।

अर्जुन अवस्थेतील साधक जो रूढ परंपरांनी बांधलेला आहे त्यास वृत्तीयुध्द हे आकुळ अर्थात कुळधर्माच्या-परंपरेच्या विपरीत वाटते.(सृष्टी हि पाच महाभूतांच्या सूक्ष्म तत्वापासून होऊन बहु झाली आहे,रूढपणे साधक ह्यात बांधला गेला आहे)

संजय म्हणाले- त्यावेळी करुणेने व्याप्त व अश्रूंनी पूर्ण भरलेल्या व्याकूळ नेत्रांच्या शोकयुक्त अश्या अर्जुनास भगवान मधुसुदनाने हे सांगितले.

कुतस्त्वा कश्मलमिदं विषये समुपस्थितम् ।

अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ।।२।।

कुत:,त्वा,कश्मलम्,इदम्,विषमे,समुपस्थितम् ।

अनार्यजुष्टम्,अस्वर्ग्यम्,अकीर्तिकरम्,अर्जुन ।।२।।

श्रीभगवान म्हणाले- हे अर्जुन ! तुला ह्या नकोत्या-वेळी (अवेळी) हा मोह कोठून प्राप्त झाला?कारण न ह्याचे श्रेष्ठ पुरुषांव्दारे आचरण केले जाते,न ह्याने स्वर्ग प्राप्ति होते व ना ह्याने किर्ती होते.

क्लैब्यं मा स्म गम: पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।

क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परन्तप ।।३।।

क्लैब्यम्,मा,स्म,गम:,पार्थ,न,एतत्,त्वयि,उपपद्यते ।

क्षुद्रम्,हृदयदौर्बल्यम्,त्यक्त्वा,उत्तिष्ठ,परन्तप ।।३।।

ह्यासाठी हे अर्जुन ! असे नपुंसक मत तुझ्याकडून अपेक्षित नाही,हे तुझ्यासाठी उचित नाही,हे परंतप ! हृदयाच्या तृच्छ दुर्बलतेचा त्याग करून युध्दासाठी सज्ज हो.

कथं भीष्यमहं सङ्ख्ये द्रोणं च मधुसूदन ।

इषुभि: प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ।।४।।

कथम्,भीष्यम्,अहम्,संङ्ख्ये,द्रोणम्,च,मधुसूदन ।

इषुभि:,प्रति,योत्स्यामि,पूजार्हौ,अरिसूदन ।।४।।

अर्जुन म्हणाले - हे मधुसूदन ! मी रणभूमीत कसे काय बाणांनी भीष्मपितामह व द्रोणाचार्य ह्यांच्या विरुध्द लढूणार? कारण हे अरिसूदन ! कारण ते दोघेही पूजनीय आहेत.

गुरुनहत्वा हि महानुभावाञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।

हत्वार्थकामांस्तु गुरुनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ।।५।।

गुरुन्,अहत्वा,हि,महानुभावान्,श्रेय:,भोक्तुम्,भैक्ष्यम्,अपि,इह,लोके ।

हत्वा,अर्थकामान्,तु,गुरुन्,इह,एव,भुञ्जीय,भोगान्,रुधिरप्रदिग्धान् ।।५।।

त्यासाठी ह्या महान व पूज्य गुरूंना न मारून मी ह्या लोकांत भिक्षा मागून अन्न खाणे कल्याणकारक समजतो.कारण ह्यांना मारून मी ह्यालोकाना सोडून उरलेल्या अर्थ व कामरूप भोगांनाच भोगणार आहे.

न चैतव्दिद्म: कतरन्नो गरीयोयव्दा जयेम यदि व नो जयेयु: ।

यानेव हत्वा न जिजीविषाम स्तेऽवस्थिता: प्रमुखे धार्तराष्ट्रा: ।।६।।

न,च,एतत्,विद्म:,कतरत्,न:,गरीय:,यव्दा,जयेम,यदि,वा,न,जयेयु: ।

यान्,एव,हत्वा,न,जिजीविषाम,ते,अवस्थिता:,प्रमुखे,धार्तराष्टा: ।।६।।

आमच्यासाठी युध्द करणे वा ना करणे ह्यातील काय योग्य आणि श्रेष्ठ आहे,तसेच हे युध्द आम्ही जिंकू किंवा नाही  हे आम्हाला माहित नाही,तसेच ज्यांना मारून आम्हाला जगणे योग्य वाटत नाही असे आमच्या समोर उभे असलेले आमचे जवळचे संबंधी धृतराष्टाचे पुत्र आहेत.

कार्पण्यदोषापहतस्वभाव: पृच्छामि त्वां धर्मसम्मूढचेता: ।

यच्छ्रेय: स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ।।७।।

कार्पण्यदोषापहतस्वभाव:,पृच्छामि,त्वाम्,धर्मसम्मूढचेता: ।

यत्,श्रेय:,स्यात्,न्निश्चितम्,ब्रूहि,तत्,मे,शिष्य:,अहम्,शाधि,माम्,त्वाम्,प्रपन्नम् ।।७।।

अश्यारितीने भययुक्त झालेल्या व घाबरटपणाचा दोष निर्माण झालेल्या तसेच धर्माविषयी मोहित (संभ्रम) झालेला मी आपणास विचारतो कि निश्चित असे कल्याणकारी साधन मला सांगावे,कारण मी आपला शिष्य आहे,ह्यासाठी आपणास शरण आलेल्या मजला उपदेश (मार्गदर्शन) करावा.

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।

अवाप्य भूमावसपत्नमृध्दं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ।।८।।

न,हि,प्रपश्यामि,मम,अपनुयाद्यात्,यत्,शोकम्,उच्छोषणम्,इन्द्रियाणाम् ।

अवाप्य,भूमौ,असपत्नम्,ऋध्दम्,राज्यम्,सुराणाम्,अपि,च,अधिपत्यम् ।।८।।

देवांवर सुध्या विजय मिळवणारा अर्जुन मोहवश वाईट वृतीशी लढण्यास शोकाकुल झाला आहे

कारण धन-धान्यांनी संपन्न राज्य तसेच देवतांच्या अधिकार कार्यात सुध्दा नि:संशय असा उपाय मला दिसत नाही,जो माझ्या शरीर व मन ह्यांना शान्त करून आनंद देऊ शकेल.

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेश: परन्तप ।

न योस्त्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ।।९।।

एवम्,उक्त्वा,हृषीकेशम्,गुडाकेश:,परन्तप ।

न,योस्त्ये,इति,गोविन्दम्,उक्त्वा,तूष्णीम्,बभूव,ह ।।९।।

अज्ञान व आळस ह्यांना जिंकणारा साधक वाईट वृत्तींशी लढताना अनेकदा विनाकारण शोकाकुल होतो व त्यास मार्ग सापडत नाही.

संजय म्हणाले - हे राजन ! निद्रेला जिंकणाऱ्या अर्जुनाने अंतर्यामी श्रीकृष्ण महाराजांना असे सांगून परत मी युध्द करणार नाही असे स्पष्ट करून ते गप्प झाले (मौन बाळगले)

तमुवाच हृषीकेश: प्रहसन्निव भारत ।

सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वच: ।।१०।।

तम्,उवाच,हृषीकेश:,प्रहसन्,इव,भारत ।

सेनयो,उभयो:,मध्ये,विषीदन्तम्,इदम्,वच: ।।१०।।

हे भरतवंशी धृतराष्ट्र ! अंतर्यामी श्रीकृष्ण महाराज दोन्ही सेनांच्या मधोमध शोक करत असलेल्या अर्जुनास स्मित हास्य करत असे म्हणाले,

अश्योच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्र्च भाषसे ।

गतासूनगतासूंश्र्च नानुशोचन्ति पण्ड़िता: ।।११।।

अश्योच्यान्,अन्वशोच:,त्वम्,प्रज्ञावादान्,च,भाषसे ।

गतासून,अगतासून्,च,न,अनुशोचन्ति,पण्ड़िता: ।।११।।

रूढ परंपरांचा आधार घेऊन भगवंताने त्यास समजावण्याचा प्रयत्न करून पाहिला.(उच्च साधकाने त्याच्या कलाने घेऊन मार्गावर आणण्याचा प्रयत्न केला.)

श्रीभगवान म्हणाले - हे अर्जुन ! तु शोक न करण्यायोग्य अश्या मनुष्यांसाठी शोक करत आहेस व पंडित लोक बोलतात तसे सांगत आहेस,पण पंडितजन प्राण हरण झालेल्या किंवा न हरण झालेल्या दोन्हीपैकी कशाचाच शोक करत नाहित.

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपा: ।

न चैव न भाविष्याम: सर्वे वयमत: परम् ।।१२।।

न,तु,एव,अहम्,जातु,न,आसम्,न,त्वम्,न,इमे,जनाधिपा: ।

न,च,एव,न,भाविष्याम:,सर्वे,वयम्,अत:,परम् ।।१२।।

असे ह्याच वेळी घडत आहे का?जे केव्हाही कुठल्याही काळी नव्हते,कि हे राजा लोक नव्हते किं असे आहे कि ह्यापुढे आपण कोणीच राहाणार नाही.

देहिनाऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।

तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ।।१३।।

देहिन:,अस्मिन्,यथा,देहे,कौमारम्,यौवनम्,जरा ।

तथा,देहान्तरप्राप्ति:,धिर:,तत्र,न,मुह्यति ।।१३।।

नष्ट होणारी गोष्ट नष्ट होणारच आहे,वृथा शोक का?

जसे जीवातम्याच्या ह्या देहात बालपण,तरुणपण व वृध्दावस्था असते तशीच अन्य शरीराची प्राप्ति होते.त्या विषयात धीर पुरुष मोहित होत नाही.

मात्रास्पर्शांस्तु कौन्तेय शीतोष्णसुखदु:खदा: ।

आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ।।१४।।

मात्रास्पर्शा:,अस्तु,कौन्तेय,शीतोष्णसुखदु:खदा; ।

आगमापायिन:,अनित्या:,तानु,तितिक्षस्व,भारत ।।१४।।

हे कुन्तीपुत्र थंडी-गरमी व सुख-दु:ख देणारी इंद्रिये व विषय संयोग तर उत्पत्ती-विनाशशील व अनित्य आहे,ह्यासाठी हे भारत! त्यांना तु सहन कर.

यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।

समदु:खसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ।।१५।।

यम्,हि,न,व्यथयन्ति,ऐते,पुरुषम्,पुरुषर्षभ ।

समदु:खसुखम्,धीरम्,स:,अमृतत्वाय,कल्पते ।।१५।।

कारण हे पुरुषश्रेष्ठ! दु:ख-सुखांना समान समजणाऱ्या ज्या धीर पुरुषांना हे इंद्रिय व विषय संयोग व्याकूळ करत नाहीत,ते मोक्षासाठी योग्य आहेत.

नासते विद्यते भावो नाभावो विद्यते सत: ।

उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभि: ।।१६।।

न,असत:,विद्यते,भाव:,न,अभाव:,विद्यते सत: ।

उभयो:,अपि,दृष्ट:,अन्त:,तु,अनयो:,तत्वदर्शिभि: ।।१६।।

असत्य वस्तु सत्ता नाही व सत्याचा अभाव नाही अश्या दोन्हीतर्हेचे तत्व तत्वज्ञानी पुरुषांव्दारा पाहिले गेले आहे.

अविनाशि तु तव्दिध्दि येन सर्वमिदं ततम् ।

विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ।।१७।।

अविनाशि,तु,तत्,विध्दि,येन,सर्वम्,इदम्,ततम् ।

विनाशम्,अव्ययस्य,अस्य,न,कश्चित्,कर्तुम,अर्हति ।।१७।।

नाशरहित तर तु त्यासच जाण,ज्याने हे संपूर्ण जगत-दृश्यवर्ग व्याप्त आहे,त्या अविनाशीचा विनाश करण्यास कोणीही समर्थ नाही.

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ता: शरीरिण: ।

अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ।।१८।।

अन्तवन्त:,इमे,देहा:,नित्यम्,उक्ता:,शरीरिण: ।

अनाशिन,अप्रमेयस्य,तस्मात्,युध्यस्व,भारत ।।१८।।

ह्या नाशरहित,अप्रमेय,नित्यस्वरूप जीवात्म्यासाठी हे सर्व शरीर नाशवान म्हंटले आहे,म्हणून हे भरतवंशी अर्जुन ! तु युध्द कर.

य एनं वेत्ति हन्तारं यश्र्चैनं मन्यते हतम् ।

उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ।।१९।।

य:,एनम्,वेत्ति,हन्तारम्,य:,च,एनम्,मन्यते,हतम् ।

उभौ,तौ,न,विजानीत:,न,अयम्,हन्ति,न,हन्यते ।।१९।।

जो ह्या आत्म्यास मारणारा समजतो,तसेच जो ह्यास मेलेला मानतो,ते दोघेही जाणत नाहित,कारण हा आत्मा वास्तविक न कोणास मारतो न कोणाकडून मारला जातो.

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूय: ।

अजो नित्य: शाश्र्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ।।२०।।

न,जायते,म्रियते,वा,कदाचित्,न,अयम्,भूत्वा,भविता,वा,न,भूय: ।

अज,नित्य:,शाश्र्वत:,अयम्,पुराण,न,हन्यते,हन्यमाने,शरीरे ।।२०।।

हा आत्मा कोणत्याही काळात जन्मत नाही व मरत नाही,तसेच हा ना उत्पन्न होऊन परत होणारा आहे,कारण हा अजन्मा,नित्य,सनातन व पुरातन आहे,शरीर मेल्यानंतर सुध्दा हा मारला जात नाही.

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजव्ययम् ।

कथं स पुरुष: पार्थ कं घातयति हन्ति कम् ।।२१।।

वेद,अविनाशिनम्,नित्यम्,य:,एनम्,अव्ययम् ।

कथम्,स:,पुरुष:,पार्थ,कम्,घातयति,हन्ति,कम् ।।२१।।

हे पृथापुत्र अर्जुन ! जो पुरुष ह्या आत्म्यास नाशरहित,नित्य,अजन्मा व अव्यय असे जाणतो,तो पुरुष कसे कोणाला मारविल किंवा कसे कोणास मारील?

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृहणाति नरोऽपराणि ।

तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ।।२२।।

वासासि,जीर्णानि,यथा,विहाय,नवानि,गृहणाति,नर,अपराणि ।

तथा,शरीराणि,विहाय,जीर्णानि,अन्यानि,संयाति,नवानि,देही ।।२२।।

जसे मनुष्य जुनी वस्त्रे टाकून दुसरी नवीन वस्त्रे ग्रहण करतो,तसेच जीवात्मा जुन्या शरीराचा त्याग करून दुसरे नवीन शरीर प्राप्त करतो.

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावक: ।

न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुत: ।।२३।।

न,एनम्,छिन्दन्ति,शस्त्राणि,न,एनम्,दहति,पावक: ।

न,च,एनम्,क्लेदयन्ति,आप:,न,शोषयति,मारुत: ।।२३।।

हया आत्म्यास शस्त्राने छेद करता येत नाही,हा आगीत जळत नाही,हा पाण्याने भिजत नाही,तसेच वायुने सुकत नाही.

अच्छेद्योऽयमदाहयोऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।

नित्य: सर्वगत: स्थाणुरचलोऽयं सनातन: ।।२४।।

अच्छेद्यो,अयम्,अदाहय:,अयम्,अक्लेद्य:,अशोष्य,एव,च ।

नित्य:,सर्वगत:,स्थाणू:,अचल:,अयम्,सनातन: ।।२४।।

हा आत्मा अच्छेद्य,अदाहय,अक्लेद्यव नि:संदेह अशोष्य आहे,तसेच हा आत्मा नित्य,सर्वव्यापी, अचल,स्थिर राहणारा व सनातन आहे.

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।

तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ।।२५।।

अव्यक्त:,अयम्,अचिन्त्य:,अयम्,अविकार्य,अयम,उच्यते ।

तस्मात्,एवम्,विदित्वा,एनम्,न,अनुशोचितुम,अर्हसि ।।२५।।

वाईट वृतींचा नाश करताना आपले अस्तित्व नष्ट होईल कि काय असे साधकास वाटते.

हा आत्मा अव्यक्त आहे,हा आत्मा अचिंत्य आहे व हा आत्मा विकाररहित आहे असे म्हणतात,म्हणून हे अर्जुन ! ह्या आत्म्यास उपर्युक्त प्रकारांनी समजून तुझे शोक करणे योग्य नाही,अर्थात तु शोक करणे योग्य नव्हे.

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।

तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ।।२६।।

अथ,च,एनम्,नित्यजातम्,नित्यम्,वा,मन्यसे,मृतम् ।

तथापि,त्वम्,त्वम्,महाबाहो,न,एवम्,शोचितुम्,अर्हसि ।।२६।।

परंतु जरी तु आत्म्यास सदा जन्मणारा तसेच सदा मरणारा मनात असशील,तरी सुध्दा हे महाबाहो ! तु ह्याप्रकारे शोक करणे योग्य नव्हे.

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।

तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।।२७।।

जातस्य,हि,ध्रुव:,मृत्यु:,धृवम्,जन्म,मृतस्य,च ।

तस्मात्,अपरिहार्ये,अर्थे,न,त्वम्,शोचितुम्,अर्हसि ।।२७।।

कारण ह्या मान्यतेनुसार सुध्दा जन्मलेल्यांची मृत्यु निश्चित आहे व मरणाऱ्याचा जन्म निश्चित आहे.ह्यासाठी सुध्दा ह्या बिनउपायांच्या विषयात तु शोक करणे योग्य नाही.

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।

अव्यक्तानिधनान्येव तत्र का परिदेवना ।।२८।।

अव्यक्तादीनि,भूतानि,व्यक्तमध्यानि,भारत ।

अव्यक्तानिधनानि,एव,तत्र,का,परिदेवना ।।२८।।

हे अर्जुन ! संपूर्ण प्राणी जन्माच्या आधी अप्रकट असतात व मरणानंतर सुध्दा अप्रकट होणार आहेत,केवळ मध्येच हे प्रकट होतात,मग अश्या स्थितित शोक का करावा?

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवव्ददति तथैव चान्य: ।

आश्चर्यवच्चैनमन्य: श्रुणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ।।२९।।

आश्चर्यवत्,पश्यति,कश्चित्,एनम्,आश्चर्यवत्,वदति,तथैव,अन्य: ।

आश्चर्यवत्,एनम्,अन्य:,श्रुणोति,श्रुत्वा,एनम्,वेद,न,च,एव,कश्चित् ।।२९।।

कोणी एक महापुरुषच आत्म्यास आश्चर्यकारक रितीने (काय आश्चर्य म्हणून) पहातो व तसेच दुसरा कोणी महापुरुषच ह्या तत्वाचे आश्चर्यकारकरित्या (आश्चर्यचकित तत्व असल्याचे) वर्णन करतो.तसेच दुसरा कोणी अधिकारी पुरुष ह्यास आश्चर्यकारक असे ऐकतो व कोणी कोणी तर ऐकून सुध्दा ह्यास समजू शकत नाही.

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।

तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ।।३०।।

देही,नित्यम्,अवध्य,अयम्,देहे,सर्वस्य,भारत ।

तस्मात्,सर्वाणि,भूतानि,न,त्वम्,शोचितुम्,अर्हसि ।।३०।।

हे अर्जुन ! हा आत्मा सर्वांच्या शरीरात सदाच अवध्य (न मारता येण्यासारखा) आहे,ह्या कारणाने संपूर्ण प्राण्यांसाठी तु शोक करणे योग्य नाही.

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।

धर्म्याध्दि युध्दाचछ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ।।३१।।

स्वधर्मम्,अपि,च,अवेक्ष्य,न,विकम्पितुम्,अर्हसि ।

धर्म्यात्,हि,युध्दात्,श्रेय:,अन्यत्,क्षत्रियस्य,न,विद्यते ।।३१।।

तसेच आपल्या धर्मानुसार सुध्दा तु भयभित होणे योग्य नाही,अर्थात तुला भिती असता कामा नये,कारण क्षत्रियांसाठी धर्मयुक्त युध्दापेक्षा मोठे दुसरे कल्याणकारी कर्तव्य नाही.

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गव्दारमपावृतम् ।

सुखिन: क्षत्रिया: पार्थ लभन्ते युध्दमीदृशम् ।।३२।।

यदृच्छया,च,उपपन्नम्,स्वर्गव्दारम्,अपावृतम् ।

सुखिन:,क्षत्रिया:,पार्थ,लभन्ते,युध्दम्,ईदृशम् ।।३२।।

हे पार्थ ! आपल्या आपण प्राप्त झालेले व उघडलेले स्वर्गाचे व्दार ह्या प्रकारच्या युध्दाचे भाग्य,भाग्यवान क्षत्रियांनाच मिळते.

अथ चेत्वमिमं धर्म्यं सङ्ग्रामं न करिष्यसि ।

तत: स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ।।३३।।

अथ,चेत्,त्वम्,एमम्,धर्म्यम्,सङ्ग्रामम्,न,करिष्यसि ।

तत:,स्वधर्मम्,कीर्तिम्,च,हित्वा,पापम्,अवाप्स्यासि ।।३३।।

(प- पतन,अप -मिळणे पाप - पतन मिळणे,पुण्य - पतन उण्य,पतन जाणे-सुटणे)

परंतु जर तु हे धर्मयुक्त युध्द केले नाहिस तर तो स्वधर्म व किर्ती ह्याचा नाश ठरेल व तु पापाचा धनी होशील.

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।

सम्भावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ।।३४।।

अकीर्तिम्,च,अपि,भूतानि,कथयिष्यन्ति,ते,अव्ययाम् ।

सम्भावितस्य,च,अकीर्ति,मरणात्,अतिरिच्यते ।।३४।।

तसेच सर्वलोक तुझ्या अपकिर्तीचे बऱ्याच काळपर्यन्त वर्णन करतील व समाजात मान असणाऱ्या पुरुषांसाठी हि अपकिर्ती मृत्युपेक्षा वाईट आहे.

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथा: ।

येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ।।३५।।

भयात्,रणात्,उपरतम्,मस्यन्ते,त्वाम्,महारथा: ।

येषाम्,च,त्वम्,बहुमत:,भूत्वा,यास्यसि,लाघवम् ।।३५।।

ज्यांच्या दृष्टीने प्रथम सन्मानित व मोठा असणारा तु असन्मानीत व लहान होशील,ते महारथी लोक तुला घाबरून (वृत्तीयुध्दातुन) युध्दातुन माघार घेतलेला समजतील.

अवाच्यवादांश्र्च बहून्वदिष्यन्ति तवाहिता: ।

निंन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दु:खतरं नु किम् ।।३६।।

अवाच्यवादन्,च,बहूत्,वदिष्यन्ति,तव,अहिता: ।

निंन्दन्त:,तव्,सामर्थ्यम्,तत:,दु:खतरम्,नु,किम् ।।३६।।

तुझे वैरी तुझ्या सामर्थ्याची निंदा करत तुला बोलू नयेत असे बोलतील,ह्यापेक्षा अजून मोठे दु:ख अजून काय आहे?

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसेमहीम् ।

तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्र्चय: ।।३७।।

हत:,वा,प्राप्स्यसि,स्वर्गम्,जित्वा,वा,भोक्ष्यसे,महिम् ।

तस्मात्,उत्तिष्ठ,कौन्तेय,युध्दाय,कृतनिश्र्चय: ।।३७।।

एकतर तु युध्दात मारला जाऊन स्वर्गात जाशील किंवा संग्राम जिंकून पृथ्वीचे राज्य मिळवशील,ह्यासाठी हे अर्जुन ! तु युध्दाचा निश्र्चय करून सज्ज हो.

सुखदु:खे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।

ततो युध्दाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ।।३८।।

सुखदु:खे,समे,कृत्वा,लाभालाभौ,जयाजयौ ।

ततो,युध्दाय,युज्यस्व,न,एवम्,पापम,अवाप्स्यसि ।।३८।।

जय-पराजय,लाभ-हानी व सुख-दु:ख समान मानून,त्यानंतर युध्दासाठी तयार हो,ह्याप्रकारे युध्द करून तु पापापासून दूर राहाशील.

एषा तेऽभिहिता सांङ्ख्ये बुध्दिर्योगे त्विमां श्रुणु ।

बुध्दया युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ।।३९।।

एषा,ते,अभिहिता,सांङ्ख्ये,बुध्दि,र्योगे,तू,इमाम्,श्रुणु ।

बुध्दया,युक्त:,यया,पार्थ,कर्मबन्धम्,प्रहास्यसि ।।३९।।

हे पार्थ ! हि बुध्दि तुला ज्ञानयोगाच्या दृष्टीने सांगितली गेली व आता तु ह्यास कर्मयोगाच्या दृष्टीने ऐक,ज्या बुध्दिनेयुक्त होऊन तु कर्माच्या बंधनाचा त्याग करू शकशील अर्थात कर्म-बन्धन सर्वथा नष्ट होईल.

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।

स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।।४०।।

न,इह,अभिक्रमनाश:,अस्ति,प्रत्यवाय:,न,विद्यते ।

स्वल्पम,अपि,अस्य,धर्मस्य,त्रायते,महत:,भयात् ।।४०।।

ह्या कर्मयोगात आरम्भ अर्थात बीजाचा नाश नाही व फळरूप दोष नाही,उलट ह्या कर्मयोगरूप धर्मात थोडेसे साधन जन्म-मृत्युरूप महान भयापासून रक्षण करणारे आहे.

व्यवसायात्मिका बुध्दिरेकेह कुरुनन्द्न ।

बहुशाखा ह्यनन्ताश्र्च बुध्दयोऽव्यवसायिनाम् ।।४१।।

व्यवसायात्मिका,बुध्दि:,एका,इह,कुरुनन्दन ।

बहुशाखा:,हि,अनन्ता,च,बुध्दय:,अव्यवसायिनाम् ।।४१।।

हे अर्जुन ! ह्या कर्मयोगात निश्र्चयात्मक बुध्दि एकच असते,परंतु अस्थिर विचार असणाऱ्या विवेकहीन सकाम मनुष्यांच्या बुध्दिचा निश्र्चयच अनेक भेद असणारा व अनंत प्रकारचा असतो.

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्र्चित: ।

वेदवादरता: पार्थ नान्यदस्तीति वादिन: ।।४२।।

याम्,इमाम्,पुष्पिताम्,वाचम्,प्रवदन्ति,अविपश्र्चित: ।

वेदवादरता:,पार्थ,न,अन्यत्,अस्ति,वादिन: ।।४२।।

कामात्मान: स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।

क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ।।४३।।

कामात्मान:,स्वर्गपरा:,जन्मकर्मफलप्रदाम् ।

क्रियाविशेषबहुलाम्,भोगैश्वर्यगतिम्,प्रति ।।४३।।

भोगेश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।

व्यवसायत्मिका बुध्दि: समाधो न विधीयते ।।४४।।

भोगेश्वर्यप्रसकतानाम्,तया,अपहृतचेतसाम् ।

व्यवसायत्मिका,बुध्दि:,समाधौ,न,विधीयते ।।४४।।

हे अर्जुन जो भोगात रममाण झालेला असतो,जे कर्मफळाचे प्रशंसक वेदवाक्यात सुध्दा प्रिती ठेवतात,ज्याच्या बुध्दिने स्वर्ग हेच परम-प्राप्तीचे ध्येय आहे व जे स्वर्गाशिवाय दुसरी कोणतीच वस्तु नाही असे म्हणणारे आहेत,ते अविवेकीजन ह्याप्रकारच्या (मोहित) पुष्पित अर्थात दिखाऊ शोभायुक्त वाणीने बोलतात,ज्यात जन्मरूप फळ देणाऱ्या तसेच भोग व ऐश्वर्य प्राप्त करण्यासाठी असणाऱ्या अनेक क्रियांचे वर्णन ह्यात आहे,अश्या वाणीने ज्यांचे चित्त हरण झाले आहे,जे भोग व ऐश्वर्यात अत्यंत आसक्त आहेत,अश्या पुरुषांची निश्चयात्मक बुध्दि परमात्म्यात असत नाही.

त्रेगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।

निर्व्दन्व्दो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ।।४५।।

त्रेगुण्यविषया:,वेदा:,निस्त्रैगुण्य:,अर्जुन ।

निर्व्दन्व्द,नित्यसत्त्वस्थ:,निर्योगक्षेम:,आत्मवान् ।।४५।।

हे अर्जुन ! वेद उपर्युक्त प्रकारांनी तीन गुणांनी कार्यरूप समस्त भोगांचे तसेच साधनांचे प्रतिपादन करणारे आहेत,म्हणून तु त्या भोग व साधनांमध्ये आसक्तिहीन,हर्ष-शोकादि व्दंव्दरहित,नित्यवस्तु परमात्म्यात स्थित,योग-क्षेम (***योग***-अप्राप्य वस्तु प्राप्त करणे,***क्षेम***- प्राप्त झालेल्या वस्तूचे रक्षण करणे) नको असलेला व स्वाधीन अन्त:करणाचा हो.

यावानर्थ उदपाने सर्वत: सम्प्लुतोदके ।

तावान्सर्वेषु वेदेषु ब्राहमणस्य विजानत: ।।४६।।

यावान्,अर्थ:,उदपाने,सर्वत:,सम्प्लुतोदके ।

तावान्,सर्वेषु,वेदेषु,ब्राहमणस्य,विजानत: ।।४६।।

सर्वबाजूंनी जलमय झाल्यावर छोट्या जलाशयाचे मनुष्याला जेवढे प्रयोजन राहते,ब्रहमाला तत्वत: जाणणाऱ्या ब्राहमणास समस्त वेदांत तेवढेच प्रयोजन राहाते.

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।

मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सग्ङोऽस्त्वकर्मणि ।।४७।।

कर्मणि,एव,अधिकार:,ते,मा,फलेषु,कदाचन ।

मा,कर्मफलहेतु:,भू:,मा,ते,सग्ङ:,अस्तु,अकर्मणि ।।४७।।

कर्म करणे एवढाच तुझा अधिकार आहे,त्याच्या फळात तुझा अधिकार नाही,म्हणून कर्म फळाचा हेतु तु ठेवू नकोस तसेच कर्म न करण्याकडे सुध्दा तु आसक्त होऊ नकोस.

योगस्थ: कुरु कर्माणि सग्ङं त्यक्त्वा धनञ्जय ।

सिध्दयसिध्दयो:समो भूत्वा समत्वं योग उच्यते ।।४८।।

योगस्थ:,कुरु,कर्माणि,सग्ङम्,त्यक्त्वा,धनंञ्जय ।

सिध्दयसिध्दयो:,सम:,भूत्वा,समत्वम्,योग,उच्यते ।।४८।।

हे धनंजय ! तु आसक्तिचा त्याग करून सिध्दि व असिध्दित समान बुध्दि असणाऱ्या योगात स्थित होऊन कर्तव्य कर्म कर,***समत्व हाच योग समजतात.***(जे कर्म केले जाते त्याच्या पूर्ण होणे अथवा न होणे ह्यात समभाव ठेवणे ह्यासच ***"समत्व"*** असे म्हणतात)_

दूरेण ह्यवरं कर्म बुध्दियोगाध्दनञ्जय ।

बुध्दौ शरणमन्विच्छ कृपणा: फलहेतव: ।।४९।।

दूरेण,हि,अवरम्,कर्म,बुध्दियोगात्,धनंञ्जय ।

बुध्दि,शरणम्,अन्विच्छ,कृपणा:,फलहेतव: ।।४९।।

ह्या समत्वरूप बुध्दियोगापेक्षा सकाम कर्म अत्यंत निम्न श्रेणीचे आहे,ह्यासाठी हे धनंजय ! तु समबुध्दितच रक्षणाचा उपाय शोध अर्थात बुध्दियोगाचा आश्रय ग्रहण कर,कारण फळाचा हेतु बनणे हे अत्यंत दिन आहे.

बुध्दियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।

तस्माद्योगाय युज्यस्व योग: कर्मसु कौशलम् ।।५०।।

बुध्दियुक्तो,जहाति,इह,उबे,सुकृतदुष्कृते ।

तस्मात्,योगाय,युज्यस्व,योग:,कर्मसु,कौशलम् ।।५०।।

समबुध्दियुक्त पुरुष पुण्य व पाप दोन्हीचा ह्या लोकांत त्याग करतात,अर्थात त्यातून मुक्त होतात.ह्यासाठी तू समत्वरूप योगात मन लाव,हा समत्व बुध्दिरूप योगच कर्मात कुशलता आहे अर्थात कर्मबंधनातून सुटण्याचा उपाय आहे.

कर्मजं बुध्दियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिण: ।

जन्मबन्धविनिर्मुकता: पदं गच्छन्त्यनामयम् ।।५१।।

कर्मजम्,बुध्दियुक्ता,हि,फलम्,त्यक्त्वा,मनीषिण: ।

जन्मबन्धविनिर्मुकता:,पदम्,गच्छन्ति,अनामयम् ।।५१।।

कारण समबुध्दिने युक्त ज्ञानीजन कर्माने उत्पन्न होणाऱ्या फळाचा त्याग करून जन्मरूप बंधनातून मुक्त होऊन निर्विकार-निर्मुक्त परमपद प्राप्त करतो.

यदा ते मोहकलिलं बुध्दिर्व्यतितरिष्यति ।

तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।।५२।।

यदा,ते,मोहकलिलम्,बुध्दि:,व्यतितरिष्यति ।

तदा,गन्तासि,निर्वेदम्,श्रोतव्यस्य,श्रुतस्य,च ।।५२।।

ऐकलेल्या व न ऐकण्यायोग्य अश्या सर्वांचा त्याग करून परममुक्त अवस्था प्राप्त करावी.

ज्या काळात तुझी बुध्दि मोहरूप दलदल योग्यप्रकारे पार करेल,त्यावेळी ऐकलेल्या व पुढे ऐकु येणाऱ्या ह्या व परलोक संबंधी सर्व भोगांचे वैराग्य प्राप्त होईल.

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।

समाधावचला बुध्दिस्तदा योगमवाप्स्यसि ।।५३।।

श्रुतिविप्रतिपन्ना,ते,यदा,स्थास्यति,निश्चला ।

समाधौ,अचला,बुध्दि,तदा,योगम्,अवाप्स्यसि ।।५३।।

तुटक-तुटक वचने ऐकून विचलित झालेली तुझी बुध्दि जेव्हा परमात्म्यात अचल व स्थिर होईल,तेव्हा तु हा योग प्राप्त करशील अर्थात तुझा परमात्म्याशी संयोग होईल.

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।

स्थितधी: किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ।।५४।।

स्थितप्रज्ञस्य,का,भाषा,समाधिस्थस्य,केशव ।

स्थितधी:,किम्,प्रभाषेत,किम्,आसीत,व्रजेत,किम् ।।५४।।

अर्जुन म्हणाले - हे केशव ! समाधि-स्थितित परमात्म्यास प्राप्त झालेल्या स्थिरबुध्दि पुरुषाचे काय लक्षण आहे? तो स्थिर बुध्दि पुरुष कसे बोलतो,कसे बसतो व कसा चालतो?

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।

आत्मन्येवात्मना तुष्ट: स्थितप्रज्ञस्तदोच्यते ।।५५।।

प्रजहाति,यदा,कामान्,सर्वान्,पार्थ,मनोगतान् ।

आत्मनि,एव,आत्मना,तुष्ट:,स्थितप्रज्ञ:,तद,उच्यते ।।५५।।

श्री भगवान म्हणाले - हे अर्जुन ! ज्या काळात हा पुरुष मनात असलेल्या संपूर्ण कामना पूर्णपणे त्यागतो व आत्म्याने आत्म्यातच संतुष्ट राहातो,त्याकाळात तो स्थितप्रज्ञ आहे असे म्हंटले जाते.

दु:खेष्वनुव्दिन्गमना: सुखेषु विगतस्पृह: ।

वीतरागभयक्रोध: स्थितधीर्मुनिरुच्यते ।।५६।।

दु:खेषु,अनुव्दिन्गमना:,सुखेषु,विगतस्पृह: ।

वीतरागभयक्रोध:,स्थितधी,मुनि:,उच्यते ।।५६।।

दु:ख प्राप्ती झाल्यावर ज्याच्या मनात उव्देग होत नाही व सुख प्राप्ति झाल्यावर सर्वथा नि:स्पृह आहे,तसेच ज्याचा राग,भय व क्रोध नष्ट झाला आहे,असा मुनि स्थिरबुध्दिचा म्हंटला जातो.

य: सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।

नाभिनन्दति न व्देष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।५७।।

य:,सर्वत्र,अनभिस्नेह:,तत्,तत्,प्राप्य,शुभाशुभम् ।

न,अभिनन्दति,न,व्देष्टि,तस्य,प्रज्ञा,प्रतिष्ठिता ।।५७।।

जो पुरुष सर्वत्र स्नेहरहित झालेला त्या-त्या शुभ व अशुभ वस्तु प्राप्त झाल्यावर ना प्रसन्न होतो ना व्देष करतो त्याची बुध्दि स्थिर आहे.

यदा संहरते चायं कूर्मोऽग्ङानीव सर्वश: ।

इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।५८।।

यदा,संहरते,च,अयम्,कूर्म:,अग्ङानि,सर्वश: ।

इंद्रियाणि,इन्द्रियार्थेभय:,तस्य,प्रज्ञा,प्रतिष्ठिता ।।५८।।

ज्याप्रमाणे कासव सर्व बाजूंनी आपले अंग (आत) चोरून (सामावून) घेतो,तसेच जेव्हा हा पुरुष विषयांपासून इंद्रियांना हटवतो,तेव्हा त्याची बुध्दि स्थिर आहे (असे समजले जाते)

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिन: ।

रसवर्जं रसोऽप्यस्य परं द्रुव्ष्टा निवर्तते ।।५९।।

विषया:,विनिवर्तन्ते,निराहारस्य,देहिन: ।

रसवर्जम्,रस:,अपि,अस्य,परम्,द्रुव्ष्टा,निवर्तते ।।५९।।

इंद्रियांव्दारा विषयांना ग्रहण करणाऱ्या पुरुषांचे विषय निवृत्त होतात,परंतु त्यातील आसक्ति निवृत्त होत नाही,परंतु स्थितप्रज्ञ पुरुषांची आसक्तीच परमात्म्याचा साक्षात्कार करून निवृत्त होते.

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चित: ।

इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मन: ।।६०।।

यतत:,हि,अपि,कौन्तेय,पुरुषस्य,विपश्चित: ।

इन्द्रियाणि,प्रमाथनि,हरन्ति,प्रसभम्,मन: ।।६०।।

हे अर्जुन ! आसक्तीचा नाश न होण्याकारणांने हि विषयांकडे सहजतेने जाणाऱ्या स्वभावाची इंद्रिये प्रयत्न करून सुध्दा बुध्दिमान पुरुषांचे मन बलाने हरण करतात.

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्पर: ।

वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।६१।।

तानि,सर्वाणि,संयम्य,युक्त,आसीत,मत्पर: ।

वशे,हि,यस्य,इन्द्रियाणि,तस्य,प्रज्ञा,प्रतिष्ठिता ।।६१।।

हयासाठी साधकाने संपूर्ण इंद्रियांना वश करून समाहितचित्त करून मत्परायण होऊन ध्यानास बसावे,कारण ज्या पुरुषांची इंद्रिये वश असतात,त्यांचीच बुध्दि सुध्दा स्थिर होते.

ध्यायतो विषयान्पुंस: सग्ङस्तेषूपजायते ।

सग्ङात्सञ्जायते काम: कामात्क्रोधोऽभिजायते ।।६२।।

ध्यायत:,विषयान्,पुस:,सग्ङ,तेषू,उपजायते ।

सग्ङात्,संञ्जायते,काम:,कामात्,क्रोध:,अभिजायते ।।६२।।

विषयांचे चिंतन करणाऱ्या पुरुषांची त्या विषयात आसक्ति उत्पन्न होते,आसक्तीने विषयाची कामना उत्पन्न होते व कामनेत विध्न आल्यास क्रोध उत्पन होतो.

क्रोधाभ्दवति सम्मोह: सम्मोहात्स्मृतिविभ्रम: ।

स्मृतिभ्रंशाद् बुध्दिनाशो बुध्दिनाशात्प्रणश्यति ।।६३।।

क्रोधात्,भवति,सम्मोह:,सम्मोहात्,स्मृतिविभ्रम: ।

स्मृतिभ्रंशात्,बुध्दिनाश:,बुध्दिनाशात्,प्रणश्यति ।।६३।।

क्रोधाने अत्यंत मूढभाव उत्पन्न होतो,मूढभावाने स्मृतीचा भ्रम होतो,स्मृतीच्या भ्रमाने बुध्दि अर्थात ज्ञानशक्तीचा नाश होतो व बुध्दिचा नाश झाल्यावर हा पुरुष आपल्या स्थितिपासून खाली (अध:पतन) जातो.

रागव्देषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्र्वरन् ।

आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ।।६४।।

रागव्देषवियुक्तै:,तु,विषयान्,इन्द्रियै,चरन् ।

आत्मवश्यै,र्विधेयात्मा,प्रसादम्,अधिगच्छति ।।६४।।

परंतु आपल्या आधिन केलेल्या अंतःकरणाचा साधक,आपल्यास वश केलेल्या राग-व्देष रहित इंद्रियाव्दारा विषयात वावरत असताना अन्तःकरणाची प्रसन्नता प्राप्त करतो.

प्रसादे सर्वदु:खानां हानिरस्योपजायते ।

प्रसन्नचेतसो ह्याशु बुध्दि: पर्यवतिष्ठते ।।६५।।

प्रसादे,सर्वदु:खानाम्,हानि:,अस्य,उपजायते ।

प्रसन्नचेतस:,हि,आशु,बुध्दि:,पर्यवतिष्ठते ।।६५।।

अंतःकरणाची प्रसन्नता झाल्यावर ह्याच्या संपूर्ण दु:खाचा अभाव होतो व त्या प्रसन्नचित्त कर्मयोग्याची बुध्दि शीघ्र सर्व बाजूंनी निघून जाऊन परमात्म्यात सर्वथा स्थिर राहाते.

नास्ति बुध्दिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।

न चाभावयत: शान्तिरशान्तस्य कुत: सुखम् ।।६६।।

न,अस्ति,बुध्दि:,अयुक्तस्य,न,च,अयुक्तस्य,भावना ।

न,च,अभावयत:,शान्ति:,अशान्तस्य,कुत:,सुखम् ।।६६।।

मन व इंद्रिये न जिंकलेल्या पुरुषांत निश्र्चयात्मक बुध्दि असत नाही व त्या न असलेल्या मनुषाच्या अंतःकरणात भावना सुध्दा नसते,अश्या भावनारहित मनुष्यास शांति मिळत नाही व शान्तिरहित मनुष्यास सुख कसे मिळणार?

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।

तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ।।६७।।

इन्द्रियाणाम्,हि,चरताम्,यत्,मन:,अनु,विधीयते ।

तत्,अस्य,हरति,प्रज्ञाम्,वायु:,नावम्,इव,अम्भसि ।।६७।।

ज्याप्रकारे पाण्यात चालणारी नाव वाऱ्यामुळे भरकटत जाते,तसेच विषयांत असलेली इंद्रिये मन ज्या इंद्रियाबरोबर आहे त्या एकाच इंद्रियात रत असणारी पुरुषाची बुध्दि तेच इंद्रिय हरण करते.

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वश: ।

इंद्रियांणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।६८।।

तस्मात्,यस्य,महाबाहो,निगृहीतानि,सर्वश: ।

इंद्रियांणि,इन्द्रियार्थेभ्य:,तस्य,प्रज्ञा,प्रतिष्ठिता ।।६८।।

ह्यासाठी हे महाबाहो ! ज्या पुरुषांची इंद्रिये इंद्रियांच्या विषंयात सर्व प्रकारांनी निग्रह केलेली आहेत,त्यांची बुध्दि स्थिर आहे.

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।

यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुने: ।।६९।।

या,निशा,सर्वभूतानाम्,तस्याम्,जागर्ति,संयमी ।

यस्याम्,जाग्रति,भूतानि,सा,निशा,पश्यत:,मुने: ।।६९।।

संपूर्ण प्राण्यांना जे रात्रीसमान आहे,त्या नित्य ज्ञानस्वरूप परमानंद प्राप्तीत स्थितप्रज्ञ योगी जागा राहतो व ज्या नाशवान संसारिक सुखाच्या प्राप्तित सर्व प्राणी जागतात,त्या परमात्मा तत्वास जाणणाऱ्या मुनींसाठी ती रात्रीसमान आहे.

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमाप: प्रविशन्ति यव्दत् ।

तव्दत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ।।७०।।

आपूर्यमाणम्,अचलप्रतिष्ठम्,समुद्रम्,आप:,प्रविशन्ति,यव्दत् ।

तव्दत्,कग्मा:,यम्,प्रविशन्ति,सर्वे,स:,शान्तिम्,आप्नोति,न,कामकामी ।।७०।।

जसे नाना नद्यांचे पाणी सर्व बाजूंनी परिपूर्ण,अचल प्रतिष्ठा असलेल्या समुद्रास विचलित न करता सामावले जाते,तसेच सर्व भोग स्थितप्रज्ञ पुरुषांत कोणत्याही प्रकारचा विकार उत्पन्न न करता सामावले जातात,तेच पुरुष परमशांति मिळवतात,भोगांची इच्छा करणारे ति शांती मिळवत नाहित.

विहाय कामान्य: सर्वान्पुमांश्र्चरति नि:स्पृह: ।

निर्ममो निरहक्ङार: स शान्तिमधिगच्छति ।।७१।।

विहाय,कामान्,य:,सर्वान्,पुमान्,चरति,नि:स्पृह: ।

निर्मम:,निरहक्ङार:,स,शान्तिम्,अधिगच्छति: ।।७१।।

जे पुरुष सर्व कामनांचा त्याग करून ममतारहित,अहंकार रहित व स्पृहारहित वावरतो,तोच शांति प्राप्त करतो अर्थात त्यासच शांति मिळते.

एषा ब्राह्मी स्थिति: पार्थ नैना प्राप्य विमूह्यति ।

स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ।।७२।।

एषा,ब्राह्मी,स्थिति:,पार्थ,न,एनाम्,प्राप्य,विमूह्यति ।

स्थित्वा,अस्याम्,अन्तकाले,अपि,ब्रह्मनिर्वाणम्,ऋच्छति ।।७२।।

हे अर्जुन ! हि ब्रह्मप्राप्ति झालेल्या माणसाची स्थिति आहे,हे प्राप्त करून योगी कधीच मोहित होत नाही व अन्तकाळात सुध्दा ह्या ब्रह्मरूप स्थितीत स्थिर होऊन ब्रह्मानंद प्राप्त करतो.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे सांङ्ख्ययोगो नाम व्दितीयोऽध्याय: ।।२।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय तिसरा

### “कर्मयोग”

**साधकाचे संशय दूर झाल्यावर संसारप्रवाहात असताना आत्मोधाराकडील प्रथम पाऊल हे निष्काम कर्म योगाची महती सांगणारे आहे.**

अर्जुन उवाच

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुध्दिर्जनार्दन ।

तत्कीं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ।।१।।

ज्यायसी,चेत्,कर्मण:,ते,मता,बुध्दि:,जनार्दन ।

तत्,किम्,कर्मणि,घोरे,माम्,नियोजयसि,केशव ।।१।।

अर्जुन म्हणाले ! हे जनार्दन ! जर आपण कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ मानता तर, हे केशव ! तर मला भयंकर कर्मात का लावता ?

व्यामिश्रेणेव वाक्येन बुध्दिं मोहयसीव मे ।

तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ।।२।।

व्यामिश्रेण,इव,वाक्येन,बुध्दिम्,मोहयसि,इव,मे ।

तत्,एकम्,वद,निश्चित्य,येन,श्रेय:,अहम,आप्नुयाम् ।।२।।

आपण सांगितलेल्या (अनेक-मिश्रित) वचनांनी माझी बुध्दी मोहित (भ्रमित) झाली आहे,त्यासाठी एक गोष्ट निश्चितपणे सांगा ज्याने माझे कल्याण होईल.

लोकेऽस्मिन्व्दिविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।

ज्ञानयोगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ।।३।।

लोके,अस्मिन,व्दिविधा,निष्ठा,पुरा,प्रोक्ता,मया,अनघ ।

ज्ञानयोगेन,साङ्ख्यानाम्,कर्मयोगेन,योगिनाम् ।।३।।

(अस्मिन -पूर्वीपासून,पारंपारिक)

साधनेची परीपक्व अवस्था अर्थात पराकाष्ठेला निष्ठा असे म्हणतात,मायेने उत्पन्न झालेले संपूर्ण गुण गुणांप्रमाणे वागतात,असे समजून तसेच मन,इंद्रिये व शरीर व्दारा होणाऱ्या संपूर्ण क्रियांत कर्तेपणाच्या अभिमानरहित भावाने सर्वव्यापी सच्चिदानन्दघन परमात्म्यात ऐकीभावाने स्थित रहाण्याचे नाव ***"ज्ञानयोग"*** आहे,ह्यासच ***"संन्यास","सांख्ययोग"*** ह्या नावाने जाणतात.फळ व आसक्तीचा त्याग करून भगवदआज्ञेनुसार केवळ भगवदार्थ समत्व बुध्दिने कर्म करण्याचे नाव ***"निश्काम कर्मयोग"*** आहे, ह्यासच ***"समत्वयोग" "बुध्दियोग","कर्मयोग","तदर्थकर्म", मदर्थकर्म"," "मत्कर्म"*** इत्यादि नावांनी जाणले

जाते.(ज्ञानी चिंतनातून व ध्यानातून कर्ममार्ग अनुसरतात,तर योगी कर्म करताना त्याच्या परिणामांवर लक्ष ठेऊन कर्म करतात)

श्रीभगवान म्हणाले - हे निश्पाप ! ह्या लोकांत दोन प्रकारची निष्ठा मी सांगितली आहे,त्यात सांख्ययोग्यांची निष्ठा ज्ञानयोगाने व योग्यांची निष्ठा कर्मयोगाने होते.

न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरूषोऽश्नुते ।

न च सन्न्यसनादेव सिध्दिं समधिगच्छति ।।४।।

न,कर्मणाम्,अनारम्भात्,न्नैष्कर्म्यम्,पुरूष:,अश्नुते ।

न,च,संन्न्यसनात्,एव,सिध्दिम्,समधिगच्छति ।।४।।

ज्या अवस्थेत प्राप्त झालेल्या पुरुषांचे कर्म अकर्म होते,अर्थात फळ उत्पन्न करत नाहित,त्या अवस्थेस **“निष्कर्म”** असे म्हणतात.

मनुष्य ना कर्माचा आरंभ केल्याशिवाय निष्कर्म म्हणजे योगनिष्ठा प्राप्त करतो ना कर्माच्या केवळ त्यागाने सिध्दि म्हणजे सांख्यनिष्ठा प्राप्त करतो.

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।

कार्यते ह्यवश: कर्म सर्व: प्रकृतिजैर्गुणै: ।।५।।

न,हि,कश्चित्,क्षणम,अपि,जातु,तिष्ठति,अकर्मकृत् ।

कार्यते,हि,अवश:,कर्म,सर्व:,प्रकृतिजै,गुणै: ।।५।।

नि:संदेह कोणीही मनुष्य कोणत्याही काळात क्षणमात्र सुध्दा कर्म न करता राहू शकत नाही,कारण सर्व मनुष्य समुदाय प्रकृतिजनित गुणांव्दारा परवश झालेला व कर्म करण्यास बाध्य झालेला आहे.

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।

इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचार: स उच्यते ।।६।।

कर्मेन्द्रियाणि,संयम्य,य:,आस्ते,मनसा,स्मरन् ।

इन्द्रियार्थान्,विमूढात्मा,मिथ्याचार:,स,उच्यते ।।६।।

जो मूढबुध्दी मनुष्य समस्त इंद्रियांना हठपूर्वक थांबवून त्या इंद्रियांच्या विषयांचे चिंतन करत असतो,तो मिथ्याचारी अर्थात दंभी असतो,

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।

कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ।।७।।

यः,तू,इन्द्रियाणि,मनसा,नियम्य,आरभते,अर्जुन ।

कर्मेन्द्रियैः,कर्मयोगम्,आसक्तः,सः,विशिष्यते ।।७।।

परंतु हे अर्जुन ! जो पुरुष मनाने इंद्रियांना वश करून अनासक्त झालेला समस्त इंद्रियाव्दारे कर्मयोगाचे आचरण करतो,तोच श्रेष्ठ आहे.

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।

शरीरयात्रापि च ते न प्रसिध्दयेदकर्मणः ।।८।।

नियतम्,कुरु,कर्म,त्वम्,कर्म,ज्याय,हि,अकर्मणः ।

शरीरयात्रा,अपि,च,ते,न,प्रसिध्दयेत,अकर्मणः ।।८।।

तू शास्त्रविहित कर्तव्य कर्म कर,कारण कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे,तसेच कर्म न केल्याने शरीर निर्वाह सुध्दा शक्य नाही.

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः ।

तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसग्ङः समाचर ।।९।।

यज्ञार्थात्,कर्मणः,अन्यत्र,लोकःअयम्,कर्मबन्धनः ।

तदर्थम्,कर्म,कौन्तेय,मुक्तसग्ङः,समाचर ।।९।।

यज्ञा निमित्त केल्याजाणाऱ्या कर्मा अतिरिक्त दुसऱ्या कर्मात लागलेला हा मनुष्य समुदाय कर्माने बांधला जातो,ह्यासाठी हे अर्जुन ! तू आसक्तिरहित होऊन त्या यज्ञाच्या निमित्त सर्वार्थाने कर्तव्यकर्म कर.

सहयज्ञाः प्रजाः सृव्ष्टा पुरोवाच प्रजापतिः ।

अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ।।१०।।

सहयज्ञा:,प्रजा:,सृव्ष्टा,पुरोवाच,प्रजापति: ।

अनेन,प्रसविष्यध्वम,एव,व:अस्तु,इष्टकामधुक् ।।१०।।

प्रजापती ब्रह्माने कल्पाच्या आदिकाळात यज्ञासहित प्रजा रचून त्यांस सांगितले कि तुम्हीलोक ह्या यज्ञाव्दांरा वृध्दी प्राप्त करा व हा यज्ञ तुम्हाला इच्छित भोग देणारा आहे.

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु व: ।

परस्परं भावयन्त: श्रेय: परमवाप्स्यथ ।।११।।

देवान्,भावयत,अनेन,ते,देवा:,भावयन्तु,व: ।

परस्परम्,भावयन्त:,श्रेय:,परम्,अवाप्स्यथ ।।११।।

जीवन यज्ञात वरील उन्नत अवस्था (देवता-प्रदानशक्ती) प्राप्त केल्यावर,त्याच्याभागाचा पुढील अवस्थेसाठी उपयोग करावा

ह्या यज्ञाने तुम्ही देवतांना उन्नत करा व त्या देवता तुम्हाला उन्नत करतील,ह्याप्रकारे नि:स्वार्थ भावाने एक-दुसऱ्यास उन्नत करून तुम्ही परम-कल्याण प्राप्त कराल.

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविता: ।

तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव स: ।।१२।।

इष्टात्,भोगान्,हि,व:,देवा,दास्यन्ते,यज्ञभाविता: ।

तै:,दत्तान्,अप्रदाय,एभ्य,य:,भुङ्क्ते,स्तेन:,एव,स: ।।१२।।

यज्ञव्दांरा उन्नत देवता तुम्हाला न मागताच इच्छित भोग देत राहतील,ह्याप्रकारे त्या देवतांव्दारा दिलेल्या भोगांना त्यांना न देता स्वतःच भोगतो तो चोरच आहे.

यज्ञशिष्टाशिन: सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषै: ।

भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ।।१३।।

यज्ञशिष्टाशिन:,सन्त:,मुच्यन्ते,सर्वकिल्बिषै: ।

भुञ्जते,ते,तु,अवम्,पापा:,ये,पचन्ति:,आत्मकारणात् ।।१३।।

यज्ञाचे राहिलेले अन्न खाणारा श्रेष्ठ पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो व जे पापीलोक आपले शरीर-पोषण करण्यासच अन्न शिजवतात,ते सर्व पापच खातात.

अन्नाभ्दवति भूतानि पर्जन्यादन्नसम्भव: ।

यज्ञाभ्दवति पर्जन्यो यज्ञ: कर्मसमुभ्दव: ।।१४।।

कर्म ब्रहमोभ्दवं विद्धि ब्रहमाक्षरसमुभ्दवम् ।

तस्मात्सर्वगतं ब्रहम नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।।१५।।

अन्नात्,भवन्ति,भूतानि,पर्जन्यात्,अन्नसम्भव: ।

यज्ञात्,भवति,पर्जन्य:,यज्ञ:,कर्मसमुद्भव: ।।१४।।

कर्म,ब्रहमोद्भव,विध्दि,ब्रहम,अक्षरसमुद्भवम् ।

तस्मात्,सर्वगतम्,ब्रहम,नित्यम्,यज्ञे,प्रतिष्ठितम् ।।१५।।

योग्य कर्मापासून वरील साधनावस्था अर्थात कर्मयज्ञापासून वरील अवस्था त्याच्या पासून दिव्य चित्तवृत्ती अर्थात वरील अवस्थेसाठी योग्य पर्जन्य-प्रत्याहार त्यातून आणखी वरील अवस्था व त्या अवस्थेसाठी लागणारे साधन (पर्जन्य) हा सतत वर परमात्म्याकडे जाणारा क्रम आहे.जसे जसे साधन मार्गात वर जावे तशा अनुकूल गोष्टी अशी शृंखला आहे.(सर्व प्रथम अवस्था हि अन्न अर्थात अन्-स्पंदन,न् - त्या अवस्थेत जाणे.)

सर्व प्राणी अन्नापासून उत्पन्न होतात,अन्नाची उत्पत्ती वृष्टीने होते,वृष्टी यज्ञाने होते व यज्ञ विहित कर्मांनी उत्पन्न होणारा आहे,कर्मसमुदायास तू वेदांपासून उत्पन्न व वेदांना अविनाशी परमात्म्यापासून उत्पन्न झालेला जाण,ह्याने सिध्द होते कि सर्वव्यापी परम अक्षर परमात्मा सदाच यज्ञात प्रतिष्ठित आहे.

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह य: ।

अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ।।१६।।

एवम्,प्रवर्तितम्,चक्रम्,न,अनुवर्तयति,इह,य: ।

अघायु:,इन्द्रियाराम:,मोघम्,पार्थ,स:,जीवति ।।१६।।

हे पार्थ ! जो पुरुष ह्या लोकांत ह्याप्रकारे परंपरेने प्रचलित सृष्टीचक्रास अनुकूल व्यवहार करत नाही,अर्थात आपल्या कर्तव्याचे पालन करत नाही,तो इंद्रियाव्दांरा भोगात रममाण असणारा पापीपुरुष व्यर्थ जीवन जगतो.

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्र्च मानव: ।

आत्मन्येव व सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ।।१७।।

य:,तु,आत्मरति:,एव,स्यात्,आत्मतृप्त:,च,मानव: ।

आत्मति,एव,च,सन्तुष्ट:,तस्य,कार्यम्,न,विद्यते ।।१७।।

परंतु जो पुरुष आत्म्यात रममाण असणारा व आत्म्यातच तृप्त तसेच संतुष्ट आहे,त्याच्यासाठी काहीच कर्तव्य नाही.

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्र्चन ।

न चास्य सर्वभूतेषु कश्र्चिदर्थव्यपाश्रय: ।।१८।।

न,एव,तस्य,कृतेन्,अर्थ,न,अकृतेन,इह,कश्र्चन ।

न,च,अस्य,सर्वभूतेषु,कश्र्चित्,अर्थव्यपाश्रय: ।।१८।।

त्या महापुरुषांचे ह्या विश्र्वात न काही कर्म करायचे प्रयोजन आहे व कर्म न करण्याचे प्रयोजन आहे,तसेच संपूर्ण प्राण्यांत सुध्दा ह्यांचा किंचीतही स्वार्थाशी संबंध नाही.

तस्मादसक्त: सततं कार्यं कर्म समाचर ।

असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुष: ।।१९।।

तस्मात्,सक्त:,सततम्,कार्यम्,कर्म,समाचर ।

असक्त,ह,आचरन्,कर्म,परम्,आप्नोति,पुरुष: ।।१९।।

ह्यासाठी तू निरंतर आसक्तीरहित होऊन सदा कर्तव्यकर्मांना योग्यप्रकारे समज,कारण आसक्ती रहित होऊन कर्म करीत असलेला मनुष्य परमात्म्यास जाऊन मिळतो.

कर्मणैव हि संसिध्दिमास्थिता जनकादय: ।

लोकसङ्ग्रहमेवापि सपश्यन्कर्तुमर्हसि ।।२०।।

कर्मण:एव,हि,संसिध्दिम्,आस्थिता,जनकादय: ।

लोकसङ्ग्रहम्,एव,अपि,सपश्यन्,कर्तुम,अर्हसि ।।२०।।

जानकादि ज्ञानीजन सुध्दा आसक्तीरहित कर्मानेच परमसिध्दी प्राप्त करतात,ह्यासाठी तसेच लोकसंग्रहाच्या दृष्टीने सुध्दा तू कर्म करण्यायोग्य आहेस,अर्थात तुझे कर्म करणे हेच उचित आहे.

यद्यदारति श्रेष्ठस्तदेवतरो जन: ।

स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।।२१।।

यत्,यत्,आचरति,श्रेष्ठ,तत्,तत्,एव,इतर:,जन: ।

स:,यत्,प्रमाणम्,कुरुते,लोक:,तत्,अनुवर्तते ।।२१।।

श्रेष्ठ पुरुष जे जे आचरण करतात,अन्य पुरुष सुध्दा तसेच आचरण करतात,ते जे काही प्रमाण म्हणून म्हणतात,समस्त मनुष्य समुदाय त्याच्या अनुसारच कर्म करु लागतो.

न मे पार्थस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्जन ।

नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ।।२२।।

न,मे,पार्थ,अस्ति,कर्तव्यम्,त्रिषु,लोकेषु,किंञ्जन ।

न,अनवाप्तम्,अवाप्तव्यम्,वर्ते,एव,च,कर्मणि ।।२२।।

हे अर्जुन ! मला ह्या तिन्ही लोकांत न काही कर्तव्य आहे,न काही प्राप्त करण्यायोग्य वस्तू अप्राप्य आहे,तरी सुध्दा मी कर्म करतोच आहे.

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रित: ।

मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या: पार्थ सर्वश: ।२३।।

यदि,हि,अहम्,न,वर्तेयम्,जातु,कर्मणि,अतन्द्रित: ।

मम,वत्मं,अनुवर्तन्ते,मनुष्या:,पार्थ,सर्वश: ।२३।।

कारण हे पार्थ ! जर सावधान होऊन मी कर्म करणार नाही तर मोठी हानी होईल,कारण मनुष्य सर्व प्रकारांनी माझ्या मार्गाचे अनुसरण करतात.

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।

सक्ङरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमा: प्रजा: ।।२४।।

उत्सीदेयु:,ईमे,लोका:,न,कुर्याम्,कर्म,चेत्,अहम् ।

सक्ङरस्य,च,कर्ता,स्याम्,उपहन्याम्,इमा:,प्रजा: ।।२४।।

ह्यासाठी मी जर कर्म करणार नाही तर सर्व मनुष्य नष्ट-भ्रष्ट होऊन जातील व मी संकर करणारा व समस्त प्रजेस नष्ट करणारा होईन.

सक्ता: कर्मण्यविव्दांसो यथा कुर्वन्ति भारत ।

कुर्याव्दिव्दांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसङ्ग्रहम् ।।२५।।

सक्ता:,कर्मणि,अविव्दांसो,यथा,कुर्वन्ति,भारत ।

कुर्यात,विव्दिन्,तथा,असक्त:,चिकीर्षु,लोकसङ्ग्रहम् ।।२५।।

हे भारत ! कर्मात आसक्त झालेले अज्ञानी जन ज्याप्रकारे कर्म करतात,आसक्तीरहित विव्दानांनी सुध्दा लोकसंग्रहासाठी तसेच कर्म करावे.

न बुध्दिभेदं जनयेदज्ञानां कर्मसग्डिनाम् ।

जोषयेत्सर्वकर्माणि विव्दान्युक्त: समाचरन् ।।२६।।

न,बुध्दिभेदम्,जनयेत्,अज्ञानाम्,कर्मसग्डीनाम् ।

जोषयेत्,सर्वकर्माणि,विव्दान,युक्त:,समाचरन् ।।२६।।

परमात्मा स्वरुपात अढळ स्थित झालेल्या ज्ञानी पुरुषांनी शास्त्रविहित कर्मात आसक्ती असणाऱ्या अज्ञानी लोकांच्या बुध्दीत भ्रम अर्थात अश्रध्दा उत्पन्न करू नये,उलट शास्त्र विहित समस्त कर्म सर्वार्थाने करून त्यांच्याकडूनसुध्दा करून घ्यावीत.

प्रकृते: क्रियमाणानि गुणै: कर्माणि सर्वश: ।

अहक्ङारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ।।२७।।

प्रकृते:,क्रियमाणानि,गुणै:,कर्माणि,सर्वश: ।

अहक्ङारविमूढात्मा,कर्ता,अहम,इति,मन्यते ।।२७।।

वास्तविक संपूर्ण कर्म सर्व प्रकारांनी प्रकृतीच्या गुणांव्दारे केले जाते,तरी सुध्दा ज्यांचे अंतःकरण अहंकाराने मोहित झाले आहे,असे अज्ञानी मी कर्ता आहे असे मानतात.

तत्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयो: ।

गुणा गुणषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ।।२८।।

तत्ववित्त,तु,महाबाहो,गुणकर्मविभागयो: ।

गुणा:,गुणषु,वर्तन्ते,इति,मत्वा,न,सज्जते ।।२८।।

परन्तु हे महाबाहो ! गुणविभाग व कर्मविभाग ह्याचे तत्व जाणणारा ज्ञानयोगी संपूर्ण गुणच गुणांत वागत (व्यवहार करत) आहेत,असे समजून गुणांत आसक्त होत नाहित.

प्रकृतेर्गुणसम्मूढा: सज्जन्ते गुणकर्मसु ।

तानकृत्स्त्रविदो मन्दान्कृत्स्न्नविन्न विचालयेत् ।।२९।।

प्रकृते:,गुणसम्मूढा:,सज्जन्ते,गुणकर्मसु ।

तान,अकृत्स्त्रविद:,मन्दान्,कृत्स्न्नवित्,न,विचालयेत् ।।२९।।

त्रिगुणात्मक मायेचे कार्यरूप पांच महाभूते व मन बुध्दी अहंकार तसेच पांच ज्ञानेंद्रिये,पांच कर्मेंद्रिये व शब्दादी पांच विषय ह्या सगळ्याच्या समुदायास “गुणविभाग” असे म्हणतात,व ह्याच्या परस्पर (एकदुसऱ्याशी) केलेल्या चेष्टेचे नांव कर्मविभाग आहे.

गुणविभाग व कर्मविभाग ह्यापेक्षा वेगळा असा आत्मा ह्यास जाणणे अर्थात *“निर्लेप”* जाणणे ह्यासच तत्वास जाणणे असे म्हणतात.

गुणकर्मविभाग - पूर्वसंस्कार ,बाह्य संस्कार व कर्म ह्यांनी गुणांची नवीन स्थिर रचना ह्याचा प्रकृतीचा प्रवास.

प्रकृतिच्या गुणांनी अत्यंत मोहित झालेली माणसे गुण व कर्मात आसक्त रहातात,हे पूर्णपणे न समजणाऱ्या मंदबुध्दी अज्ञानी लोकांस पूर्णतया जाणणाऱ्या ज्ञान्याने विचलित करू नये.

मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्याध्यात्मचेतसा ।

निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वर: ।।३०।।

मयि,सर्वाणि,कर्माणि,संन्न्यस्य,अध्यात्मचेतसा ।

निराशी,र्निर्मम:,भूत्वा,युध्यस्व,विगतज्वर: ।।३०।।

माझ्या अंतर्यामी परमात्मा स्वरुपात लागलेल्या चित्तव्दारा संपूर्ण कर्मांना माझ्यात अर्पण करून आशारहित ममतारहित व सन्तापरहित होऊन युध्द (वृत्तीयुध्द) कर.

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवा: ।

श्रध्दावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभि: ।।३१।।

ये,मे,मतम्,इदम्,नित्यम्,अनुतिष्ठन्ति,मानवा: ।

श्रध्दाववन्त:,अनसूयन्त:,मुच्यन्ते,ते,अपि,कर्मभि: ।।३१।।

जो कोणी मनुष्यदोषदृष्टीरहित व श्रध्दायुक्त होऊन माझ्या ह्या मताचे सदा अनुसरण करतो,तो सुध्दा ह्या संपूर्ण कर्मातून मुक्त होतो.

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।

सर्वज्ञानविमूढांस्तान्विध्दि नष्टानचेतस: ।।३२।।

ये,तु,एतत्,अभ्यसूयन्त:,न,अनुतिष्ठन्ति,मे,मतम् ।

सर्वज्ञानविमूढान्,तान,विध्दि,नष्टान्,अचेतस: ।।३२।।

परंतु जो मनुष्य माझ्यावर दोषारोपण करत माझ्या मतानुसार अनुकरण करत नाही,त्या मूर्खांना तू संपूर्ण ज्ञानाने मोहित व नष्ट झालेलाच समज.

सदृशं चेष्टते स्वस्या: प्रकृतेर्ज्ञानवानपि ।

प्रकृति यान्ति भूतानि निग्रह: किं करिष्यति ।।३३।।

सदृशम्,चेष्टते,स्वस्या:,प्रकृते:,ज्ञानवान,अपि ।

प्रकृतिम्,यान्ति,भूतानि,निग्रह:,किम्,करिष्यति ।।३३।।

सर्व प्राणी प्रकृतीस प्राप्त होतात अर्थात आपल्या (स्वभावास वश होऊन) धर्मानुसार कर्म करतात,ज्ञानवान सुध्दा आपल्या प्रकृतिनुसार चेष्टा करतात,तर मग कोणाचा हट्ट त्यास काय करणार?हट्ट का करायचा?

इंद्रियस्येन्द्रियस्यार्थे रागव्देषौ व्यवस्थितौ ।

तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ।।३४।।

इंद्रियस्य,एन्द्रियस्,अर्थे,रागव्देषौ,व्यवस्थितौ ।

तयो,न,वशम,आगच्छेत,तौ,हि,अस्य,परिपन्थिनौ ।।३४।।

इंद्रिये इंद्रियांच्या अर्थी अर्थात प्रत्येक इंद्रियांच्या विषयी राग व व्देष लपलेले आहेत,मनुष्याने ह्या दोन्हींच्या तडाख्यात सापडू नये कारण हे दोन्ही कल्याणमार्गात विघ्न आहेत,ह्यांना वश होणे हे शत्रूला वश होण्यासारखे आहे.

श्रेयान्स्वधर्मो विगुण: परधर्मात्स्वनुष्ठितात् ।

स्वधर्मे निधनं श्रेय: परधर्मो भयावह: ।।३५।।

श्रेयान्,स्वधर्म,विगुण:,परधर्मात्,स्वनुष्ठितात् ।

स्वधर्मे,निधनम्,श्रेय:,परधर्म:,भयावह: ।।३५।।

योग्यप्रकारे आचरण करता-येण्याजोग्या दुसऱ्याच्या धर्मापेक्षा (पिंडधर्म) गुणरहित असला तरी आपला धर्म अतिउत्तम होय,आपल्या धर्मात मरणे सुध्दा कल्याणकारक आहे व दुसऱ्याचा धर्म हा भयावह आहे.

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुष: ।

अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजित: ।।३६।।

अथ,केन,प्रयुक्त:अयम्,पापम्,चरति,पूरुष: ।

अनिच्छन्,अपि,वार्ष्णेय,बलात्,इव,नियोजित: ।।३६।।

अर्जुन म्हणाले ! हे कृष्ण ! तर मग हा मनुष्य स्वत:ला न आवडता सुध्दा जबरदस्ती केल्याप्रमाणे कशाने प्रेरित होऊन पापाचे आचरण करतो?

काम एष क्रोध एष रजोगुणसमुभ्दव: ।

महाशनो महापाप्मा विध्दयेनमिह वैरिणम् ।।३७।।

काम,एष,क्रोध:,एष,रजोगुणसमुभ्दव: ।

महाशन:,महापाप्मा,विध्दि,एतम्,इह,वैरिणम् ।।३७।।

श्री भगवान म्हणाले ! रजोगुणांनी उत्पन्न झालेला हा कामच क्रोध आहे,हा अतिशय खादाड असून भोगांपासून कधी न (आटोपणारा) दूर जाणारा व मोठा पापी आहे,ह्यालाच तू ह्या विषयातला वैरी जाण.

धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।

यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ।।३८।।

धूमेन,अव्रियते,वह्नि:,यथा,आदर्श,मलेन,च ।

यथा,उल्बेन,आवृत:,गर्भ:,तथा,तेन,इदम,आवृतम् ।।३८।।

ज्याप्रकारे धुराने अग्नी व मळाने आरसा झाकला जातो,ज्याप्रकारे गर्भ हा वेष्टलेला असतो,तसेच कामाने ज्ञान झाकलेले असते.

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।

कामरुपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ।।३९।।

आवृतम्,ज्ञानम,एतेन,ज्ञानिन:,नित्यवैरिणा ।

कामरुपेण,कौन्तेय,दुष्पूरेण,अनलेन,च ।।३९।।

आणि हे अर्जुन ! ह्या अग्नीच्या समान कधीही न पूर्ण होणाऱ्या ह्या कामरूप, ज्ञानीयांच्या वैऱ्यामुळे, मनुष्याचे ज्ञान झाकलेले आहे.

इन्द्रियाणि मनो बुध्दिरस्याधिष्ठानमुच्यते ।

एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ।।४०।।

इन्द्रियाणि,मन:,बुध्दि,अस्य,अधिष्ठानम्,उच्यते ।

एतै:,र्विमोहयति,एष:,ज्ञानम,आवृत्य,देहिनम् ।।४०।।

इंद्रिये मन व बुध्दी हि सर्व हयाची वसतीस्थाने आहेत,हा काम मन,बुध्दी व इंद्रियाव्दांरा ज्ञानास आच्छादित करून जीवात्म्यास मोहित करतो.

तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।

पाप्मानं प्रजहि हयेनं ज्ञानविज्ञाननाशनम् ।।४१।।

तस्मात्,त्वम्,इन्द्रियाणि,आदौ,नियम्य,भरतर्षभ ।

पाप्मानम्,प्रजहि,हि,एनम्,ज्ञानविज्ञाननाशनम् ।।४१।।

म्हणून हे अर्जुन ! तू प्रथम इंद्रियांना वश कर,हया ज्ञान व विज्ञानाचा नाश करणाऱ्या महान पापी कामास अवश्य बळपूर्वक मारून टाक.

इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्य: परं मन: ।

मनसस्तु परा बुध्दिर्यो बुध्दे: परतस्तु स: ।।४२।।

इन्द्रियाणि,पराणि,आहु,इन्द्रियेभ्य:,परम्,मन: ।

मनस:,तु,परा,बुध्दि:,य:,बुध्दे:,परत:,तु,स: ।।४२।।

इंद्रियांना स्थूल शरीरापेक्षा वर-श्रेष्ठ,बलवान व सूक्ष्म म्हणतात,हया इंद्रियापेक्षा सूक्ष्म मन आहे व मनापेक्षा सूक्ष्म बुध्दि आहे व जे बुध्दीपेक्षा अत्यंत सूक्ष्म आहे तो आत्मा आहे.

एवं बुध्दे परं बुदध्वा संस्तभ्यात्मांनमात्मना ।

जहि शत्रुं महाबाहो कामरुपं दुरासदम् ।।४३।।

एवम्,बुध्दे,परम्,बुदध्वा,संस्तभ्य,आत्मानम,आत्मना ।

जह,शत्रुम्,महाबाहो,कामरुपम्,दुरासदम् ।।४३।।

अश्याप्रकारे बुध्दीपेक्षा सूक्ष्म,बलवान व अत्यंत श्रेष्ठ आत्मा असे जाणून व बुध्दीने मनास वश करून हे महाबाहो ! तू ह्या कामरूप दुर्जय शत्रूस मारून टाक.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्याय: ।।३।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय चवथा

## “ज्ञानकर्मसंन्यासयोग”

**पहिले पाऊल पुढे गेल्यावर हळूहळू ज्ञानज्योत प्रज्वलीत होते ह्यासाठी निष्काम कर्मात श्रद्धा असणे आवश्यक आहे,ह्यासाठी आसक्तीरहित कर्म अर्थात निश्र्काम कर्म ह्याचा ज्ञानाशी संबंध दाखविला आहे.**

श्रीभगवानउवाच

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।

विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ।।१।।

इमम्,विवस्वते,योगम्,प्रोक्तवान्,अव्ययम् ।

विवस्वान्,मनवे,प्राह,मनु:,ईक्ष्वाकवे,अब्रवीत् ।।१।।

उच्च अवस्थेतील ज्ञान (ज्ञानसूर्याव्दारा) त्यानंतर मनाव्दारे पुढे (रघु-अग्निबीज ज्याने पापांचा नाश होतो,इक्षु - गोड वाक-वाणी,काकू - स्वरज्ञान अर्थात योगनाडयांतील स्वराव्दांरे) सिध्द पुरुषांव्दारे प्रकट झाले

श्रीभगवान म्हणाले - मी हा अविनाशी योग सूर्यास सांगितला,सूर्याने आपला पुत्र वैवस्वत मनुला सांगितला व मनुने आपला पुत्र राजा इक्ष्वाकुला सांगितला.

एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदु: ।

स कालेनेह महता योगो नष्ट: परन्तप ।।२।।

एवम्,परम्पराप्राप्तम्,इमम्,राजर्षय:,विदु: ।

स:,कालेन,इह,महता,योग,नष्ट:,परन्तप ।।२।।

हे परंतप अर्जुन ! ह्याप्रकारे परंपरेने प्राप्त हा योग राजर्षिंनी जाणला,परन्तु ह्यानंतर हा योग ह्या पृथ्वीलोकातून लुप्तप्राय झाला.(योग्य साधकांच्या अभावामुळे हा योग गुप्त झाला)

स एवायं मया तेऽद्ययोग: प्रोक्त: पुरातन: ।

भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३॥

स:,एव,अयम्,मया,ते,अद्य,योग:,प्रोक्त:,पुरातन: ।

भक्त:,असि,मे,सखा,च,इति,रहस्यम्,हि,एतत्,उत्तमम् ॥३॥

तू माझा भक्त व प्रिय सखा आहेस,ह्यासाठी हा पुरातन योग आज मी तुला सांगतो,कारण हे मोठे उत्तम रहस्य आहे,अर्थात गुप्त ठेवण्यायोग्य विषय आहे.

अर्जुन उवाच

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वत: ।

कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिती ॥४॥

अपरम्,भवत:,जन्म,परम्,जन्म,विवस्वत: ।

कथम्,एतत्,विजानीयाम्,त्वम्,आदौ,प्रोक्तवान्,इति ॥४॥

अर्जुन म्हणाले ! आपला जन्म हा अर्वाचीन (आत्ताचा) आहे व सूर्याचा जन्म-तर खूप जुना आहे अर्थात कल्पाच्या आदिकाळात झाला आहे,तर हे मी कसे मान्य करू कि आपणच कल्पाच्या आदिकाळात सूर्यास हा योग सांगितला?

श्रीभगवानउवाच

बहूनि मे व्यतीतानि जन्मनि तव चार्जुन ।

तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप ॥५॥

बहूनि,मे,व्यतीतानि,जन्मनि,तव,च,अर्जुन ।

तानि,अहम्,वेद,सर्वाणि,न,त्वम्,वेत्थ,परन्तप ॥५॥

श्रीभगवान म्हणाले,हे परंतप अर्जुन ! माझे व तुझे बरेचसे जन्म झाले आहेत,ते सर्व तू जाणत नाहिस,परंतु मी ते जाणतो.

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।

प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ।।६।।

अज:अपि,सन,अव्ययात्मा,भूतानाम,ईश्वर:अपि,सन् ।

प्रकृतिम्,स्वाम्,अधिष्ठाय,सम्भवामि,आत्ममायया ।।६।।

मी अजन्मा व अविनाशीस्वरूप असून तसेच सर्व प्राण्यांचा ईश्वर असून सुध्दा आपल्या प्रकृतीस आधीन करून आपल्या योगमायेने प्रकट होतो.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।

अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।७।।

यदा,यदा,हि,धर्मस्य,ग्लानि:,भवति,भारत ।

अभ्युत्थानम्,अधर्मस्य,तदा,आत्मानम्,सृजामि,अहम् ।।७।।

हे भारत ! जेव्हा जेव्हा धर्माची हानी होते व अधर्माची वृध्दी होते,तेव्हा तेव्हा मी माझ्या स्वरुपाची मी रचना करतो अर्थात साकार-रूपाने लोकांच्या सन्मुख प्रकट होतो.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।

धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे ।।८।।

परित्राणाय,साधूनाम्,विनाशाय,च,दुष्कृताम् ।

धर्मसंस्थापनार्थाय,सम्भवामि,युगे,युगे ।।८।।

साधु पुरुषांचा उध्दार करण्यास,पाप कर्म करणाऱ्यांचा विनाश करण्यास व धर्माची योग्य तऱ्हेने स्थापना करण्यास मी युगा-युगात प्रकट होतो.

जन्म कर्म च दिव्यमेवं यो वेत्ति तत्वत: ।

त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ।।९।।

जन्म,कर्म,च,मे,दिव्यम्,एवम्,य:,वेत्ति,तत्वत: ।

त्यक्त्वा,देहम्,पुन:,जन्म:,न,ऐति,माम्,एति,स:,अर्जुन ।।९।।

हे अर्जुन ! माझे जन्म व कर्म दिव्य अर्थात निर्मळ व अलौकिक आहे असे जो मनुष्य तत्वाने जाणतो,तो शरीर त्याग झाल्यावर परत जन्मास येत नाही तर मलाच प्राप्त होतो.

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिता: ।

बहवो ज्ञानतपसा पूता मभ्दावमागता: ।।१०।।

वीतरागभयक्रोधा:,मन्मया:,माम्,उपाश्रिता: ।

बहव:,ज्ञानतपसा,पूता:,मदभावम्,आगता: ।।१०।।

पूर्वी सुध्दा,ज्यांचे राग,भय व क्रोध सर्वथा नष्ट झाले आहेत व जे माझ्यात अनन्यपूर्वक स्थित आहेत,असे माझा आश्रय घेतलेले बरेचसे भक्त आवश्यक ज्ञानरूप तपाने पवित्र होऊन माझ्या स्वरूपास येऊन मिळाले आहेत.

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।

मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या: पार्थ सर्वश: ।।११।।

ये,यथा,माम्,प्रपद्यन्ते,तानं,तथा,एव,भजामि,अहम् ।

मम,वर्त्म,अनुवर्तन्ते,मनुष्या:,पार्थ,सर्वश: ।।११।।

हे अर्जुन ! जो भक्त मला ज्याप्रकारे भजतो,मी त्यास त्याचप्रकारे भजतो,कारण सर्व माणसे सर्वप्रकारे माझ्या मार्गाचेच अनुसरण करतात.

काङ्क्षन्त: कर्मणा सिध्दिं यजन्त इह देवता: ।

क्षिप्रं हि मानुषे लोके सिध्दिर्भवति कर्मजा ।।१२।।

काङ्क्षन्त:,कर्मणा,सिध्दिम्,यजन्ते,इह,देवता: ।

क्षिप्रम्,हि,मानुषे,लोके,सिध्दि:,भवति,कर्मजा ।।१२।।

ह्या मनुष्य लोकांत कर्माच्या फळाची इच्छा असणारे लोक देवतांचे पूजन करतात,कारण त्यांना कर्माने उत्पन्न होणाऱ्या सिध्दी जलद प्राप्त होतात.

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागश: ।

तस्य कर्तारमपि मां विध्दयकर्तारमव्ययम् ।।१३।।

चातुर्वर्ण्यंम,मया,सृष्टम्,गुणकर्मविभागश: ।

तस्य,कर्तारम,अपि,माम्,विध्दि,अकर्तारम्,अव्ययम् ।।१३।।

ब्राहमण क्षत्रिय वैश्य व शुद्र ह्या चार वर्णांचा समुह,गुण व कर्म ह्याच्या विभागाने माझ्याकडून-माझ्यामार्फत रचला आहे,ह्याप्रकारे असा सृष्टी-रचनेच्या कर्माचा कर्ता असून मला,अविनाशी परमेश्र्वरास अकर्ता असेच समज.

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।

इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ।।१४।।

न,माम्,कर्माणि,लिम्पन्ति,न,मे,कर्मफले,स्पृहा ।

इति,माम्,य:,अभिजानाति,कर्मभि:,न,स:,बध्यते ।।१४।।

कर्मफळाची मला कसलीच आकांक्षा नाही,ह्यामुळे मला कर्म स्पर्श करू शकत नाहीत,अशा प्रकारे जो मला तत्त्वतः जाणतो तो सुध्दा कर्माने बांधला जात नाही.

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूवैरपि मुमुक्षुभि: ।

कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वै: पूर्वतरं कृतम् ।।१५।।

एवम्,ज्ञात्वा,कृतम्,कर्म,पूवै:,अपि,मुमुक्षुभि: ।

कुरु,कर्म,एव,तस्मात्,पूर्वै:,पूर्वतरम्,कृतम् ।।१५।।

पूर्वकाळात मुमुक्षिंनी सुध्दा ह्याप्रकारे समजून कर्म केले आहे,ह्यासाठी तू सुध्दा पूर्वजांव्दारा नेहमी केलेली कर्मे कर.

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिता: ।

तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ।।१६।।

किम्,कर्म,किम,अकर्म,इति,कवय:,अपि,अत्र,मोहिता: ।

तत्,ते,कर्म,प्रवक्ष्यामि,यत्,ज्ञात्वा,मोक्ष्यते,अशुभात् ।।१६।।

कर्म काय आहे व अकर्म काय आहे? ह्याचा निर्णय करताना बुध्दीमान पुरुष सुध्दा मोहित होतात,ह्यासाठी ते कर्मतत्व मी तुला व्यवस्थित समजावून सांगेन,जे जाणून तू अशुभापासून अर्थात कर्मबंधनातून मुक्त होशील.

कर्मणो ह्यपि बोध्दव्यं बोध्दव्यं च विकर्मण: ।

अकर्मणश्र्च बोध्दव्यं गहना कर्मणो गति: ।।१७।।

कर्मण:,हि,अपि,बोध्दव्यम्,बोध्दव्यम्,च,विकर्मण: ।

अकर्मण:,च,बोध्दव्यम्,गहना,कर्मणा:,गति: ।।१७।।

कर्माचे स्वरूप सुध्दा जाणले पाहिजे व अकर्माचे स्वरूप सुध्दा जाणले पाहिजे,तसेच विकर्माचे स्वरूप सुध्दा जाणले पाहिजे,कारण कर्माची गति गहन आहे.

कर्मण्यकर्म य: पश्येदकर्मणि च कर्म य: ।

स बुध्दिमान्मनुष्येषु स युक्त: कृत्स्नकर्मकृत् ।।१८।।

कर्मणि,अकर्म,य:,पश्येत्,अकर्मणि,च,कर्म,य: ।

स बुध्दिमान्,मनुष्येषु,स:,युक्त:,कृत्स्नकर्मकृत् ।।१८।।

जो मनुष्य कर्मात अकर्म पहातो व जो अकर्मात कर्म पहातो,तो मनुष्य बुध्दीमान आहे व तोच योगी समस्त कर्म करणारा आहे.

यस्य सर्वे समारम्भा: कामसक्ङल्पवर्जिता: ।

ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहु: पण्डितं बुधा: ।।१९।।

यस्य,सर्वे,समारम्भा:,कामसंक्ङल्पवर्जिता: ।

ज्ञानाग्निदग्धकर्माणम्,तम्,आहु:,पण्डितम्,बुधा: ।।१९।।

ज्याचे संपूर्ण शास्त्र सम्मत कर्म हे बिना कामनेचे व संकल्प रहित असते,तसेच ज्याचे समस्त कर्म ज्ञानरूप अग्नीने भस्म झालेले आहे,त्या महापुरुषांना ज्ञानीजन सुध्दा पंडित असे म्हणतात.

त्यक्त्वा कर्मफलासग्ङं नित्यतृप्तो निराश्रय: ।

कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति स: ।।२०।।

त्यक्त्वा,कर्मफलासग्ङम्,नित्यतृप्त:,निराश्रय: ।

कर्मणि,अभिप्रवृत्त:अपि,न,एव,किञ्चित्,करोति,स: ।।२०।।

जे पुरुष समस्त कर्मात व त्यांच्या फळात आसक्तीचा सर्वथा त्याग करून संसारतुन आश्रयरहित झाला आहे व परमात्म्यात नित्य तृप्त आहे,तो सर्व कर्मांत पूर्णतया वर्तत असून (कर्म करीत असून) वास्तविक काही करत नाही.

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रह: ।

शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।।२१।।

निराशी,यतचित्तात्मा,त्यक्तसर्वपरिग्रह: ।

शारीरम्,केवलम्,कर्म,कुर्वन्,न,आप्नोति,किल्बिषम् ।।२१।।

ज्याचे अंत:करण व इंद्रियांसहित शरीर जिंकलेले आहे व ज्याने समस्त भोगाच्या सामग्रीचा परीत्याग केला आहे,असा आशारहित पुरुष केवळ शरीर-संबंधी कर्म करत असून सुध्दा त्यास पाप स्पर्श करू शकत नाही.

यदृच्छालाभसन्तुष्टो व्दन्व्दातीतो विमत्सर: ।

सम: सिध्दावसिध्दौ च कृत्वापि न निबध्यते ।।२२।।

यदृच्छालाभसन्तुष्ट:,व्दन्व्दातीत:,विमत्सर: ।

सम:,सिध्दौ,असिध्दौ,च,कृत्वा,अपि,न,निबध्यते ।।२२।।

जो इच्छारहित सहजपणे मिळालेल्या पदार्थात संतुष्ट रहातो,ज्याच्यात ईर्षेचा सर्वथा अभाव आहे,जो हर्ष-शोक आदि व्दंव्दानी सर्वथा (दूर) वेगळा आहे असा सिध्दी व असिध्दीमध्ये समदृष्टी असणारा कर्मयोगी कर्म करत असून सुध्दा बांधला जात नाही.

गतसग्ङस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतस: ।

यज्ञायाचरत: कर्म समग्रं प्रविलीयते ।।२३।।

गतसग्ङस्य,मुक्तस्य,ज्ञानावस्थितचेतस: ।

यज्ञाय,आचरत:,कर्म,समग्रम्,प्रविलीयते ।।२३।।

ज्याची आसक्ती सर्वथा नष्ट झाली आहे,ज्याने देहाभिमान व ममता हयाचा त्याग केला आहे,ज्याचे चित्त निरंतर परमात्मा ज्ञानात स्थिर झाले आहे,असा केवळ यज्ञ संपादन करण्यासाठी कर्म करणाऱ्या मनुष्याचे संपूर्ण कर्म सर्वथा विलीन होते.

ब्रहमार्पणं ब्रहम हविर्ब्रहमाग्नौ ब्रहमणा हुतम् ।

ब्रहमैव तेन गन्तव्यं ब्रहमकर्मसमाधिना ।।२४।।

ब्रहम,अर्पणम्,ब्रहम,हवि,ब्रहमाग्नौ,ब्रहमणा,हुतम् ।

ब्रहम,एव,तेन,गन्तव्यम्,ब्रहमकर्मसमाधिना ।।२४।।

ज्या यज्ञात अर्पण अर्थात स्त्रुवा वगैरे ब्रहम आहे व हवन केल्याजाण्यायोग्य द्रव्य सुध्दा ब्रहम आहे,तसेच ब्रहमरूप कर्ता-व्दारा ब्रहमरूप अग्नीत आहुती देण्यारूप क्रिया सुध्दा ब्रहम आहे.अश्या ब्रहमकर्मात स्थित राहणाऱ्या योग्यांव्दारा प्राप्त केले जाणारे फळ सुध्दा ब्रहम आहे.

दैवमेवापरे यज्ञं योगिन: पर्युपासते ।

ब्रहमाग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुहवति ।।२५।।

दैवम्,एव,अपरे,यज्ञम्,योगिन:,पर्युपासते ।

ब्रहमाग्नौ,अपरे,यज्ञम्,यज्ञेन,एव,उपजुहवति ।।२५।।

दुसरे योगीजन देवतांच्या पूजनरूप यज्ञाचे सुध्दा व्यवस्थित अनुष्ठान करतात व अन्य योगीजन परब्रहम परमात्मारूप अग्नीत अभेददर्शनरूप यज्ञाव्दांरा सुध्दां आत्मरूप यज्ञाचे हवन करतात.(परब्रहम परमात्म्यात ज्ञानव्दांरा ऐकीभावाने स्थित होणे हेच ब्रहमरूप अग्नीत यज्ञव्दांरा हवन करणे आहे.)

श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुहवति ।

शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियामाग्निषु जुहवति ।।२६।।

श्रोत्रादीनी,इन्द्रियाणि,अन्ये,संयमाग्निषु,जुह्वति ।

शब्दादीन्,विषयान्,अन्ये,इन्द्रियामाग्निषु,जुह्वति ।।२६।।

अन्य योगीजन श्रोत्र आदि समस्त इंद्रियांचे संयमरूप अग्नीत हवन करतात व दुसरे योगीजन शब्दादी समस्त विषयांना इंद्रियरूप अग्नीत हवन करतात

सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।

आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ।।२७।।

सर्वाणी,इन्द्रियकर्माणि,प्राणकर्माणि,च,अपरे ।

आत्मसंयमयोगाग्नौ,जुह्वति,ज्ञानदीपिते ।।२७।।

दुसरे योगीजन इंद्रियांच्या संपूर्ण क्रियांना व प्राण्याच्या समस्त क्रियांना ज्ञानाने प्रकाशित आत्मसंयमयोगरूप अग्नीत हवन करतात.(सच्चीदानंद परमात्म्याशिवाय अन्य कशाचेही चिंतन न करणे हेच सर्व हवन करणे आहे.)

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।

स्वाध्यायज्ञानयज्ञाश्र्च यतय: संशितव्रता: ।।२८।।

द्रव्ययज्ञा:,तपोयज्ञा:,योगयज्ञा:,तथा,अपरे ।

स्वाध्यायज्ञानयज्ञा:,च,यतय:,संशितव्रता: ।।२८।।

अनेक पुरुष द्रव्य संबंधी यज्ञ करणारे आहेत,कित्येक तपस्यारूप यज्ञ करणारे आहेत,कित्येक योगरूप यज्ञ करणारे आहेत,कित्येक अहिंसादि तीक्ष्ण व्रतांनी युक्त यत्नशील पुरुष स्वाध्यायरूप ज्ञानयज्ञ करणारे आहेत.

अपाने जुह्वति प्राणं प्राणऽपानं तथापरे ।

प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणा: ।।२९।।

अपरे नियताहारा: प्राणान्प्राणेषु जुह्वति ।

सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्पषा: ।।३०।।

अपाने,जुह्वति,प्राणम्,प्राणे,अपानम्,तथा,अपरे ।

प्राणापानगती,रुद्ध्वा,प्राणायामपरायणा: ।।२९।।

अपरे,नियताहारा:,प्राणान्,प्राणेषु,जुह्वति ।

सर्वे,अपि,एते,यज्ञविद:,यज्ञक्षपितकल्पषा: ।।३०।।

दुसरे कित्येक योगीजन प्राण वायुत अपान वायुचे हवन करतात,तसेच अन्य कित्येक नियमित आहार करणारे प्राणायामपरायण पुरुष प्राण व अपान गतीस रोखून प्राणांचे प्राणात हवन करतात,हे सर्व साधक यज्ञाव्दांरा पापाचा नाश करणारे व यज्ञांना जाणणारे आहेत.

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।

नायं लोकोsस्त्ययज्ञस्य कुतोsन्य: कुरुसत्तम ।।३१।।

यज्ञशिष्टामृतभुज:,यान्ति,ब्रह्म,सनातनम् ।

न,अयम्,लोक:,अस्ति,अयज्ञस्य,कुत:अन्य:,कुरुसत्तम ।।३१।।

हे करूश्रेष्ठ अर्जुन ! यज्ञात वाचलेले अमृताचा अनुभव करणारे योगी सनातन परब्रह्म परमात्म्यास जाऊन मिळतात,व यज्ञ न करणाऱ्या पुरुषांसाठी तर हा मनुष्यलोक सुध्दा सुखदायक नाही,तर परलोक कसा सुखदायक असेल?

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।

कर्मजान्विध्दि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ।।३२।।

एवम्,बहुविधा,यज्ञा:,वितता,ब्रह्मण:,मुखे ।

कर्मजान्,विध्दि,तान्,सर्वान्,एवम्,ज्ञात्वा,विमोक्ष्यसे ।।३२।।

अश्याप्रकारे आणखी सुध्दा बऱ्याच प्रकारांनी यज्ञ वेदांच्या वाणीमध्ये विस्ताराने सांगितले आहे,त्या सर्वांना तू मन,इंद्रिये व शरीर क्रियाव्दांरे संपन्न होणारे जाण,ह्याप्रकारे तत्वाने जाणून त्याच्या अनुष्ठानाने तू कर्मबंधनाने सर्वथा मुक्त होशील.

श्रेयान्द्रव्यमया**द्य**ज्ञाज्ज्ञानयज्ञ: परन्तप ।

सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।।३३।।

श्रेयान्,न्द्रव्यमयात्,यज्ञात्,ज्ञानयज्ञ:,परन्तप: ।

सर्वम्,कर्म,अखिलम्,पार्थ,ज्ञाने,परिसमाप्यते ।।३३।।

हे परंतप अर्जुन ! द्रव्यमय यज्ञाच्यापेक्षा ज्ञानयज्ञ अत्यंत श्रेष्ठ आहे,तसेच यावन्मात्र संपूर्ण कर्म ज्ञानाने समाप्त होतात.

तद्विध्दि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।

उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिन: ।।३४।।

तत्,विध्दि,प्रणिपातेन,परिप्रश्नेन,सेवया: ।

उपदेक्ष्यन्ति,ते,ज्ञानम्,ज्ञानिन,तत्त्वदर्शिन: ।।३४।।

ह्या ज्ञानास तू तत्वदर्शी ज्ञान्यांच्या जवळ जाऊन समजून घे,त्यांना सर्वार्थाने दंडवत-प्रणाम करण्याने,त्यांची सेवा करण्याने व कपट सोडून सरळपणे प्रश्न करण्याने ते परमात्मा तत्वास सर्वार्थाने जाणणारे ज्ञानी महात्मा तुला त्या तत्वज्ञानाचा उपदेश करतील.

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।

येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ।।३५।।

यत्,ज्ञात्वा,न,पुन:,मोहम्,एवम्,यास्यसि,पाण्डव ।

येन,भूतानि,अशेषेण,द्रक्ष्यसि,आत्मनि,अथो,मयि ।।३५।।

जे जाणून मग तू ह्याप्रकारे मोहित होणार नाहिस,तसेच हे अर्जुन ! ज्या ज्ञानाने तू संपूर्ण भूतांना नि:शेषभावाने प्रथम स्वतःत व नंतर मला अर्थात सच्चीदानन्दघन परमात्म्यास पाहशील.

अपि चेदसि पापेभ्य: सर्वेभ्य: पापकृत्तम: ।

सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि ।।३६।।

अपि,चेत्,असि,पापेभ्य:,सर्वेभ्य:,पापकृत्तम: ।

सर्वस्,ज्ञानप्लवेन्,एव,वृजिनम्,संतरिष्यसि ।।३६।।

जर तू अन्य सर्व पाप्यांत सुध्दा अधिक पाप करणारा असशील,तरी सुध्दा तू ज्ञानरूप नौकेतुन नि:संदेह संपूर्ण पाप-समुद्रातून विनासायास तरुन जाशील.

यथैधांसि समिध्दोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।

ज्ञानाग्नि: सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ।।३७।।

यथा,एधांसि,समिध्द,अग्नि,भस्मसात्,कुरुते,अर्जुन ।

ज्ञानाग्नि:,सर्वकर्माणि,भस्मसात्,कुरुते,तथा ।।३७।।

कारण हे अर्जुन ! जसे प्रज्वलित अग्नी इंधनास भस्ममय करून टाकतो,तसेच हि ज्ञानरूप अग्नि संपूर्ण कर्मांना भस्ममय करते,

न हि ज्ञानेन सद्दशं पवित्रमिह विध्यते ।

तत्स्वयं योगसंसिध्द: कालेनात्मनि विन्दति ।।३८।।

न,हि,ज्ञानेन,सद्दशम्,पवित्रम्,इह,विध्यते ।

तत्,स्वयम्,योगसंसिध्द:,कालेन,आत्मनि,विन्दति ।।३८।।

ह्या संसारात ज्ञानासारखे पवित्र करणारे नि:संदेह दुसरे काही नाही,त्या ज्ञानास बराच काळ कर्मयोगव्दारा शुध्द-अंतकरण झालेला मनुष्य आपल्या-आपणच आत्म्यात प्राप्त करतो.

श्रध्दावाँल्लभते ज्ञानं तत्पर: संयतेन्द्रिय: ।

ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ।।३९।।

श्रध्दावान्,लभते,ज्ञानम्,तत्पर:,संयतेन्द्रिय: ।

ज्ञानम्,लब्ध्वा,पराम्,शान्तिम्,अचिरेण,अधिगच्छति ।।३९।।

जितेंद्रिय,साधनपरायण व श्रध्दांवान मनुष्य ज्ञान प्राप्त करतो व ज्ञानप्राप्ती नंतर बिना-विलंब तत्काळच भगवतप्राप्तीरूप परमशांती प्राप्त करतो.

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनष्यति ।

नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मन: ।।४०।।

अज्ञ:,च,अश्रद्दधान:,च,संशयात्मा,विनष्यति ।

न,अयम्,लोक,अस्ति,न,पर:,न,सुखम्,संशयात्मन: ।।४०।।

विवेकहिन व श्रध्दारहित संशययुक्त मनुष्य परमार्थात अवश्य भ्रष्ट होतो,अश्या संशययुक्त मनुष्यासाठी ना हा लोक ना परलोक आहे ना सुख आहे.

योगसन्न्यस्तकर्माणं ज्ञानसञ्छन्नसंशयम् ।

आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय ।।४१।।

योगसन्न्यस्तकर्माणम्,ज्ञानसञ्छन्नसंशयम् ।

आत्मवन्तम्,न,कर्माणि,निबध्नन्ति,धनञ्जय ।।४१।।

हे संयमशील धनंजय ! ज्याने कर्मयोगाच्या विधीने समस्त कर्मांना परमात्म्यास अर्पण केले आहे व ज्याने विवेकाने समस्त संशयांचा नाश केला आहे,अश्या वश केलेल्या अन्तःकरणाच्या पुरुषांस कर्म बंधन असत नाही.

तस्मादज्ञानसम्भूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मन: ।

छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ।।४२।।

तस्मात्,अज्ञानसम्भूतम्,हृत्स्थम्,ज्ञानासिना,आत्मन: ।

छित्त्वा,एनम्,संशयम्,योगम्,आतिष्ठ,उत्तिष्ठ,भारत ।।४२।।

ह्यासाठी हे भरतवंशी अर्जुन ! तू हृदयात स्थित ह्या अज्ञानजनित आपल्या संशयाचा विवेकज्ञानरूप तलवारीने छेद कर,समत्वरूप कर्मयोगात स्थित हो व युध्दासाठी सज्ज हो.

ॐ तत्सदिति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्याय: ।।४।।

## **श्रीमदभगवदगीता अध्याय पाचवा**

## **“कर्मसंन्यासयोग”**

**कर्म संन्यास करणे अर्थात कर्माचा त्याग करण्यापेक्षा निश्कास कर्म श्रेष्ठ आहे ह्यावर भर दिला आहे.**

संन्न्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।

यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥

संन्न्यासम्,कर्मणाम्,कृष्ण,पुन:,र्योगम्,च,शंससि ।

यत्,श्रेय,एतयो,एकम्,तत्,मे,ब्रूहि,सूनिश्चितम् ॥१॥

अर्जुन म्हणाले - हे कृष्ण ! आपण कर्मांच्या संन्यासाची व परत कर्मयोगाची प्रशंसा करता,ह्यासाठी ह्या दोन्हीत सर्वार्थाने जे निश्चित कल्याणकारी माझ्यासाठी साधन आहे ते मला आपण सांगा.

संन्न्यास: कर्मयोगश्च नि:श्रेसकरावुभौ ।

तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२॥

संन्न्यास:,कर्मयोग:,च,नि:श्रेसकरी,उभौ ।

तयो:,तु,कर्मसन्न्यासात्,कर्मयोग:,विशिष्यते ॥२॥

श्रीभगवान म्हणाले - कर्मसंन्यास व कर्मयोग हे दोन्ही कल्याणकारी मार्ग आहेत,परंतु ह्या दोन्हीत सुध्दा कर्मसंन्यासाने कर्मयोग साध्य करणे सुलभ होण्यापेक्षा श्रेष्ठ आहे.

ज्ञेय: स नित्यसन्न्यासी यो न व्देष्टि न काङ्क्षति ।

निर्व्दन्व्दो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥३॥

ज्ञेय,स:,नित्यसन्न्यासी,य,न,व्देष्टि,न,काङ्क्षति ।

निर्व्दन्व्द,हि,महाबाहो,सुखम्,बन्धात्,प्रमुच्यते ॥३॥

हे अर्जुन ! जो पुरुष ना कशाचा व्देष करतो,ना कशाची आकांक्षा करतो,तो कर्मयोगी नेहमी संन्यासी समजणे योग्य आहे,कारण राग व्देषादि व्दंव्दरहित पुरुष सुखपूर्वक संसारबंधनातून मुक्त होतो.

सांङ्ख्ययोगौ पृथग्बाला: प्रवदन्ति न पण्डिता: ।

एकमप्यास्थित: सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥४॥

सांङ्ख्ययोग,पृथक्,बाला:,प्रवदन्ति,न,पण्डिता: ।

एकम्,अपि,आस्थित:,सम्यक्,उभयो:,विन्दते,फलम् ॥४॥

खरेतर संन्यास व कर्मयोगास मूर्खलोक हळूहळू व थोडेसे फळ देणारे आहे असे म्हणतात,पण पंडितलोक असे मानत नाहित,कारण दोन्हीपैकी एकात सर्वार्थाने योग्यप्रकारे स्थित पुरुष दोन्हीचे फळ प्राप्त करून परमात्म्यास जाऊन मिळतो.

यत्सांङ्ख्यै: प्राप्यते स्थानं त**द्योगै**रपि गम्यते ।

एकं सांङ्ख्यं च योगंच य: पश्यति स पश्यति ।।५।।

यत्,सांख्ये,प्राप्यते,स्थानम्,तत्,योगे,अपि,गम्यते ।

एकम्,सांङ्ख्यम्,च,योगंम्,च य:,पश्यति,स:,पश्यति ।।५।।

ज्ञानयोगी ज्या परमधामास जातात,तेच परमधाम कर्मयोगीसुध्दा प्राप्त करतात,ह्यासाठी जो पुरुष ज्ञानयोग व कर्मयोगाच्या फळास एकसारखे पाहतो,तोच योग्य दृष्टी ठेवतो.

सन्न्यासस्तु महाबाहो दु:खमाप्तुमयोगत: ।

योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति ।।६।।

सन्न्यास:,तु,महाबाहो,दु:खम,आप्तम्,अयोगत: ।

योगयुक्त,मुनि,ब्रह्म,नचिरेण,अधिगच्छति ।।६।।

परंतु हे महाबाहो ! कर्मयोगाशिवाय संन्यास अर्थात मन,इंद्रिय व शरीरव्दारा होणाऱ्या संपूर्ण कर्मांच्या कर्तेपणाचा त्याग प्राप्त होणे कठीण आहे व भगवत स्वरूपाचे मनन करणारा कर्मयोगी परब्रह्म परमात्म्यास शीघ्र जाऊन मिळतो.

योगयुक्तो विशुध्दात्मा विजितात्मा जितेन्द्रिय: ।

सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ।।७।।

योगयुक्त:,विशुध्दात्मा,विजितात्मा,जितेन्द्रिय: ।

सर्वभूतात्मभूतात्मा,कुर्वन्,अपि,न,लिप्यते ।।७।।

आपले मन ज्याला वश आहे,जो जितेंद्रिय तसेच विशुध्द अंतःकरणाचा आहे व संपूर्ण प्राण्यांचा आत्मरूप परमात्माच ज्याचा आत्मा आहे,असा कर्मयोगी कर्म करत असून सुध्दा त्यात लिप्त होत नाही.

नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्ववित् ।

पश्यञ्श्रृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ।।८।।

न,एव,किंञ्चित,करोमि,इति,युक्त:,मन्येत,तत्ववित् ।

पश्यन्,शृण्वन्,स्पृशन्,जिघ्रन्,अश्नन्,गच्छन्,स्वपन्,श्वसन् ।।८।।

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।

इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ।।९।।

प्रलपन्,विसृजन्,गृह्णन्,उन्मिषन्,निमिषन्,अपि ।

इन्द्रियाणि,इन्द्रियार्थेषु,वर्तन्ते,इति,धारयन् ।।९।।

तत्वांस जाणणारा सांख्ययोगी जसा बघताना,ऐकताना,स्पर्श करताना,वास घेताना,जेवताना,जाता-येताना,झोपताना,श्वास घेताना,बोलताना,त्याग करताना,ग्रहण करताना,तसेच डोळे उघडताना व बंद करताना,सर्व इंद्रिये आपले-आपले कार्य-करत आहेत,असे समजून नि:संदेह असे मानतो कि मी काहीच करत नाही.

ब्रहमण्याधाय कर्माणि सग्ङं त्यक्त्वा करोति य: ।

लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ।।१०।।

ब्रहमणि,आधाय,कर्माणि,सग्ङगम्,त्यक्त्वा,करोति,य: ।

लिप्यते,न,स:,पापेन,पद्मपत्रम्,अम्भसा ।।१०।।

ज्याप्रकारे कमळाच्या पानास पाण्याचा स्पर्श होत नाही,तसेच जो पुरुष सर्व कर्म परमात्म्यास अर्पण करून व आसक्तीचा त्याग करून कर्म करतो त्यास पाप स्पर्श करू शकत नाही.

कायेन मनसा बुध्दया केवलैरिन्द्रियैरपि ।

योगिन: कर्म कुर्वन्ति सग्ङं त्यक्त्वात्मशुध्दये ।।११।।

कायेन,मनसा,बुध्दया,केवलैरिन्द्रियैरपि ।

योगिन:,कर्म,कुर्वन्ति,सङगम्,त्यक्त्वा,आत्मशुध्दये ।।११।।

कर्मयोगी ममत्वबुध्दीरहित केवळ इंद्रिये,मन,बुध्दी व शरीरव्दारा सुध्दा आसक्तीचा त्याग करून अंतःकरणाच्या शुध्दीसाठी कर्म करतो.

युक्त: कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।

अयुक्त: कामकारेण फले सक्तो निबध्यते ।।१२।।

युक्त:,कर्मफलम्,त्यक्त्वा,शान्तिम्,आप्नोति,नैष्ठिकीम् ।

अयुक्त:,कामकारेण,फले,सक्त:,निबध्यते ।।१२।।

कर्मयोगी कर्माच्या फळाचा त्याग करून भागवतप्राप्तीरूप शान्ति प्राप्त करतो व सकाम-पुरुष कामनेच्या प्रेरणेने फळाच्या आसक्तीत गुंतून (बांधला जातो) राहातो.

सर्वकर्माणि मनसा सन्न्यस्यास्ते सुखं वशी ।

नवव्दारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ।।१३।।

सर्वकर्माणि,मनसा,संन्न्यस्य,आस्ते,सुखम्,वशी ।

नवव्दारे,पुरे,देही,न,एव,कुर्वन्,कारयन् ।।१३।।

ज्याचा अंतःकरणावर ताबा आहे असा सांख्ययोगाचे आचरण करणारा पुरुष न करता- न करवता सुध्दा नवव्दारे असणाऱ्या शरीररुपी घरात सर्व कर्मांचा मनाने त्याग करून,आनंदपूर्वक सच्चिदानन्दघन परमात्म्या स्वरुपात स्थित राहतो.

न कर्तुत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु: ।

न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ।।१४।।

न,कर्तुत्वम्,न,कर्माणि,लोकस्य,सृजति,प्रभु: ।

न,कर्मफलसंयोगम्,स्वभाव:,अस्तु,प्रवर्तते ।।१४।।

परमेश्र्वर मनुष्याच्या ना कर्तेपणाची,ना कर्माची,ना कर्मफळ प्राप्तीची (कल्पना) योजना करतो, खरेतर स्वभावानुसार सर्व घडते.

नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभु: ।

अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ।।१५।।

न,आदत्ते,कस्यचित्,पापम्,न,च,एव,सुकृतम्,विभुः ।

अज्ञानेन,आवृतम्,ज्ञानम्,तेन,मुह्यन्ति,जन्तवः ।।१५।।

नर हाच नारायण होतो,मानसिक बंधन म्हणजे त्याची गुलामगिरी होय.

सर्वव्यापी परमात्मा ना कोणाच्या पापाचे ना शुभकर्माचे ग्रहण करतो,खरेतर अज्ञानाने ज्ञान झाकले जाते,ज्याने सर्व अज्ञानी माणसे मोहित होतात.

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।

तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ।।१६।।

ज्ञानेन,तु,तत्,अज्ञानम्,येषाम्,नाशितम,आत्मनः ।

तेषाम्,आदित्यवत्,ज्ञानम्,प्रकाशयति,तत्परम् ।।१६।।

पण त्यांचे जे अज्ञान परमात्मा तत्वज्ञानाने नष्ट केले आहे,त्यांचे ते ज्ञान सूर्यासारखे त्या सच्चिदानन्दघन परमात्म्यास प्रकाशित करते.

तद्बुध्दयदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।

गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ।।१७।।

तद्बुध्दयः,तवात्मानः,तन्निष्ठाः,तत्परायणाः ।

गच्छन्ति,अपुनरावृत्तिम्,ज्ञाननिर्धूतकल्मषाः ।।१७।।

ज्यांचे मन तद्रूप होत आहे,ज्यांची बुध्दी तद्रूप होत आहे व सच्चिदानन्दघन परमात्माच ज्यांच्यात निरंतर एकिभावाने स्थित आहे,असे तत्परायण पुरुष ज्ञानमार्गाने पापरहित होऊन अपुनरावृत्ती अर्थात परमगतीस प्राप्त करतात.

विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।

शुनि चैव श्र्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ।।१८।।

विद्याविनयसम्पन्ने,ब्राह्मणे,गवि,हस्तिनि ।

शुनि,च,एव,श्वपाके,च,पण्डिता:,समदर्शिन: ।।१८।।

ते ज्ञानीजन वि**द्यावि**नययुक्त ब्राह्मण तसेच गाय,हत्ती,कुत्रा व चांडाळ ह्यांचात समदृष्टी ठेवतात.

इहैव तैर्जित: सर्गो येषां साम्ये स्थितं मन: ।

निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिता: ।।१९।।

इह:एव,तै,र्जित:,सर्ग:,येषाम्,साम्ये,स्थितम्,मन: ।

निर्दोषम्,हि,समम्,ब्रह्म,तस्मात्,ब्रह्मणि,ते,स्थिता: ।।१९।।

ज्यांचे मन समभावाने स्थित आहे,त्यांनी ह्या जिवित अवस्थेतच हा संपूर्ण संसार जिंकला आहे,कारण सच्चिदानन्दघन परमात्मा हा निर्दोष व सम आहे,ह्यामुळे ते सच्चिदानन्दघन परमात्मात स्थित आहेत.

न प्रहृयष्येत्प्रियं प्राप्य नोव्दिजेत्प्राप्य चाप्रियम् ।

स्थिरबुध्दिसम्मूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थित: ।।२०।।

न,प्रहृष्येत्,प्रियम्,प्राप्य,न,उव्दिजेत्,प्राप्य,अप्रियम् ।

स्थिरबुध्दि:,असंम्मूढो,ब्रह्मवित्,ब्रह्मणि,स्थित: ।।२०।।

जो पुरुष प्रिय गोष्ट प्राप्त झाल्यावर हर्षित होत नाहीत व अप्रिय वस्तू प्राप्त झाल्यावर उव्दिग्न होत नाहित,ते स्थिरबुध्दी,संशयरहित,ब्रह्मवेत्ता पुरुष सच्चिदानन्दघन परब्रह्म परमात्म्यात एकिभावाने नित्य स्थित आहेत.

बाहृयस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।

स ब्रह्मयोगयुक्तात्मासुखमक्षयमश्नुते ।।२१।।

बाहृयस्पर्शेषु,असक्तात्मा,विन्दन्ति,आत्मनि,यत्,सुखम् ।

स:,ब्रह्मयोगयुक्तात्मा,सुखम्,अक्षयम्,अश्नुते ।।२१।।

बाहृय विषयात आसक्तीरहित अंतःकरण असणारा साधक आत्म्यात स्थित जो ध्यानजनित सात्विक आनंद आहे,त्यास प्राप्त करतात,त्यानंतर ते सच्चिदानन्दघन परब्रह्म परमात्म्याच्या ध्यानरूप योगात अभिन्न भावाने स्थित पुरुष,अक्षय आनंदाचा अनुभव करतात.

ये हि संस्पर्शजा भोगा दु:खयोनय एव ते ।

आद्यन्तवन्त: कौन्तेय न तेषु रमते बुध: ।।२२।।

ये,हि,संस्पर्शजा:,भोगा:,दु:खयोनय,एव,ते ।

आद्यन्तवन्त:,कौन्तेय,न,तेषु,रमते,बुध: ।।२२।।

जे इंद्रिय व विषय ह्यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे भोग-योग आहेत,जे विषयी पुरुषांना सुखरूप वाटतात,परंतु तेच दु:खास कारणीभूत (दु:खाचा हेतू) आहेत,ज्यास आदि-अन्त असून अनित्य आहेत! म्हणून हे अर्जुन बुध्दीमान विवेकी पुरुष त्यात रममाण होत नाहित.

शक्नोतीहैव य: सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।

कामक्रोधोभ्दवं वेगं स युक्त: स सुखी नर: ।।२३।।

शक्नोति,इह,एव,य:,सोढुम्,प्राक्,शरीरविमोक्षणात् ।

कामक्रोधोद्भवम्,,वेगम्,स:,युक्त:,स:,सुखी,नर: ।।२३।।

जो साधक ह्या मनुष्य शरीरात,शरीराचा नाश होण्याआधीच काम-क्रोधाने उत्पन्न होणाऱ्या वेगास सहन करण्यास समर्थ होतो,तोच पुरुष योगी आहे व तोच सुखी आहे.

योऽन्त:सुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव य: ।

स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ।।२४।।

य,अन्त,सुख:,अन्तराराम:,तथा,अन्तर्ज्योति,एव,य: ।

स:,योगी,ब्रह्मनिर्वाणम्,ब्रह्मभूत:,अधिगच्छति ।।२४।।

ज्या पुरुषास अन्तरात्म्यातच सुख आहे,आत्म्यातच रममाण राहाणारा आहे,जो आत्मज्ञानी आहे,असा-सच्चिदानन्दघन,परब्रह्मपरमात्मास एकीभावाने प्राप्त योगी,शांत ब्रह्मप्राप्ती करतो.

लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषय: क्षीणकल्मषा: ।

छिन्नव्दैधा यतात्मान: सर्वभूतहिते रता: ।।२५।।

लभन्ते,ब्रह्मनिर्वाणम्,ऋषय:,क्षीणकल्मषा: ।

छिन्नव्दैधा,यतात्मान:,सर्वभूतहिते,रता: ।।२५।।

ज्यांचे सर्व पाप नष्ट झाले आहे,ज्यांचे सर्व संशय ज्ञानाने निवृत्त झाले आहेत,जे सर्व प्राण्यांच्या हितात रत आहेत व ज्यांचे जिंकलेले मन निश्र्चल भावाने परमात्म्यात स्थित आहे,ते ब्रह्मवेत्ते पुरुष शांत ब्रह्मप्राप्ती करतात.

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।

अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ।।२६।।

कामक्रोधवियुक्तानाम्,यतीनाम्,यतचेतसाम् ।

अभित:,ब्रह्मनिर्वाणम्,वर्तते,विदितात्मनाम् ।।२६।।

कामक्रोध रहित,जिंकलेल्या चित्ताचे,परब्रह्म परमात्म्याचा साक्षात्कार झालेल्या ज्ञानी पुरुषांसाठी सर्व बाजूंनी शांत परमात्माच परिपूर्ण आहे.

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्र्चक्षुश्र्चैवान्तरे भ्रुवो: ।

प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ।।२७।।

स्पर्शान्,कृत्वा,बहि:,बाह्यान्,चक्षु:,च,एव,अन्तरे,भ्रुवो: ।

प्राणापानौ,समौ,कृत्वा,नासाभ्यन्तरचारिणौ ।।२७।।

यतेन्द्रियमनोबुध्दिर्मुनिर्मोक्षपरायण: ।

विगतेच्छाभयक्रोधो य: सदा मुक्त एव स: ।।२८।।

यतेन्द्रियमनोबुध्दि:,मूनि:,मोक्षपरायण: ।

विगतेच्छाभयक्रोध:,य:,सदा,मुक्त:,एव,स: ।।२८।।

बाहेरच्या विषय भोगांचे न चिंतन करता त्यांना बाहेरच ठेऊन व नेत्रदृष्टी भृकुटी मध्यात ठेऊन तसेच नासिकेतून जाणाऱ्या प्राण व अपानवायूस सम करून,ज्यांनी इंद्रिय,मन व बुध्दी जिंकलेली आहे,असा जो मोक्षपरायण मुनि इच्छा,भय व क्रोधरहित झाला आहे (असतो),तो नेहमी मुक्तच आहे.

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्र्वरम् ।

सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।।२९।।

भोक्तारम्,यज्ञतपसाम्,सर्वलोकमहेश्वरम् ।

सुहृदम्,सर्वभूतानाम्,ज्ञात्वा,माम्,शान्तिम्,मृच्छति ।।२९।।

माझा भक्त मला सर्व यज्ञांचा भोक्ता सर्व लोकांच्या ईश्वराचा हि ईश्वर तसेच संपूर्ण भूत-प्राण्यांत सुहृदय अर्थात स्वार्थरहित दयाळु व प्रेमी,असे मला तत्वाने जाणून परमशान्ति प्राप्त करतो.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगो नाम पंचमोऽध्याय: ।।५।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय सहावा

## " आत्मसंयमयोग "

**आपली योग मार्गातील गती वाढविण्यासाठी काय करावे हयाचे विवरण आत्मसंयम योग हयात केले आहे.**

श्रीभगवानुउवाच

अनाश्रित: कर्मफलं कार्यं करोति य: ।

स सन्न्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रिय: ।।१।।

अनाश्रित:,कर्मफलम्,कार्यम्,करोति,य: ।

स,सन्न्यासी,च,योगी,च,न,निरग्नि,न,अक्रिय: ।।१।।

श्रीभगवान म्हणाले - जो पुरुष कर्मफळाचा आश्रय न करता करण्यायोग्य कर्म करतो,तो संन्यासी तथा योगी आहे व केवळ अग्निचा त्याग करणारा संन्यासी असत नाही तसेच केवळ क्रियांचा त्याग करणारा योगी असत नाही.

स सन्न्यासमिति प्राहुर्योगं तं विध्दि पाण्डव ।

न हयसन्न्यस्तसङ्कल्पो योगी भवति कश्चन ।।२।।

स:,सन्न्यासम,इति,प्राहू:,योगम्,तम्,विध्दि,पाण्डव ।

न,हि,असन्न्यस्तसंकल्प,योगी,भवति,कश्चन ।।२।।

मनाचा धर्म असलेल्या संकल्प व विकल्पाचा त्याग करणे, हे प्रथम आवश्यक आहे,मनोव्यापार थांबवणे अर्थात संन्यास होय.

हे पाण्डव ! ज्याला संन्यास असे म्हणतात,त्यासच तु योग समज,कारण संकल्पांचा त्याग न करणारा कोणीही योगी असत नाही.

आरूरक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।

योगारूढस्य तस्यैव शम: कारणमुच्यते ।।३।।

आरूरक्षो,मुने:,योगम्,कर्म,कारणम्,उच्यते ।

योगारूढस्य,तस्य,एव,शम:,कारणम्,उच्यते ।।३।।

मनोव्यापार थांबवून अर्थात संन्यस्थ होऊन,त्याहून सूक्ष्म अश्या चित्तवृत्ति परमात्म्याकडे लावणे म्हणजे योगारूढ होणे.

योगारूढ होण्याची इच्छा असणाऱ्या मननशील पुरुषांसाठी योगाच्या प्राप्तीसाठी निष्कामभावनेने कर्म करणे हा हेतु असल्याचे समजले जाते व योगारूढ झाल्यावर योगारूढ पुरुषांचा जो सर्वसंकल्पांचा अभाव आहे,तोच कल्याणाचा हेतू असे म्हणतात.

यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।

सर्वसक्ङल्पसन्न्यासी योगारूढस्तदोच्यते ।।४।।

यदा,हि,इन्द्रिया,अर्थेषु,न,कर्म,स्वनुष,उज्जते ।

सर्व,सक्ङल्प,संन्न्यासी,योगारूढस्तद,उच्यते ।।४।।

ज्या काळी,इंद्रियांचा भोग नसणे व ना कर्मात आसक्ती असणे,अश्या काळी सर्वसंकल्पांचा त्यागी पुरुष योगारूढ झाला असे समजले जाते.

उध्दरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।

आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मन: ।।५।।

उध्दरेत,आत्मना,आत्मानम्,न,आत्मानम,अवसादयेत् ।

आत्मा,एव,हि,आत्मन:,बन्धु:,आत्मा,एव,रिपु,आत्मन: ।।५।।

आपल्या व्दारा आपला संसार-सागरातून उध्दार करावा,आपणास अधोगतीकडे नेऊ नये,कारण मनुष्य हा स्वतः-स्वतःचा मित्र व स्वतः-स्वतःचा शत्रू आहे.

बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जित: ।

अनात्मनस्तु शत्रूत्वे वर्तेतात्मैव शत्रूवत् ।।६।।

बन्धु:,आत्मा,आत्मन:,तस्य,येन,आत्मा,एव,आत्मना,जित: ।

अनात्मन:,तु,शत्रूत्वे,वर्तेत,आत्मा,शत्रूवत् ।।६।।

स्व-स्वरूपाकडे जाणारा आपलाच मित्र व विरुध्द दिशेने जाणारा आपलाच शत्रू आहे.

ज्या जीवात्म्याव्दांरा मन व इंद्रियासहित शरीर जिंकलेले असते,त्या जीवात्म्याचा तो स्वतःच मित्र आहे व ज्या व्दांरे मन तसेच इंद्रियांसहित शरीर जिंकले गेले नाही,त्याच्यासाठी तो स्वतःसाठी शत्रूसारखे वागतो हे निश्चित !

जितात्मन: प्रशान्तस्य परमात्मा समाहित: ।

शीतोष्णसुखदु:खेषु तथा मानापमानयो: ।।७।।

जितात्मन:,प्रशान्तस्य,परमात्मा,समाहित: ।

शीतोष्णसुखदु:खेषु,तथा,मानापमानयो: ।।७।।

थंड-उष्ण व सुख दु:ख तसेच मान व अपमान कशातही ज्याच्या अंतःकरणाच्या वृत्ति पूर्णपणे शांत आहेत,.अश्या स्वाधीन आत्मा असणाऱ्या पुरुषाच्या ज्ञानांत सच्चिदानन्दघन परमात्मा पुर्णत: स्थित आहे,अर्थात त्याच्या ज्ञानांत परमात्म्याशिवाय अन्य काही नाही.

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रिय: ।

युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्जन: ।।८।।

ज्ञानविज्ञान,तृप्त,आत्मा,कूटस्थ,विजितेइन्द्रिय: ।

युक्त,इति,उच्यते,योगी,समलोष्टाश्मकाञ्जन: ।।८।।

ज्याचे अंतःकरण ज्ञान-विज्ञानाने तृप्त आहे,ज्याची स्थिती विकाररहित आहे,ज्याची इंद्रिये पूर्णपणे जिंकलेली आहेत व ज्याच्यासाठी दगड,माती व सोने एकसारखे आहेत,तो योगी “युक्त” अर्थात भगवदप्राप्त आहे असे समजले जाते.

सुह्रन्मित्रार्युदासीनमध्यस्थव्देष्यबन्धुषु ।

साधुष्वपि च पापेषु समबुध्दिर्विशिष्यते ।।९।।

सुह्रन्मित्रार्युदासीनमध्यस्थव्देष्यबन्धुषु ।

साधुषु,अपि,च,पापेषु,समबुध्दि:,विशिष्यते ।।९।।

सुहृद् (स्वार्थ नसणारा,पक्षपातरहित,दोन्ही बाजूंचे भले चिंतणारा) ,मित्र,वैरी,उदासीन,मध्यस्थ,व्देष्य व बंन्धुगणांत,धर्मात्त्म्यांत व पापीलोकांत सुध्दा समानभाव ठेवणारा अत्यंत श्रेष्ठ आहे.

योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थित: ।

एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रह: ।।१०।।

योगी,युञ्जीत,सततम्,आत्मानम्,रहसि,स्थित: ।

एकाकी,यतचित्तात्मा,निराशी:अपरिग्रह: ।।१०।।

मन व इंद्रियांसहित शरीरास आधीन ठेवणारा,आशारहित व संग्रहरहित योग्याने एकटेच-एकांत स्थानी स्थित होऊन आत्म्यास निरंतर परमात्म्याकडे लावावे.

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मन: ।

नातुच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ।।११।।

शुचौ,देशे,प्रतिष्ठाप्य,स्थिरम,आसनम,आत्मन: ।

न,अत्युच्छ्रितम्,अतिनीचम्,चैलाजिनकुशोत्तरम् ।।११।।

शुध्द भूमीवर,क्रमशः- कुशा,मृगाजीन व वस्त्र घालून,जे फार उंच नाही व फार खाली (खोल) नाही,तेथे आपले आसन स्थिर करावे.

तत्रैकाग्रं मन: कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रिय: ।

उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुध्दये ।।१२।।

तत्र,एकाग्रम्,मन:,कृत्वा,यतचित्तेन्द्रियक्रिय: ।

उपविश्य,आसने,युञ्जात्,योगम,आत्मविशुध्दये ।।१२।।

त्या आसनावर बसून चित्त व इंद्रियांची क्रिया स्वाधीन ठेऊन मनास एकाग्र करून अंतःकरणाच्या शुध्दिसाठी योगाचा अभ्यास करावा.

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिर: ।

सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ।।१३।।

समम्,कायशिरोग्रीवम्,धारयन्,अचलम्,स्थिर: ।

सम्प्रेक्ष्य,नासिकाग्रम्,स्वम्,दिश:,च,अनवलोकयन् ।।१३।।

शरीर डोके व गळा समान रेषेत व स्थिर धारण करावे व स्थिर होऊन,आपल्या नासिकेच्या अग्रभागी दृष्टि स्थिर लावावी,अन्य दिशांना न पाहता--

प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थित: ।

मन: संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर:।।१४।।

प्रशान्तात्मा,विगतभी,ब्रह्मचारिव्रते,स्थित: ।

मन:,संयम्य,मच्चित्त,युक्त:,आसीत,मत्पर:।।१४।।

ब्रह्मचाऱ्याच्या व्रतात स्थित,भयरहित तसेच सर्वतः (पूर्णत:) शान्त अंतःकारणाच्या सावधान योग्याने मनाला थांबवून माझ्यात चित्त असणारा व मत्परायण होऊन स्थित व्हावे.

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानस: ।

शान्ति निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ।।१५।।

युञ्जन्,एवम्,सदा,आत्मानम्,योगी,नियतमानस: ।

शान्तिम्,निर्वाणपरमाम्,मत्संस्थाम्,अधिगच्छति ।।१५।।

मनाला वश केलेला योगी ह्याप्रकारे आत्म्यास निरंतर माझ्या परमेश्वर स्वरूपाकडे लाउन,तो योगी माझ्यातील परमानंदाची पराकाष्ठा असलेली शांती मिळवितो.

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नत: ।

न चाति स्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ।।१६।।

न,अति,अश्नत:,तु,योग,अस्ति,न,च,एकान्तम्,अनश्नत: ।

न,च,अति,स्वप्नशीलस्य,जाग्रत:,न,एव,अर्जुन ।।१६।।

हे अर्जुन ! हा योग खूप खाणारा,बिलकुल न खाणारा,ना बिल्कुल झोपणारा व ना सदा जागणारा व ना केवळ कल्पनेत रममाण होणारा ह्यांनाच सिध्द होतो.

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।

युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दु:खहा।।१७।।

युक्ताहारविहारस्य,युक्तचेष्टस्य,कर्मसु ।

युक्तस्वप्नावबोधस्य,योगो,भवति,दु:खहा।।१७।।

दु:खांचा नाश करणारा योग यथायोग्य आहार-विहार करणारा,कर्म यथायोग्य करणारा व यथायोग्य झोपणे व जागणे असणाऱ्या अश्यांनाच सिध्द होतो.

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।

नि:स्पृह: सर्वकामेभ्या युक्त इत्युच्यते तदा ।।१८।।

यदा,विनियतम्,चित्तम्,आत्मनी,एव,अवतिष्ठते ।

नि:स्पृह:,सर्वकामेभ्य:,युक्त:,इति,उच्यते,तदा ।।१८।।

ज्या काळात अत्यंत वश असणारे चित्त परमात्म्यामध्ये पूर्णत: स्थित होते,त्या काळात संपूर्ण भोगासाठी (इच्छारहित) स्पृहारहित नि:स्पृह पुरुष योगयुक्त आहे,असे समजले जाते.

यथा दीपो निवातस्थो नेग्ङते सोपमा स्मृता ।

योगिनो यतचित्तस्य युज्जतो योगमात्मन: ।।१९।।

यथा,दीप,निवातस्थ,न,इग्ङते,उपमा,स्मृता ।

योगिनं,यतचित्तस्य,युज्जत:,योगम्,आत्मन: ।।१९।।

चित्त स्थिर झाल्यावर योग्यात आंतरिक बदल होतात जे बाहेर दिसत नाहित,हिच कुंडलिनी जागृतीची सुरवात असते ज्यास ***राधा***(धारा-प्रकृतिप्रवाह त्याउलट राधा) अवस्था समजतात.ह्या अवस्थेत मन,बुध्दी शरीर अवस्थेत अनेक बदल होतात.

ज्याप्रकारे वायुरहित स्थानी असलेला दिवा स्थिर असतो,तीच उपमा परमात्म्याच्या ध्यानात चित्त असलेल्या योग्याची असते असे समजले जाते.

यत्रोपरमते चित्तं निरुध्दं योगसेवया ।

यत्र चैवत्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ।।२०।।

यत्र,उपरमते,चित्तम्,निरुध्दम्,योगसेवया ।

यत्र,च,एव,आत्मना,आत्मानम्,पश्यन्न,आत्मनि,तुष्यति ।।२०।।

योगाच्या अभ्यासाने निरुध्द चित्त ज्या अवस्थेत निर्विकार होते व ज्या अवस्थेत परमात्म्याच्या ध्यानाने शुध्द झालेल्या सूक्ष्म बुध्दिव्दारा परमात्म्याच्या साक्षीने सच्चिदानन्दघन परमात्म्यात संतुष्ट राहाते.

सुखमात्यन्तिकं यत्तद्बुध्दिग्राह्यमतीन्द्रियम् ।

वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्र्चलति तत्वत: ।।२१।।

सुखम्,आत्यन्तिकम्,यत्त,तत्,बुध्दिग्राह्यम्,अतीन्द्रियम् ।

वेत्ति,यत्र,न,च,एव,अयम्,स्थित:,चलति,तत्वत: ।।२१।।

सु-चांगले,ख-आकाश सर्वाचे मूळ आकाशतत्व आहे,परमानंद सुख हे सामान्य व्यक्ती सहन करू शकत नाही उलट ते दु:खमय होऊ शकते,त्यासाठी योगाची परमअवस्था लागते,ह्या अवथेत हे सहन होऊ शकते व आनंददायी होते म्हणून ह्यास “सुख आत्यंतिक” असे म्हणतात.हि अवस्था अवस्थारहित आहे असे म्हणतात.

इंद्रियाच्या पलीकडे,केवळ शुध्द झालेल्या सूक्ष्म बुध्दिव्दारा ग्रहण करण्यायोग्य जो अनन्त आनंद आहे,त्या ज्या अवस्थेचा त्या योग्यास अनुभव येतो व ज्या अवस्थेत हा योगी परमात्म्याच्या स्वरूपापासून विचलित होतच नाही.

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।

यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ।।२२।।

यम्,लब्ध्वा,च,अपरम्,लाभम्,मन्यते,न,अधिकम्,ततः ।

यस्मिन्,स्थितः,न,दुःखेन,गुरुणा,अपि,विचाल्यते ।।२२।।

परमात्माप्राप्ती सोडून अधिक लाभ दुसरा कोणताही जो मानत नाही व परमात्माप्राप्तीरूप ज्या अवस्थेत स्थित योगी मोठ्या दुःखात सुध्दा डळमळत नाही.(ह्या योगविद्येत दुःख व संयोग-वियोग रहित अवस्थाच प्राप्त करणे हे ध्येय आहे.)

तं विद्याद् दुःखासंयोगवियोगं योगसञ्ज्ञितम् ।

स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ।।२३।।

तम्,विद्यात्,दुःखासंयोगवियोगम्,योगसञ्ज्ञितम् ।

सः,निश्चयेन,योक्तव्य,योगः,अनिर्विण्णचेतसा ।।२३।।

जो दुःखरूप संसाराच्या संयोगापासून वेगळा आहे,तसेच ज्याचे नाव योग आहे,त्यास जाणतो,असा योग न कंटाळता अर्थात धैर्य व उत्साहयुक्त चित्ताने निश्चयपूर्वक करणे आवश्यक - कर्तव्य आहे.

सङ्कल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।

मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ।।२४।।

सङ्कल्पप्रभवान्,कामान्,त्यक्त्वा,सर्वान्,शेषतः ।

मनसा,एव,इन्द्रियग्रामम्,विनियम्य,समन्ततः ।।२४।।

मनातील ग्रहण केलेले संस्कार स्थिर ग्रहण केल्याने प्रखर इच्छेने त्याच्या प्राप्तीसाठी काम निर्माण होतो,जसे व्यसन असलेला मनुष्य प्रयत्न करूनही व्यसन सोडू शकत नाही,म्हणून मनाने इंद्रियांचा

संयम करणे आवश्यक आहे,हे चित्तातील तरंग नष्ट करून शांत व उदित अशी चित्तावस्था कामरहित होते.

संकल्पातून उत्पन्न संपूर्ण कामनांचा नि:शेषरूपाने त्याग करून व मनाच्या व्दारे इंद्रियांच्या समुदायास सुध्दा सर्व बाजूंनी आवरून हा योग करणे आवश्यक आहे.

शनै: शनैरुपरमेद्बुध्दया धृतिगृहीतया ।

आत्मसंस्थं मन: कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत् ।।२५।।

शनै:,शनै:,उपरमेत,बुध्दया,धृतिगृहीतया ।

आत्मसंस्थम्,मन:,कृत्वा,न,किञ्चित्,अपि,चिन्तयेत् ।।२५।।

क्रमाक्रमाने अभ्यास करत उपरती होईल असा अभ्यास वाढवून तसेच धैर्ययुक्त बुध्दिने मनास परमात्म्यात स्थित करून परमात्म्याशिवाय दुसऱ्या कशाचे हि चिंतन न करणे.सर्व अशांतीचे मूळ मन आहे जे स्थिर करणे आवश्यक आहे,मनास उपनिषदात ***"लगाम"***अशी उपमा दिली आहे.

यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।

ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ।।२६।।

यत:,यत:,निश्चरति,मन:,चञ्चलम्,अस्थिरम् ।

तत:,तत:,नियम्य,एतत्,आत्मनि,एव,वशम्,नयेत् ।।२६।।

हे स्थिर न रहाणारे व चंचल मन ज्या ज्या शब्दादी विषयाच्या निमिताने संसाराकडे जाईल,त्या त्या विषयांना थांबवून अर्थात ते विषय मनातून हटवून त्यास सारखे सारखे परमात्म्यात लाऊन निरुध्द करणे होय.

प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।

उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ।।२७।।

प्रशान्तमनसम्,हि,एतम्,योगिनम्,सुखम्,उत्तमम् ।

उपैति,शान्तरजसम्,ब्रह्मभूतम्,अकल्मषम् ।।२७।।

कारण ज्याचे मन पूर्णत: शांत आहे,जो पापरहित व ज्याचा रजोगुण शांत झाला आहे,असा सच्चिदानन्दघन ब्रह्मात एकीभाव झालेला योगी उत्तम आनंद प्राप्त करतो.

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मष: ।

सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ।।२८।।

युञ्जन्,एवम्,सदा,आत्मानम्,योगी,विगतकल्मष: ।

सुखेन,ब्रह्मसंस्पर्शम्,अत्यन्तम्,सुखम्,अश्नुते ।।२८।।

तो पापरहित योगी ह्याप्रकारे निरंतर आत्म्यास परमात्म्यात लाऊन सुखपूर्वक परब्रह्म परमात्म्याच्या प्राप्तीने अनन्त आनंदाचा अनुभव घेतो.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।

ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शन: ।।२९।।

सर्वभूतस्थम्,आत्मानम्,सर्वभूतानि,च,आत्मनि ।

ईक्षते,योगयुक्तात्मा,सर्वत्र,समदर्शन: ।।२९।।

सर्वव्यापी अनंत चैतन्यात एकीभावाने स्थितीरूप योगाने युक्त आत्मा असणारा तसेच सगळ्यात समभावाने पाहणारा समदर्शी योगी आत्म्यास संपूर्ण भूतमात्रात स्थित व संपूर्ण भूतांना आत्म्यात कल्पित पाहतो.

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।

तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति।।३०।।

य:,माम्,पश्यति,सर्वम्,च,मयि,पश्यति ।

तस्य,अहम्,न,प्रणश्यामि,स,च,मे,न,,प्रणश्यति।।३०।।

जो पुरुष संपूर्ण भूतांत सर्वांच्या आत्मरूप मज वासुदेवास व्यापक पाहतो व संपूर्ण भूतांना माझ्या-वासुदेवाच्या अंतर्गत पाहतो,त्याच्यासाठी मी अदृश्य नसतो व तो माझ्यासाठी अदृश्य नसतो.

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थित: ।

सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ।।३१।।

सर्वभूतस्थितम्,य:,माम्,भजति,एकत्वम,अस्थित: ।

सर्वथा,वर्तमान,अपि,स,योगी,मयि,वर्तते ।।३१।।

जो पुरुष एकीभावाने स्थित होऊन संपूर्ण भूतांत आत्मरूपाने स्थित असून माझे-सच्चिदानन्दघन वासुदेवाचे भजन करतो,तो योगी सर्व प्रकारांनी वर्तत असून माझ्यातच वर्तत असतो.

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।

सुखं वा यदि वा दु:खं स योगी परमो मत: ।।३२।।

आत्मौपम्येन्,सर्वत्र,समम्,पश्यति,य:अर्जुन ।

सुखम्,वा,यदि,वा,दु:खम्,स:,योगी,परमा,मत: ।।३२।।

हे अर्जुन ! जो योगी आपल्या प्रमाणे संपूर्ण भूतांना सम पाहतो व सुख अथवा दु:खास सुध्दा सम पहातो,तो योगी परमश्रेष्ठ मानला जातो (जसे मनुष्य आपल्या शरीराबद्दल सुखदुखा:दि समान भाव ठेवतो तसेच इतरांबद्दल ठेवणे)

अर्जुन उवाच

योऽयं योगस्त्वया प्रोक्तं साम्येन मधुसूदन ।

एतस्याहं पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम् ।।३३।।

अयम्,योग:,त्वया,प्रोक्त:,साम्येन,मधुसूदन ।

एतस्य,अहम्,पश्यामि,चञ्चलत्वात्,स्थितिम्,स्थिराम् ।।३३।।

अर्जुन म्हणाले - हे मधुसूदन ! जो हा योग आपण समभावाचा सांगितला,पण मनाच्या चंचल स्थितीमुळे मी ह्याची नित्य स्थिती (साम्य-अवस्था) पाहू शकत नाही.

चञ्चलं हि मन: कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।

तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ।।३४।।

चञ्चलम्,हि,मन:,कृष्ण,प्रमाथि,बलवत्,दृढम् ।

तस्य,अहम्,निग्रहम्,मन्ये,वायो,इव,सुदुष्करम् ।।३४।।

कारण हे श्रीकृष्ण ! हे मन मोठे चंचल आहे,जे इंद्रियांना सुध्दा क्षुब्ध करते तसेच ते हट्टी,दृढ व बलवान आहे,त्यामुळे ह्यास वश करून त्यास रोकणे हे वायुस रोकण्यासारखे अत्यंत दुष्कर आहे.

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।

अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ।।३५।।

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।

अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ।।३५।।

वैराग्य अर्थात कशातही रुची न ठेवणे व त्यातून आनंद प्राप्तीची इच्छा न करणे,अनेक अरुची असलेल्या गोष्टी सतत सेवनाने रुची उत्पन्न करतात,तसाच अभ्यास मनासाठी करावा ज्याने मन वश होईल.

श्रीभगवान म्हणाले - हे महाबाहो ! नि:संदेह मन चंञ्चल आहे व कठीणतेने वश होते.परंतु हे कुंतीपुत्र अर्जुन ! हे अभ्यास व वैराग्याने वश करणे शक्य आहे.

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मति: ।

वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायत: ।।३६।।

असंयतात्मना,योगा,दुष्प्राप:,इति,मे,मति: ।

वश्यात्मना,तु,यतता,शक्य:,अवाप्तुम्,उपायत: ।।३६।।

ज्याने आपले मन वश केलेले नाही,अश्या पुरुषांव्दांरा योग दुष्प्राप्य आहे व वश केलेल्या मनाने प्रयत्नशील पुरुषास साधनेने हे प्राप्त करणे सहज शक्य आहे.असे माझे मत आहे.

अयति: श्रध्दयोपेतो योगोच्चलितमानस: ।

अप्राप्य योगसंसिध्दि कां गति कृष्ण गच्छति ।।३७।।

अयति:,श्रध्दया,उपेत्त,योगात्,चलितमानस: ।

अप्राप्य,योगसंसिध्दिम्,काम्,गतिम्,कृष्ण,गच्छति ।।३७।।

अर्जुन म्हणाले ! हे श्रीकृष्ण ! जो योगात श्रध्दा ठेवतो परंतु संयमी नाही,ह्याकारणाने ज्याचे मन अंतकाळी योगापासून ढळले-विचलित झाले आहे असा साधक योगाच्या सिध्दिस अर्थात भगवत साक्षात्कार प्राप्त न होता कोणत्या गतीस जातो.

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।

अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रहमण: पथि ।।३८।।

कच्चित्,न,उभयविभ्रष्ट,छिन्नाभ्रम,इव,नश्यति ।

अप्रतिष्ठ:,महाबाहो,विमूढ:,ब्रहमण:,पथि ।।३८।।

हे महाबाहो ! काय तो भगवतप्राप्तीच्या मार्गात मोहित व आश्रयरहित पुरुष छिन्न-भिन्न ढगासारखा दोन्ही बाजूंनी भ्रष्ट होऊन नष्ट तर होत नाही?

एतत्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषत: ।

त्वदन्य: संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ।।३९।।

एतत्,मे,संशयम्,कृष्ण,छेत्तुम्,अर्हसि,अशेषत: ।

त्वदन्य:,संशयस्य,अस्य,छेत्ता,न,हि,उपपद्यते ।।३९।।

हे श्रीकृष्ण ! माझा हा संशय संपूर्णपणे घालविण्यास आपणच योग्य आहात.कारण आपल्या शिवाय ह्या संशयाचे निराकारण करणारा मिळणे शक्य नाही.

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।

न हि कल्याणकृत्कश्चिदद्दुर्गति तात गच्छति ।।४०।।

पार्थ,न,एव,इह,न,अमुत्र,विनाश,अस्य,विद्यते ।

न,हि,कल्याणकृत,कश्चित्,दुर्गतिम्,तात,गच्छति ।।४०।।

श्री भगवान म्हणाले - हे पार्थ ! त्या पुरुषाचा ना ह्या लोकात नाश होतो ना परलोकात ! कारण हे प्रिय ! आत्मोध्दारासाठी अर्थात भगवतप्राप्तीसाठी कर्म करणारा कोणीही मनुष्य दुर्गतीस जात नाही.

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वती: समा: ।

शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।।४१।।

प्राप्य,पुण्यकृताम्,लोकान्,उषित्वा,शाश्र्वती:,समा: ।

शुचीनाम्,श्रीमताम्,गेहे,योगभ्रष्ट,अभिजायते ।।४१।।

योगभ्रष्ट पुरुष पुण्यवान लोकांत अर्थात स्वर्गात उत्तम लोकात जातो,तेथे बरीच वर्षे निवास करून नंतर शुध्द आचरण असणाऱ्या श्रीमान् पुरुषांच्या घरी जन्म घेतो.

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।

एतध्दि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।।४२।।

अथवा,योगिनाम,एव,कुले,भवति,धीमताम् ।

एतत्,हि,दुर्लभतरम्,लोके,जन्म,यत्,ईदृशम् ।।४२।।

अथवा वैराग्यवान पुरुष त्या लोकांत न जाता ज्ञानवान योग्यांच्या कुळात जन्म घेतो.परन्तु ह्याप्रकारचा जो जन्म आहे,तो ह्या संसारात नि:संदेह अत्यंत दुर्लभ आहे.

तत्र तं बुध्दिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।

यतते च ततो भूय: संसिध्दौ कुरुनन्दन ।।४३।।

तत्र,तम्,बुध्दिसंयोगम्,,लभते,पौर्वदेहिकम् ।

यतते,च,तत:,भूय:,संसिध्दौ,कुरुनन्दन ।।४३।।

तेथे त्यास पहिल्या शरीरात संग्रह केलेल्या बुध्दी संयोगास अर्थात समबुध्दीरूप योगाच्या संस्कारांची अनासायास प्राप्ती होते,हे कुरुनंदन ! त्याच्या प्रभावाने तो परत परमात्म्याच्या प्राप्तीरूप सिध्दीसाठी पहिल्यापेक्षा अधिक प्रयत्न करतो.

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि स: ।

जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।।४४।।

पूर्वाभ्यासेन,तेन,एव,ह्रियते,हि,अवश:,अपि,स: ।

जिज्ञासु,अपि,योगस्य,शब्दब्रह्म,अतिवर्तते ।।४४।।

तो (योगभष्ट पुरुष ) श्रीमानांच्या घरी जन्म घेणारा योगभ्रष्ट पराधीन असला तरी पहिल्या अभ्यासाने नि:संदेह भगवंताकडे आकर्षित होतो,तसेच समबुध्दी योगाचा जिज्ञासु उच्चअवस्थेकडे आकर्षित होतो,तसेच वेदांत सांगितलेल्या सकाम कर्मांचे उलंघन करून जातो.

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुध्दकिल्बिष: ।

अनेकजन्मसंसिध्दस्ततो याति परां गतिम् ।।४५।।

प्रयत्नात्,यतमानै,तु,योगी,संशुध्दकिल्बिष: ।

अनेकजन्मसंसिध्द:,तत:,याति,पराम्,गतिम् ।।४५।।

परंतु प्रयत्न पूर्वक अभ्यास करणारा योगी तर मागच्या अनेक जन्मांचे संस्कारबळाने ह्याच जन्मात संसिध्द होऊन,संपूर्ण पापरहित होऊन तात्काळ परमगतीस प्राप्त करतो.

तपस्विभ्योsधिको योगी ज्ञानभ्योsपि मतोsधिक: ।

कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ।।४६।।

तपस्विभ्य:,अधिक:,योगी,ज्ञानभ्य,अपि,मत:अधिक: ।

कर्मिभ्य,च,अधिक:योगी,तस्मात्,योगी,भव,अर्जुन ।।४६।।

योगी हा तपस्व्यांपेक्षा श्रेष्ठ आहे,शास्त्रज्ञानियांपेक्षा श्रेष्ठ समजला जातो व सकाम कर्म करणाऱ्यात सुध्दा योगी श्रेष्ठ आहे. म्हणून हे अर्जुन ! तू योगी हो !

योगिनामपि सर्वेषां मग्दतेनान्तरात्मना ।

श्रध्दावान्भजते यो मां स मे युक्ततमो मत: ।।४७।।

योगिनाम्,अपि,सर्वेषाम्,मदगतन,अन्तरात्मना ।

श्रध्दावान्,भजते,य,माम्,स:,मे,युक्ततम,मत: ।।४७।।

संपूर्ण योग्यांत सुध्दा जो श्रध्दावान योगी माझ्यात लावलेल्या अन्तरात्म्याने मला निरंतर भजतो,तो योगी मला परमश्रेष्ठ म्हणून मान्य आहे.(त्यास मी परमश्रेष्ठ मानतो)

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्याय: ।।६।।

# श्रीमदभगवदगीता अध्याय सातवा

## " ज्ञानविज्ञानयोग "

**ज्ञानातील सांख्यज्ञान अर्थात प्रकृतीचे ज्ञान व आपल्या पिंडधर्मानुसार सुयोग्य मार्गाने साधना करून ब्रहमज्ञान मिळविणे हेच विज्ञान आहे,ज्ञानी हा भगवंतास प्रिय असल्याचे आश्वासन दिले आहे.**

श्रीभगवानुवाच

मय्यासक्तमना: पार्थ योगं युञ्जन्मदाश्रय: ।

असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ।।१।।

मांय,आसक्तमना:,पार्थ,योगम्,युञ्जन्मदाश्रय: ।

असंशयम्,समग्रम्,माम्,यथा,ज्ञास्यसि,तत्,शृणु ।।१।।

हे पार्थ ! अनन्य प्रेमाने माझ्यात आसक्तीचित्त तसेच अनन्यभावाने मत्परायण होण्याच्या योगात माझ्या परमबुध्दीत मनाचा लय करण्यास लागलेला तू ज्याप्रकाराने संपूर्ण विभूति,बळ,ऐश्वर्यादि गुणांनी युक्त,सर्वांचे आत्मरूप असे मला संशयरहितकसे जाणशील,ते ऐक.

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषत: ।

यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ।।२।।

ज्ञानम्,ते,अहम्,सविज्ञानम्,इदम्,वक्ष्यामि,अशेषत: ।

यत्,ज्ञात्वा,न,इह,भूय:,अन्यत्,ज्ञातव्यम्,अवशिष्यते ।।२।।

मी तुझ्यासाठी ह्या तत्वज्ञानास विज्ञानासहित संपूर्णपणे सांगतो,जे जाणून संसारात परत काही जाणण्यायोग्य शेष राहात नाही.

मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिध्दये ।

यततामपि,सिध्दानां,कश्चिन्मां,वेत्ति,तत्वत: ।।३।।

मनुष्याणाम्,सहस्त्रेषु,कश्चित्,यतति,सिध्दये ।

यतताम्,अपि,सिध्दानाम्,कश्चित्,माम्,वेत्ति,तत्वत: ।।३।।

हजारो मनुष्यात कोणी एक (काहीच) माझ्या प्राप्तीसाठी यत्न करतात व त्या यत्न करणाऱ्या योग्यात सुध्दा कोणी एकच मत्परायण होऊन मला तत्वाने अर्थात यथार्थरूपाने जाणतो.

भूमिरापोऽनलो वायु: खं मनो बुध्दिरेव च ।

अहंक्ङार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ।।४।।

भूमि:,आप,अनल:,वायु:,खम्,मन:,बुध्दि:,एव,च ।

अहंक्ङार:,इति,इयम्,मे,भिन्ना,प्रकृति:,अष्टधा ।।४।।

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विध्दि मे पराम् ।

जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ।।५।।

अपरा,इयम्,इत:,तु,अन्याम्,प्रकृतिम्,विध्दि,मे,पराम् ।

जीवभूताम्,महाबाहो,यया,इदम्,धार्यते,जगत् ।।५।।

आकाश - आ - सर्वस्थित काश - आवरण,आकाश तत्व प्रकृतीचे अतिसूक्ष्म सर्वप्रथम स्पंदन आहे,जे स्थळ,काळ व देश रहित आहे.आकाशतत्वाची मुलावस्था शून्य आहे.वर्ण - निळा,गुण - नाद

वायू- वा - आश्चर्यकारक आयु: - अस्तित्व,वायु तत्व एकच वेळी सगळीकडे आहे,म्हणून ते भयानक वेगवान आहे.वर्ण - धुम्र,गुण - स्पर्श

आकाश व वायु तत्वाच्या मध्ये काळाची ऋण अवस्था आहे,

तेज - अतिजलद गति,प्र - पुढे पुढे जाणे,काश - आवरण , वर्ण - अग्निशिखा,गुण - आकार अथवा रूप

आप- अप् - प्राप्त करणे ,वर्ण - शुभ्र , गुण - रस ,भौतिक पदार्थाचा मूळ स्त्रोत

पृथ्वी- पृथु - वेगळे होणे,वी - जन्म घेणे,वर्ण - पिशंग,गुण - गंध (गं - गतिमानता,ध - विविध धारणाशक्ती,जडप्रकृति)

जड प्रकृति व त्यावरील पराप्रकृति(पुरुष) ह्यांनी सृष्टीव्यवहार चालतो.

माझी प्रकृति पृथ्वी,अग्नि,वायु,आकाश,मन,बुध्दी व अहंकार आठ प्रकारांनी विभाजित आहे,ह्या आठ प्रकारांचे भेद असलेली अपरा अर्थात माझी जड प्रकृति आहे व हे महाबाहो ! माझी दुसरी प्रकृति ज्याने हे सर्व जग धारण केले आहे त्यास जीवरुप अर्थात चेतन प्रकृति म्हणून जाण.

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।

अहं कृत्स्नस्य जगत: प्रभव: प्रलयस्तथा ।।६।।

एतद्योनीनि,भूतानि,सर्वाणि,इति,उपधारय ।

अहम्,कृत्स्नस्य,जगत:,प्रभव:,प्रलय:,तथा ।।६।।

हे अर्जुन ! तु असे समज कि संपूर्ण भूत ह्या दोन्ही प्रकृतिंनि उत्पन्न होणारे आहे व मी संपूर्ण जगताचा प्रभव व प्रलय आहे अर्थात संपूर्ण जगताचे मूलकारण आहे.

मत्त: परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय ।

मयि सर्वमिदं प्रोक्तं सूत्रे मणिगणा इव ।।७।।

मत्त:,परतरम्,न,अन्यत्,किंञ्चित्,अस्ति,धनञ्जय ।

मयि,सर्वम्,इदम्,प्रोतम्,सूत्रे,मणिगणा:,इव ।।७।।

हे धनञ्जय ! माझ्याशिवाय भिन्न दुसरे कोठलेच परम कारण नाही ! हे संपूर्ण जगत सूत्रात सूत्राच्या मण्यांसारखे माझ्यात गोवलेले आहे.

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययो: ।

प्रणव: सर्ववेदेषु शब्द: खे पौरुषं नृषु ।।८।।

रस:,अहम,अप्सु,कौन्तेय:,प्रभा,अस्मि,शशिसूर्ययो: ।

प्रणव:,सर्ववेदेषु,शब्द:,खे,पौरुषम्,नृषु ।।८।।

हे अर्जुन ! मी जलात रस,चंन्द्रमा व सूर्यात प्रकाश आहे,संपूर्ण वेदांत ॐकार आहे,आकाश,शब्द व पुरुषात पुरुषत्व आहे.

पुण्यो गन्ध: पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।

जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ।।९।।

पुण्य:,गन्ध:,पृथिव्याम्,च,तेज:,अस्मि,विभावसौ ।

जीवनम्,सर्वभूतेषु,तप:,च,अस्मि,तपस्विषु ।।९।।

मी पृथ्वीत पवित्र (तन्मात्रांचे ग्रहण ) गन्ध व अग्नित अतितेज गती आहे,तथा संपूर्ण भूतांत त्यांचे जीवन आहे,तपस्वींचे तेज मीच आहे.

बीजं मां सर्वभूतानां विध्दि पार्थ सनातनम् ।

बुध्दिर्बुध्दिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।।१०।।

बीजम्,माम्,सर्वभूतानाम्,विध्दि,पार्थ,सनातनम् ।

बुध्दि:,र्बुध्दिमताम्,अस्मि,तेजस्विनाम्,अहम् ।।१०।।

हे अर्जुन ! तु संपूर्ण भूतांचे सनातन बीज मलाच समज,मीच बुध्दीमान्यांची बुध्दी व तेजस्वीयांचे तेज आहे.

बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।

धर्माविरुध्दो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ।।११।।

बलम्,बलवताम्,चाहम्,कामरागविवर्जितम् ।

धर्माविरुध्दो:,भूतेषु,काम,अस्मि,भरतर्षभ ।।११।।

हे भरतश्रेष्ठ ! बलवानांचे आसक्ती व कामनारहित बळ अर्थात सामर्थ्य मीच आहे व सर्व भूतांत धर्मास अनुकूल अर्थात शास्त्रास अनुकूल काम मीच आहे.

ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।

मत्त एवेति तान्विध्दि न त्वहं तेषु मयि ।।१२।।

ये,च,एव,सात्विका:,भावा:,राजसा:,तमसा:,च,ये ।

मत्त,एव,इति,तान्,विध्दि,न,तु,अहम्,तेषु,ते,मयि ।।१२।।

जो सत्वगुणातून उत्पन्न होणारा भाव आहे, व जो रजोगुणांतुन तथा तमोगुणातुन उत्पन्न भाव आहे,त्या " सर्वास तू माझ्यातूनच होणारा " असे जाण,परंतु वास्तविक त्यांच्यात मी व ते (गुण) माझ्यात नाहीत.

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।

मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ।।१३।।

त्रिभिः,गुणमयैः,भावैः,एभिः,सर्वम्,इदम्,जगत् ।

मोहितम्,न,अभिजानाति,माम्,ऐभ्यः,परम्,अव्ययम् ।।१३।।

गुणांच्या कार्यरूप सात्विक,राजस व तामसी ह्या तीनही प्रकारच्या भावांनी हा सारा संसार मोहित होत आहे,ह्यासाठी ह्या तीनही गुणांच्या पलीकडील,मला अविनाशी म्हणून जाणत नाहीत.

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।

मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।।१४।।

दैवी,हि,एषा,गुणमयी,मम,माया,दुरत्यया ।

माम्,एव,ये,प्रपद्यन्ते,मायाम्,एताम्,तरन्ति,ते ।।१४।।

कारण हि अलोकिक अर्थात अति अभ्दुत त्रिगुणात्मक माया मोठी दुस्तर आहे,परंतु जो पुरुष केवळ माझे निरंतर भजन करतो,तो ह्या मायेचे उल्लंघन करतो तोच संसारातून तरून जातो.

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।

माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ।।१५।।

न,माम्,दुष्कृतिनः,मूढाः,प्रपद्यन्ते नराधमाः ।

मायया,अपहृतज्ञानाः,आसुरम्,भावम,आश्रिताः ।।१५।।

मायेमुळे ज्यांचे ज्ञान हरण झाले आहे अश्या असुर-स्वभावास धारण केलेल्या मनुष्यात नीच,दुषित कर्म करणारे मुढ़लोक माझे भजन करत नाहीत.

चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।

आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ।।१६।।

चतुर्विधा:,भजन्ते,माम्,जना:,सुकृतिन:,अर्जुन ।

आर्त:,जिज्ञासु,अर्थार्थी,ज्ञानी,च,भरतर्षभ ।।१६।।

हे भरतवंशीयात श्रेष्ठ अर्जुन ! उत्तम कर्म करणारे अर्थार्थी,आर्त,जिज्ञासु व ज्ञानी असे चार प्रकारचे भक्तजन मला भजतात.

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।

प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रिय: ।।१७।।

तेषाम्,ज्ञानी,नित्ययुक्त:,एकभक्ति,विशिष्यते ।

प्रिय:,हि,ज्ञानिन:,अत्यर्थम,अहम्,स:,च,मम,प्रिय: ।।१७।।

त्यात नित्य माझ्यात एकीभावाने स्थित अनन्य प्रेमभक्ति असणारा ज्ञानी भक्त अति उत्तम आहे,कारण मला तत्वाने जाणणाऱ्या ज्ञानी लोकांस मी अतिशय प्रिय आहे व तो ज्ञानी मला सुध्दा अत्यंत प्रिय आहे.

उदारा: सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।

आस्थित: स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ।।१८।।

उदारा:,सर्व,एव,एते,ज्ञानी,तु,आत्मा,एव,अनुत्तमाम्,गतिम् ।

आस्थित:,स,हि,युक्तात्मा,माम्,एव,अनुत्तमाम्,गतिम् ।।१८।।

ते सर्व उदार (उत्तम) आहेत,परंतु ज्ञानी तर साक्षात माझे स्वरूपच आहे,असे माझे मत आहे,कारण मद्गत (माझ्यासारखी) मन-बुध्दी असणारा ज्ञानी भक्त अति उत्तम गतिस्वरूप माझ्यातच स्थित आहे.

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवाम्नां प्रपद्यते ।

वासुदेव: सर्वमिति स महात्मा सुदुर्लभ: ।।१९।।

बहूनाम्,जन्मनाम्,अन्ते,ज्ञानवान्,माम्,प्रपद्यते ।

वासुदेव:,सर्वम्,इति,स:,महात्मा,सुदुर्लभ: ||१९||

बऱ्याच जन्मांनंतर तत्वज्ञानास प्राप्त पुरुष,सर्व काही वासुदेव आहे-अशारितीने मला जाणतो-भजतो,तो महात्मा अत्यंत दुर्लभ आहे.(संसारिक सुखासाठी,संकटात,मला यथार्थरूपाने जाणण्यास असे भक्त आहेत)

कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना: प्रपद्यन्तेऽन्यदेवता: ।

तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियता: स्वया ||२०||

कामै:,तै:,तै:,हृतज्ञाना:,प्रपद्यन्ते,अन्यदेवता: ।

तम्,तम्,नियमम्,आस्थाय,प्रकृत्या,नियता:,स्वया ||२०||

त्या-त्या भोगांच्या कामनेव्दांरा ज्यांचे ज्ञान नाहिसे झाले आहे,ते लोक आपल्या स्वभावाने प्रेरित होऊन,तो तो नियम धारण (योग्य समजून) करतात व अन्य देवतांना भजतात अर्थात पूजतात.

यो यो यां यां तनुं भक्त: श्रध्दयार्चितुमिच्छति ।

तस्य तस्याचलां श्रध्दां तामेव विदधाम्यहम् ||२१||

य:,य:,याम्,याम्,तनुम्,भक्त:,श्रध्दया,अर्चितुम्,इच्छति ।

तस्य,तस्य,अचलाम्,श्रध्दाम्,ताम्,एव,विदधामी,अहम् ||२१||

जो जो सकाम भक्त ज्या ज्या कामनेने देवतेच्या स्वरूपाचे श्रध्देने पूजन करण्याची इच्छा करतो,त्या-त्या भक्ताची श्रध्दा मी त्या देवतेच्या प्रति स्थिर करतो.

स तया श्रध्दया युक्तस्तस्याराधनमीहते ।

लभते च तत: कामान्मयैव विहितान्हि तान् ||२२||

स,तया,श्रध्दया,युक्त:,तस्य,आराधनम्,ईहते ।

लभते,च,तत:,कामान्,मया,एव,विहितान्,हि,तान् ||२२||

तो पुरुष त्या श्रध्देने युक्त होऊन त्या देवतेचे पूजन करतो व माझ्याकडूनच निश्चित केलेल्या इच्छित भोगांना नि:संदेह त्या देवतेकडून प्राप्त करतो.

अन्तवत्तु फलं तेषां तभ्दवत्यल्पमेधसाम् ।

देवान्देवयजो यान्ति मभ्दक्ता यान्ति मामपि ।।२३।।

अन्तवत्त,तु,फलम्,तेषाम्,तत्,भवति,अल्पमेधसाम् ।

देवात्,देवयजो,यान्ति,मदभक्ता,यान्ति,माम्,अपि ।।२३।।

पण त्या अल्प बुध्दि असणाऱ्यांचे फळ नाशवान आहे,तसेच ते देवतांचे पूजन करणारे देवतांनाच जाऊन मिळतात. व माझे भक्त कसे हि माझे भजन करोत अंतिमता ते मलाच येऊन मिळतात.

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यते मामबुध्दय: ।

परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ।।२४।।

अव्यक्तम्,व्यक्तिम,आपन्नम्,मन्यते,माम्,अबुध्दय: ।

परम्,भावम्,अजानन्तो,मम,अव्ययम्,अनुत्तमम् ।।२४।।

बुध्दिहीन पुरुष माझ्या अविनाशी परम भावास न जाणता मन-इंद्रिये ह्यांच्या पलीकडे असलेल्या माझ्या सच्चिदानन्दघन परमात्मा स्वरूपास मनुष्यासारखा जन्म घेऊन व्यक्तीभावास प्राप्त झाल्याचे मानतात.

नाहं प्रकाश: सर्वस्य योगमायासमावृत: ।

मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।।२५।।

न,अहम्,प्रकाश:,सर्वस्य,योगमायासमावृत: ।

मूढो:अयम्,न,अभिजानाति,लोक:,माम्,अजम्,अव्ययम् ।।२५।।

आपल्या योगमायेने लपलेला मी सगळ्यांना दिसू शकत नाही,म्हणून हा अज्ञानी जनसमुदाय माझ्या जन्मरहित अविनाशी परमेश्र्वर स्वरूपास जाणत नाही,अर्थात मला जन्म-मृत्यु असलेला समजतो.

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।

भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्र्चन ।।२६।।

वेद,अहम्,समतीतानि,वर्तमानानि,च,अर्जुन ।

भविष्याणि.च,भूतानि,माम्,तु,वेद,न,कश्र्चन ।।२६।।

हे अर्जुन ! पूर्वी झालेल्या,आता वर्तमानात असलेल्या व पुढे येणाऱ्या सर्व भूतमात्रास मी जाणतो,परंतु श्रध्दा भक्तिरहित पुरुष मला जाणत नाही.

इच्छाव्देषसमुत्थेन व्दन्व्दमोहेन भारत ।

सर्वभूतानि सम्मोहं सर्गे यान्ति परन्तप ।।२७।।

इच्छाव्देषसमुत्थेन,व्दन्व्दमोहेन,भारत ।

सर्वभूतानि,सम्मोहम्,सर्गे,यान्ति,परन्तप ।।२७।।

हे भरतवंशी अर्जुन ! संसारात इच्छा व व्देषांनी उत्पन्न सुख-दु:खादि व्दन्व्दरूप-मोहाने संपूर्ण प्राणी अत्यंत अज्ञानास प्राप्त होत आहेत.

येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।

ते व्दन्व्दमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रता: ।।२८।।

येषाम्,तु,अन्तगतम्,पापम्,जनानाम्,पुण्यकर्मणाम् ।

ते,व्दन्व्दमोहनिर्मुक्ता,भजन्ते,माम्,दृढव्रता: ।।२८।।

परंतु निष्काम भावाने श्रेष्ठ कर्मांचे आचरण करणाऱ्या ज्या पुरुषांचे पाप नष्ट झाले आहे,ते राग व्देषजनित व्दन्व्दरूप मोहापासून मुक्त दृढ निश्र्चयि भक्त मला सर्वप्रकारे भजतात.

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।

ते ब्रह्म तव्दिदु: कृत्स्त्रमध्यात्मं कर्म चाखिलम् ।।२९।।

जरामरणमोक्षाय,माम्,आश्रित्य,यतन्ति,ये ।

ते,ब्रह्म,तत्,विदु:,कृत्स्त्रम,अध्यात्मम्,कर्म,च,अखिलम् ।।२९।।

जे मला शरण होऊन जरा-मरणापासून मुक्त होण्यासाठी यत्न करतात,ते पुरुष त्या ब्रह्मास,संपूर्ण अध्यात्मास,संपूर्ण कर्मास जाणतात.

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदु: ।

प्रयाणकालऽपि च मां ते विदुर्युक्तचेतस: ।।३०।।

साधिभूताधिदैवम्,माम्,साधियज्ञम्,च,ये,विदु: ।

प्रयाणकाले,अपि,च,माम्,ते,विदु,युक्तचेतस: ।।३०।।

जे पुरुष अधिभूत व अधिदैविक तसेच अधियज्ञासहित (सर्वांचे आत्मरूप) मला अन्तकाळी सुध्दा जाणतात,असे युक्तचित्त असणारे पुरुष,मला जाणतात,अर्थात मला येऊन मिळतात.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्याय: ।।७।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय आठवा

## “ अक्षरब्रह्मयोग “

**ब्रह्म,अध्यात्म,कर्म,अधिदेव,अधिभूत व अधियज्ञ कोणाला म्हणतात,व साधना मार्ग कसा असावा,पुनर्जन्म व दिव्य अनुभव ह्याचे विवरण केले आहे.**

अर्जुन उवाच

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं कर्म पुरुषोत्तम ।

अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ।।१।।

किम्,तत्,ब्रह्म,किम,अध्यात्मम्,कर्म,पुरुषोत्तम ।

अधिभूतम्,च,किम्,प्रोक्तम्,अधिदैवम्,किम्,उच्यते ।।१।।

अर्जुन म्हणाले - हे पुरुषोत्तम ! ते ब्रह्म काय आहे? अध्यात्म काय आहे? कर्म काय आहे?अधिभूत (नावाने) काय सांगितले आहे? व अधिदेव कशाला म्हणतात? जे योग्य तेच सांगा!

अधियज्ञ: कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।

प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभि:।।२।।

अधियज्ञ:,कथम्,क:,अत्र,देहे,अस्मिन,मधुसूदन ।

प्रयाणकाले,च,कथम्,ज्ञेय:,असि,नियतात्मभि:।।२।।

मधुसूदन -- (वर-वर चांगल्या वाटणाऱ्या गोष्टी अध्यात्मिक उन्नती साठी वाईट असतात त्यांचा नाश करणारा )

हे मधुसूदन ! येथे अधियज्ञ काय आहे ? व तो ह्या शरीरात कसा आहे? तथा युक्तचित्तवाल्या पुरूषांव्दारा अन्त समयी तुम्ही कोठल्या प्रकारे जाणले जाता?

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।

भूतभावोभ्दवकरो विसर्ग: कर्मसञ्ज्ञित: ।।३।।

अक्षरम्,ब्रह्म,परमम्,स्वभाव:,अध्यात्मम्,उच्यते ।

भूतभवोद्भवकर:,विसर्ग:,कर्मसञ्ज्ञित: ।।३।।

अक्षर - नाश न होणारा,स्व - मूळअवस्था,भाव - अर्थात तसे होणे,स्वभाव - आहे तसा व्यवहार,भूतभाव - भूतांचा मूळस्वभाव.

श्रीभगवान म्हणाले- परम अक्षर ब्रह्म आहे,आपले स्वरूप अर्थात जीवात्मा “ अध्यात्म “ नावाने सांगितला जातो तसेच भूतभावास उत्पन्न करणारा जो (व्यापार) त्याग आहे.तेच “ ***कर्म*** “ नावाने सांगितले आहे.

अधिभूतं क्षरो भाव: पुरुषश्चाधिदैवतम् ।

अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ।।४।।

अधिभूतम्,क्षर:,भाव:,पुरुष:,च,आधिदैवतम् ।

अधियज्ञ:,अहम्,एव,अत्र,देहे,देहभृताम्,वर ।।४।।

उत्पत्ती विनाश धर्म-असणारे सर्व पदार्थ अधिभूत आहेत,हिरण्यगर्भ (मुळमाया -तोच मूळपुरुष) पुरुष (ज्यास शास्त्रात “सूत्रात्मा”,”हिरण्यगर्भ”,”प्रजापती “ ब्रह्मा” ह्या नावाने निर्देशित केले आहे) अधिदेव आहे व हे देहधाऱ्यात श्रेष्ठ अर्जून ! ह्या शरीरात “मी” वासुदेवच अंतर्यामीरूपाने अधियज्ञ आहे.

अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।

य: प्रयाति स मभ्दावं याति नास्त्यत्र संशय: ।।५।।

अन्तकाले,च,माम्,एव,स्मरन्,मुक्त्वा,कलेवरम् ।

य:,प्रयाति,स:,मदभाववम्,याति,न,अस्ति,अत्र,संशय: ।।५।।

जो पुरुष अन्तःकाळात सुध्दा मला स्मरण करून शरीराचा त्याग करतो,तो माझ्या साक्षात स्वरूपास प्राप्त होतो.ह्यात थोडाही संशय नाही.

यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।

तं तमेवैति कौन्तेय सदा तभ्दावभावित: ।।६।।

यम्,यम्,वा,स्मरन्,भावम्,त्यजति,अन्ते,कलेवरम् ।

तम्,तम्,एव,एति,कौन्तेय,सदा,तद्भावभावित: ।।६।।

हे कुन्तीपुत्र अर्जुन ! हा मनुष्य अंतःकाळात ज्या-ज्या भावाने स्मरण करत शरीराचा त्याग करतो,तो त्यालाच प्राप्त होतो,कारण तो सदाच त्या भावाने (भावनेने) भावित असतो.

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्द च ।

मय्यर्पितमनोबुध्दिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।७।।

तस्मात्,सर्वेषु,कालेषु,माम्,अनुस्मर,युध्द,च ।

मयो,अर्पितमनोबुध्दि:,माम्,एव,एष्यसि,असंशयम् ।।७।।

ह्यासाठी हे अर्जुन ! तू सर्व समयी निरंतर माझे स्मरण कर व युध्द (वृत्तियुध्द) सुध्दा कर.ह्याप्रकारे मला अर्पण केलेल्या मन बुध्दीने युक्त होऊन नि:संदेह मलाच प्राप्त होशील.मी तोच परमात्मा आहे जो तुझ्यातही आहे.

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।

परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ।।८।।

अभ्यासयोगयुक्तेन,चेतसा,नान्यगामिना ।

परमम्,पुरुषम्,दिव्यम्,याति,पार्थ,अनुचिन्तयन् ।।८।।

हे पार्थ ! हा नियम आहे कि परमेश्वराच्या अभ्यासरूप योगाने युक्त,दुसरीकडे न जाणाऱ्या चित्तास निरंतर चिंतन करत असलेला मनुष्य परमप्रकाशरूप दिव्य पुरुषास अर्थात परमेश्वरासच प्राप्त होतो.

कविं पुराणमनुशासितार मणोरणीयांसमनुस्मरेद्य: ।

सर्वस्य धातारमचिन्त्यरूप मादित्यवर्णं तमस: परस्तात् ।।९।।

कविम्,पुराणम्,अनुशासितारम्,अणो:,अणीयांसम्,अनुस्मरेत,य: ।

सर्वस्य,धातारम्,अचिन्त्यरूपम्,आदित्यवर्णम्,तमस:,परस्तात् ।।९।।

जो पुरुष सर्वज्ञ,अनादि,सर्वांचा नियंता (अंतर्यामीरूपाने सर्व प्राण्यांना शुभ-अशुभ कर्मानुसार शासन करणारा) सर्वात सूक्ष्म,सर्वांचे धारण-पोषण करणारा अचिंत्यस्वरूप,सूर्यासारखा नित्य चेतन प्रकाशरूप व अविद्येच्यापेक्षा अतिशय पलीकडे,शुध्द सच्चिदानन्दघन परमेश्वराचे स्मरण करतो.

प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।

भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ।।१०।।

प्रयाणकाले,मनसा,अचलेन,भक्त्या,युक्त:,योगबलेन,चैव ।

भ्रुवो:,मध्ये,प्राणम,आवेश्य,सम्यक्,स:,तम्,परम्,पुरुषम्,उपैति,दिव्यम् ।।१०।।

तो भक्तियुक्त पुरुष अन्तकाळातसुध्दा योगबळाने भृकुटीमध्यात प्राण व्यवस्थित स्थापन करून,मग निश्चल मनाने स्मरण करत त्या दिव्यरूप परमपुरुष परमात्म्यास जाऊन मिळतो.

यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागा: ।

यदिच्छन्तो ब्रह्मचर्य चरन्ति तत्ते पदं सङ्ग्रहेण प्रवक्ष्ये ।।११।।

यत्,अक्षरम्,वेदविद:,वदन्ति,विशन्ति,यत्,यतय:,वीतरागा ।

यत्,इच्छन्त,ब्रह्मचयम्,चरन्ति,ते,पदम्,सङ्ग्रहेण,प्रवक्ष्ये ।।११।।

वेद जाणणारे विव्दान ज्या सच्चिदानन्दघनरूप परमपदास अविनाशी म्हणतात,आसक्तिरहित यत्नशील संन्यासी महात्माजन ज्यात प्रवेश करतात व ज्या परमपदाचि आस असणारे ब्रह्मचारी लोक ब्रह्मचर्याचे आचरण करतात,ते परमपद मी तुझ्यासाठी संक्षिप्तपणे सांगतो.

सर्वव्दाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।

मूधर्न्याधायात्मन: प्राणमास्थितो योगधारणाम् ।।१२।।

सर्वव्दाराणि,सयम्य,मन:,हृदि,निरुध्य,च ।

मूर्ध्नि,आधाय,आत्मन:,प्राणम्,आस्थित:,योगधारणाम् ।।१२।।

ओमित्येकाक्षरं ब्रहम व्याहरन्मामनुस्मरन् ।

य: प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।१३।।

ॐ,इति,एकाक्षरम्,ब्रहम,व्याहरन्,माम्,अनुस्मरन् ।

य:,प्रयाति,त्यजन्,देहम्,स:,याति,परमाम्,गतिम् ।।१३।।

सर्व इंद्रियव्दांरे रोखून तथा मनाला हृदयात स्थिर करून,मग त्या जिंकलेल्या मनाव्दांरे प्राण मस्तकात स्थापित करून,परमात्मासंबंधी योगधारणेत स्थित होऊन जो पुरुष ॐ हया एक अक्षररूप ब्रहमाचे उच्चारण करत व त्याच्या अर्थस्वरूप (माझे) निर्गुण ब्रहमाचे चिंतन करत शरीराचा त्याग करतो,तो पुरुष परमगति प्राप्त करतो.

अनन्यचेता: सततं यो मां स्मरति नित्यश: ।

तस्याहं सुलभ: पार्थ नित्ययुक्तस्य योगिन: ।।१४।।

अनन्यचेता:,सततम्,य:,माम्,स्मरति,नित्यश: ।

तस्य,अहम्,सुलभ:पार्थ,नित्ययुक्तस्य,योगिन: ।।१४।।

हे अर्जुन ! जो पुरुष माझ्याशी अनन्य चित्त होऊन सदा निरंतर माझे- पुरुषोत्तमाचे स्मरण करतो,त्या नित्य निरंतर माझ्यात युक्त असलेल्या योग्यासाठी मी सुलभ आहे,अर्थात त्यास मी सहज प्राप्त होतो.

मामुपेत्य पूनर्जन्म दु:खालयमशाश्र्वतम् ।

नाप्नुवति महात्मान: संसिध्दिं परमां गता: ।।१५।।

माम,उपेत्य,पूनर्जन्म,दु:खालयम्,अशाश्र्वतम् ।

न,आप्नुवन्ति,महात्मान:,संसिध्दिम्,परमाम्,गता: ।।१५।।

परमसिध्दि प्राप्त महात्माजन मला प्राप्त होऊन दु:खाचे घर अर्थात क्षणभंगुर पुनर्जन्मास प्राप्त होत नाहित (पुनर्जन्म टळतो)

आब्रह्मभुवनाल्लोका: पुनरावर्तिनोऽर्जुन ।

मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ।।१६।।

आब्रह्मभुवनात्,लोका:,पुनरावर्तिन,अर्जुन ।

माम्,उपेत्य,तु,कौन्तेय,पुनर्जन्म,न,विद्यते ।।१६।।

हे अर्जुन ! ब्रह्मलोकापर्यन्त सर्व पुनरावर्ती आहे,परंतु हे अर्जुन ! मला येऊन मिळाल्यावर पुनर्जन्म नाही,कारण मी कालातीत आहे व हे सर्व ब्रह्मादिलोक काळाने (काळगती मंडलाकार आहे) सिमित झाल्याने अनित्य आहेत.

सहस्त्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदु: ।

रात्रिं युगसहस्त्रान्तां तेऽहोरात्रविदो जना: ।।१७।।

सहस्त्रयुगपर्यन्तम्,अहम्,यत्,ब्रह्मण:,विदु: ।

रात्रिम्,युगसहस्त्रान्ताम्,ते,अहोरात्रविद:,जना: ।।१७।।

ब्रह्माचा जो एक दिवस आहे,ज्यास एकहजार चतुर्युग वेळा दिवस व एकहजार चतुर्युग वेळा रात्र (एकहजार वेळा चारयुगे व तेवढ्याच रात्री ) असा अवधी असलेला (इतका मोठा),जो पुरुष तत्वाने जाणतो,ते योगीजन काळाच्या तत्वास जाणणारे आहेत.

अव्यक्ताद्व्यक्तय: सर्वा: प्रभवन्त्यहरागमे ।

रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसञ्ज्ञके ।।१८।।

अव्यक्तात्,व्यक्तय:,सर्वा:,प्रभवन्ति,अहरागमे ।

रात्र्यागम,प्रलीयन्ते,तत्र,एव,अव्यक्तसञ्ज्ञके ।।१८।।

संपूर्ण चराचर भूतगण ब्रह्माच्या दिवसाचा प्रवेश काळात अव्यक्तातून अर्थात ब्रह्माच्या सूक्ष्म शरीरातून उत्पन्न होतात व ब्रह्माच्या रात्रीच्या वेळच्या प्रवेश काळात अव्यक्त नामक ब्रह्माच्या सूक्ष्मशरीरात लीन होतात.

भूतग्राम: स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।

रात्र्यागमेऽवश: पार्थ प्रभवत्यहरागमे ।।१९।।

भूतग्राम:,स:,एव,अयम्,भूत्वा,भूत्वा,प्रलीयते ।

रात्र्यागमेऽवश:,पार्थ,प्रभवत्यहरागमे ।।१९।।

हे पार्थ ! तेथेच हा भूतसमुदाय उत्पन्न होऊन-होऊन प्रकृतीच्या अधिपत्याखाली रात्रीच्या प्रवेशकाळात लीन होतो व दिवसाच्या प्रवेश काळात परत उत्पन्न होतो.

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातन: ।

य: स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ।।२०।।

पर:,तस्मात,तु,भाव:,अन्य:,अव्यक्त:,अव्यक्तात्,सनातन: ।

य:,स,सर्वेषु,भूतेषु,नश्यत्सु,न,विनश्यति ।।२०।।

त्या अव्यक्ताच्या अतिशय पलीकडे दुसरा अर्थात विलक्षण सनातन अव्यक्तभाव आहे,तो परम दिव्य पुरुष भुतांच्या नष्ट होण्यानंतर सुध्दा नष्ट होत नाही.

अव्यक्तोऽक्षर इत्यक्तस्तमाहु: परमां गतीम् ।

यं प्राप्य न निवर्तन्ते तध्दाम परमं मम ।।२१।।

अव्यक्त:,अक्षर:,इति,उक्त:,तम्,आहु:,परमाम्,गतिम् ।

यम्,प्राप्य,न,निवर्तन्ते,तत्,धाम्,परमम्,मम ।।२१।।

जे अव्यक्त अक्षर ह्या नावाने समजले जाते,त्या अक्षर नामक अव्यक्तभावास परमगति असे म्हणतात.तसेच ज्या अव्यक्त भावाशी समरस झाल्यावर मनुष्य परत फिरत नाही,तेच माझे परमधाम आहे.

पुरुष: स पर: पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।

यस्यान्त:स्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ।।२२।।

पुरुष:,स,पर:,पार्थ,भक्त्या,लभ्य,तु,अनन्यया ।

यस्य,अन्त:स्थानि,भूतानि,येन,सर्वम्,इदम्,ततम् ।।२२।।

हे पार्थ ! ज्या परमात्म्याच्या अंतर्गत सर्वभूत आहेत व ज्या सच्चिदानन्दघन परमात्म्यामुळे हे समस्त जगत परिपूर्ण आहे,तो सनातन पुरुष तर अनन्य भक्तिनेच प्राप्त होण्यायोग्य आहे.

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिमावृत्तिं चैव योगिन: ।

प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ।।२३।।

यत्र,काले,तु,अनावृत्तिम्,अवृत्तिम,च,च,एव,योगिन: ।

प्रयाता:,यान्ति,तम्,कालम्,वक्ष्यामि,भरतर्षभ ।।२३।।

हे अर्जुन ! ज्या काळात (मार्ग-सृती-गती) शरीर त्याग केलेले योगीजन परत न येण्याच्या गतीस प्राप्त होतात व ज्या काळात (मार्ग-सृती-गती) गेलेले परत येण्याच्या गतिला प्राप्त होतात,त्या काळांचे (अर्थात दोन्ही) मार्ग सांगतो.

अग्निर्ज्योतिरह: शुक्ल: षण्मासा उत्तरायणम् ।

तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जना: ।।२४।।

अग्नि,ज्योति,अह:,शुक्ल,षण्मासा,उत्तरायणम् ।

तत्र,प्रयाता:,गच्छन्ति,ब्रह्म,ब्रह्मविद:,जना: ।।२४।।

ज्या मार्गात ज्योतिर्मय अग्नि - अभिमानी देवता आहे,(दिवस,शुक्ल,उत्तरायणाचे सहा महिने) त्यामार्गात मृत्यु पावलेले ब्रह्मवेत्ते योगीजन उपर्युक्त देवताव्दांरा क्रमाने नेले जाऊन ब्रह्म प्राप्तीकडे जातात.

धूमो रात्रिस्तथा कृष्ण: षण्मासा दक्षिणायनम् ।

तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।।२५।।

धूम:,रात्रि:,तथा,कृष्ण:,षण्मासा,दक्षिणायनम् ।

तत्र,चान्द्रमसम्,ज्योति:,योगी,प्राप्य,निवर्तते ।।२५।।

ज्या मार्गात धूमाभिमानी देवता आहे,( रात्र,कृष्णपक्ष,दक्षिणायनाचे सहा महिने ) त्या मार्गात मृत झालेला सकामकर्म करणारा योगी त्या-त्या देवतांव्दारे क्रमाने घेऊन जाऊन चंद्रमाच्या ज्योतीस प्राप्त होउन स्वर्गात आपल्या शुभकर्मांचे फळ भोगून परत मृत्युलोकात येतो.

शुक्लकृष्णे गती ह्येते जगत: शाश्र्वते मते ।

एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुन: ।।२६।।

शुक्लकृष्णे,गती,हि,ऐते,जगत:,शाश्र्वते,मते ।

एकया,याति,अनावृत्तिम्,अन्यया,आवर्तते,पुन: ।।२६।।

जगात देवयान व पितृयान असे दोन सनातन मार्ग मानले आहेत,ह्यात एकामार्गाने (अर्चीमार्गाने) गेलेले योगी परत फिरून न येता त्या परम गतीस प्राप्त होतात व दुसऱ्या मार्गाने गेलेले परत जन्म-मृत्यूस प्राप्त होतात.

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्र्चन ।

तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ।।२७।।

न,एते,सृती,पार्थ,जानन्,योगी,मुह्यति,कश्र्चन ।

तस्मात्,सर्वेषु,कालेषु,योगयुक्त:,भव,अर्जुन ।।२७।।

हे पार्थ ! ह्या प्रकारे ह्या दोन्ही मार्गाना तत्वाने जाणून कोणीही योगी मोहित होत नाही,ह्या कारणाने हे अर्जुन ! तू सर्व काळात समबुध्दीरूप योगाने युक्त हो अर्थात निरंतर माझ्या प्राप्तीच्यासाठी साधन करणारा हो.

वेदेषु यज्ञेषु तप:सु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।

अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ।।२८।।

वेदेषु,यज्ञेषु,तप:,सु,च,ऐव,दानेषु,यत्,पुण्यफलम्,प्रदिष्टम् ।

अत्येति,तत्,सर्वम्,इदम्,विदित्वा,योगी,परम्,स्थानम्,उपैति,चाद्यम् ।।२८।।

योगी पुरुष ह्या रहस्यास तत्वाने जाणून वेदांचे अध्ययन करून तसेच यज्ञ,तप व दान करण्यात जे पुण्यफळ सांगितले आहे,त्या सर्वांचे नित्य उल्लंघन करून जातो व सनातन परमपद प्राप्त करतो.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नाम

नामाष्टमोऽध्याय: ।।८।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय नववा

## “ राजविद्याराजगुह्ययोग “

**हा अध्याय हठमार्ग व ज्याप्रमाणे राजाच्या आज्ञेत प्रजा असते,तसे जीवात्मा हि परमशक्तीच्या अधिपत्याखाली काम करते ह्याहे विवरण केले आहे.**

श्रीभगवानुवाच

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।

ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ।।१।।

इदम्,तु,ते, गुह्यतमम्,प्रवक्ष्यामि,अनसूयवे ।

ज्ञानम्,विज्ञानसहितम्,यत्,ज्ञात्वा,मोक्ष्यसे,शुभात् ।।१।।

श्रीभगवान म्हणाले - तुझ्यासारख्या दोषदृष्टीरहित भक्तासाठी हे परम गोपनीय विज्ञानासहित ज्ञान सविस्तर परत सांगतो,जे समजून तु दु:खरूप संसारातून मुक्त होशील.

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।

प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ।।२।।

राजविद्या,राजगुह्यम्,पवित्रम्,इदम,उत्तमम् ।

प्रत्यक्षावगमम्,धर्म्यस्य,सुसुखम्,कर्तुम,अव्ययम् ।।२।।

हे विज्ञांनासहित ज्ञान सर्व **विद्यांचा (राजविद्या)** राजा, आहे,सर्व गोपनीयांचा (राजगुह्य) राजा,अतिपवित्र,अतिउत्तम,प्रत्यक्ष फळ (योगातील उच्चअवस्था प्राप्त करून देणारा) देणारा,धर्मयुक्त साधन करण्यास अतिशय सुगम अव्ययपद देणारा व अविनाशी आहे.

अश्रद्धधाना: पुरुषा धर्मस्यास्य परन्तप ।

अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।।३।।

अश्रद्धधाना:,पुरुषा:,धर्मस्य,अस्य,परन्तप ।

अप्राप्य,माम्,निवर्तन्ते,मृत्युसंसारवर्त्मनि ।।३।।

हे परंतप ! ह्या उपर्युक्त धर्मात श्रध्दारहित पुरुष मला न प्राप्त होता,मृत्युरूप संसारात भ्रमण करत रहातो.

मया ततमिदं सर्व जगदव्यक्तमुर्तिना ।

मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थित: ।।४।।

मया,ततम्,इदम्,सर्वम्,जगत्,अव्यक्तमुर्तिना ।

मत्स्थानि,सर्वभूतानि,न,च,अहम्,तेषू,अवस्थित: ।।४।।

माझ्या निराकार परमात्म्यापासून हे जग जळातील बर्फाप्रमाणे परिपूर्ण आहे व सर्व भूत माझ्या अंतर्गत संकल्पाच्या आधारे स्थित आहे,परंतु वास्तविक मी त्यांच्यात स्थित नाही..

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्र्वरम् ।

भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावन: ।।५।।

न,च,मत्स्थानि,भूतानि,पश्य,मे,योगम्,ऐश्र्वरम् ।

भूतभृत्,न,च,भूतस्य,मम्,आत्मा,भूतभावन: ।।५।।

हि सर्व भूते माझ्यात स्थित नाहित,परंतु माझी ईश्र्वरिय योगशक्ती पहा,कि भूतांचे धारण-पोषण करणारा व भूतांना उत्पन्न सुध्दा करणारा माझा आत्मा वास्तविक भूतांत स्थित नाही.

यथाकाशस्थितो नित्यं वायु: सर्वत्रगो महान् ।

तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ।।६।।

यथा,आकाशस्थित्,नित्यम्,वायु:,सर्वत्रग,महान् ।

तथा,सर्वाणि,भूतानि,मत्स्थानि,इति,उपधारय ।।६।।

जसे आकाशात उत्पन्न सर्वत्र पसरणारा महान वायु सदा आकाशातच स्थित आहे,तसेच माझ्या संकल्पाव्दांरा उत्पन्न होण्याने,सर्व भूत माझ्यात स्थित आहे,असे समज.

सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।

कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ।।७।।

सर्वभूतानि,कौन्तेय,प्रकृतिम्,यान्ति,मामिकाम् ।

कल्पक्षये,पुन:,तानि,कल्पादौ,विसृजामी,अहम् ।।७।।

कल्प– कल् -गती,प - पतन,कल्प म्हणजे शून्यावस्था

हे अर्जुन ! कल्पाच्या अंती सर्व भूत माझ्या प्रकृतीस प्राप्त होतात अर्थात प्रकृतीत लीन होतात व कल्पाच्या सुरवातीस (आदि) त्यांना मी रचतो.

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुन: पुन: ।

भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ।।८।।

प्रकृतिम्,स्वाम्,अवष्टभ्य,विसृजामि,पुन:,पुन: ।

भूताग्रामम,इमम्,कृत्स्नम्,अवशम्,प्रकृते,यशात् ।।८।।

आपल्या प्रकृतीनुरुप अंगीकार कलेल्या स्वभावामुळे परतंत्र झालेल्या ह्या संपूर्ण भूतसमुदायास सारखे-सारखे त्यांच्या कर्मानुसार रचतो.

न च मां तानि कर्माणि निबन्धन्ति धनञ्जय ।

उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ।।९।।

न,च,माम्,तानि,कर्माणि,निबन्धन्ति,धनञ्जय ।

उदासीनवत्,आसीनम्,असक्तम्,तेषु,कर्मसु ||९||

हे अर्जून ! ह्या कर्मांमुळे आसक्तरहित व उदासीन (उत्-आसीन - परमसंयम वृत्ती) सदृश्य (संपूर्ण कार्य कर्तुत्व भावाशिवाय आपल्या आपण सत्तेच्या प्रभावानेच होते - उदासीन सदृश्य ) स्थित मला परमात्म्याला ते कधीही बांधू शकत नाहीत.

मयाध्यक्षेण प्रकृति: सूयते सचराचरम् |

हेतूनानेन कौन्तेय जगव्दिपरिवर्तते ||१०||

मया,अध्यक्षेण,प्रकृति:,सूयते,सचराचरम् |

हेतूना,अनेन,कौन्तेय,जगत्,विपरिवर्तते ||१०||

हे अर्जुन ! माझ्या अधिष्ठानामुळे (अध्यक्ष - आंतरिक मूळ - अक्ष) प्रकृति चराचरासहित सर्व जगताला रचते व ह्या हेतूनेच हे सर्व संसारचक्र फिरत आहे.

अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् |

परं भावमजानन्तो  मम भूतमहेश्र्वरम् ||११||

अवजानन्ति,माम्,मूढा:,मानुषीम्,तनुम्,आश्रितम् |

परम्,भावम्,अजानन्त,मम,भूतमहेश्र्वरम् ||११||

माझ्या परमभावास न जाणणारे मूढ़लोक मनुष्याचे शरीर धारण करणाऱ्या,माझ्या संपूर्ण भुतांच्या महान ईश्र्वराला तृच्छ समजतात अर्थात आपल्या योगमायेने संसाराच्या उध्दारास मनुष्यात वावरत असताना मला परमेश्र्वराला मनुष्यरूप मानतात.

मोघाशा मोघकर्मांणो मोघज्ञाना विचेतस: |

राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिता: ||१२||

मोघाशा:,मोघकर्मांण,मोघज्ञाना:,विचेतस: |

राक्षसीम्,आसुरीम्,च,एव,प्रकृतिम्,मोहिनीम्,श्रिता: ||१२||

ते व्यर्थ आशा,व्यर्थ कर्म व व्यर्थ ज्ञानवाल्या विक्षिप्त अज्ञानी राक्षसी,आसुरी व मोहिनी प्रकृतीला धारण करून राहतात.

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिता: ।

भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ।।१३।।

महात्मान,तू,माम्,पार्थ,दैवीम्,प्रकृतिम,आश्रिता: ।

भजन्ति,अनन्यमनस:,ज्ञात्वा,भूतादिम्,अव्ययम् ।।१३।।

परंतु हे कुंतीपुत्र ! दैवी प्रकृतीच्या आश्रित महात्माजन मला सर्व भूतांचे सनातन कारण व नाशरहित अक्षरस्वरूप जाणून अनन्य मनाने युक्त होऊन निरंतर भजतात.(भज - मुळावस्थेशी एक होणे)

सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रता: ।

नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।।१४।।

सततम्,कीर्तयन्त,माम्,यतन्त,च,दृढव्रता: ।

नमस्यन्त,च,माम्,भक्त्या,नित्ययुक्ता,उपासते ।।१४।।

ते दृढ निश्चय असणारे भक्तजन निरंतर माझ्या नाम गुणांचे किर्तन करतात,तसेच माझ्या प्राप्तीसाठी यत्न करणारे व मला सारखा-सारखा प्रणाम करणारे सदा माझ्या ध्यानात युक्त होऊन अनन्य प्रेमाने माझी उपासना करतात.

ज्ञानयज्ञेन चापन्ये यजन्तो मामुपासते ।

एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्र्वतोमुखम् ।।१५।।

ज्ञानयज्ञेन,च,अपि,अन्ते,यजन्त:,माम्,उपासते ।

एकत्वेन,पृथक्त्वेन,बहुधा,विश्र्वतोमुखम् ।।१५।।

दुसरे ज्ञानयोगी माझ्या निर्गुण-निराकार ब्रह्म ज्ञानयज्ञाच्या व्दांरा अभिन्न भावाने पूजन करत-करत माझी उपासना करतात व दुसरी माणसे बऱ्याच प्रकारांनी स्थित माझ्या विराटस्वरूप परमेश्र्वराची विविध भावाने उपासना (उप् - जवळ,आसना -बसणे,जाणे) करतात.

अहं क्रतुरहं यज्ञ: स्वधाहमहमौषधम् ।

मन्त्रोऽहममेवाज्यमहमग्निरहं हुतम् ।।१६।।

अहम्,ॠतु:अहम्,यज्ञ:,स्वधा,अहम्,अहम्,औषधम् ।

मन्त्र:,अहम्,अहम्,एव,आज्यम्,अहमि,अग्नि:,अहम्,हुतम् ।।१६।।

कृतू,यज्ञ,स्वधा,औषधि,मन्त्र,धृत,अग्नि व हवनरूप क्रिया,साधन,मीच आहे.

पिताहमस्य जगतो माता धाता पितामह: ।

वेद्यंपवित्रमोक्ङार ऋक्साम यजुरेव च ।।१७।।

पिता,अहम्,अस्य,जगत:,माता,धाता,पितामह: ।

वेद्यम्,पवित्रम्,ओकार:,काक्,साम,यजु:,ऐव,च ।।१७।।

ह्या संपूर्ण जगताचा धाता अर्थात धारण करणारा तसेच कर्माचे फळ देणारा,पिता,माता,पितामह, जाणण्यायोग्य,पवित्र ॐकार तसेच ॠग्वेद,सामवेद व यजुर्वेद मीच आहे.

गतिर्भर्ता प्रभु: साक्षी निवास: शरणं सुहृत् ।

प्रभव: प्रलय: स्थानं निधानं बीजमव्ययम् ।।१८।।

गति:,भर्ता,प्रभु:,साक्षी,निवास:,शरणम्,सुहृत् ।

प्रभव:,प्रलय:,स्थानम्,निधानम्,बीजम्,अव्ययम् ।।१८।।

प्राप्त करणायोग्य परम धाम,भरण-पोषण करणारा,सगळ्यांचा स्वामी,शुभ-अशुभ फळ पाहणारा ,सगळ्यांचे निवासस्थान,शरण घेणायोग्य,प्रत्युप्रकाराची अपेक्षा न करता हित करणारा,सगळ्यांची उत्पत्ती,प्रलयाचा हेतु,स्थितीचे आधार-निधान (प्रलयकाळी संपूर्ण भूत सूक्ष्मरूपाने ज्यात लय होते त्यास " ***निधान*** " म्हणतात.) व अविनाशी कारण मीच आहे.

तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सुजामि च ।

अमृतं चैव मृत्युश्र्च सदसच्चाहमर्जुन ।।१९।।

तपामि,अहम्,अहम्,वषम्,निगृण्हामि,उत्सुजामि,च ।

अमृतम्,च,एव,मृत्यु,च,सत्,असत्,च,अहमि,अर्जुन ।।१९।।

मीच सूर्यरूपाने तप्त होतो,वर्षेचे आकर्षण मीच आहे व पाउस मीच पाडतो,हे अर्जुन ! मीच अमृत व मृत्यु आहे व सत्य - असत्य सुध्दा मीच आहे.

त्रैविद्या मां सोमपा: पूतपापा यज्ञैरिव्ष्टा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।

ते पुण्यमासाद्यसुरेन्द्रलोक मश्र्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ।।२०।।

त्रैविद्या,माम्,सोमपा:,पूतपापा:,यज्ञै,इव्ष्टा,स्वगतिम्,प्रार्थयन्ते ।

ते पुण्यम,आसाद्य,सुरेन्द्रलोकम्,अश्र्नन्ति,दिव्यान्,दिवि,देवभोगान् ।।२०।।

तीनही वेदांत विधान केलेले सकामकर्म करणारा,सोमरस पिणारा,पापरहित पुरुष (स्वर्गप्राप्तीसाठी प्रतिबन्धक देवऋृणरूप पापांपासून पवित्र होणे.) मला यज्ञ व्दारा पुजून स्वर्गाच्या प्राप्तीची इच्छा करतात.ते पुरुष फळरूप स्वर्गलोकाची प्राप्ती होऊन स्वर्गात दिव्य देवतांचे भोग भोगतात.

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।

एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ।।२१।।

ते,तम्,भुक्त्वा,स्वर्गलोकम्,विशालम्,क्षीणे,पुण्ये,मर्त्यलोकम्,विशन्ति ।

एवम्,त्रयीधर्मम्,अनुप्रपन्ना,गतागतम्,कामकामा:,लभन्ते ।।२१।।

ते त्या विशाल स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य क्षीण झाल्यावर त्यांना मृत्युलोक प्राप्त होतो.हयाप्रकारे स्वर्गासाठीच्या साधनेने तिन्ही वेदांत सांगितलेल्या सकाम कर्माचा आश्रय घेणारे व भोगाची कामना करणारे पुरुष सारख्या येरझाऱ्या मारतात,अर्थात पुण्याच्या प्रभावाने स्वर्ग व पुण्य क्षीण झाल्यावर मृत्युलोक असा प्रवास करतात.

अनन्याश्र्चिन्तयन्तो मां ये जना: पर्युपासते ।

तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ।।२२।।

अनन्या:,चिन्तयन्त:,माम्,ये,जना:,पर्युपासते ।

तेषाम्,नित्याभियुक्तानाम्,योगक्षेमम्,वहामि,अहम् ।।२२।।

जे अनन्य प्रेमी भक्तजन माझ्या ईश्वररूपाचे निरंतर चिंतन करत निष्कामभावाने भजन करतात,त्या नित्य-निरंतर माझे चिंतन करणाऱ्या पुरुषांचा योगक्षेम मी स्वतः प्राप्त करून देतो.(भगवत स्वरुपाची प्राप्ती म्हणजे " ***योग*** " भगवत प्राप्तीचे निमित्त केलेल्या साधकाची रक्षा म्हणजे " ***क्षेम*** "होय.)

येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रध्दयान्विता: ।

तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ।।२३।।

ये,अपि,अन्यन्य,देवता,भक्ता:,यजन्ते,श्रध्दया,अन्विता: ।

ते,अपि,माम्,एव,कौन्तेय,यजन्ति,अविधिपूर्वकम् ।।२३।।

हे अर्जुन ! परंतु श्रध्देनेयुक्त जे सकाम भक्त दुसऱ्या देवतांची पूजा करतात,ते सुध्दा माझीच पूजा करतात,परंतू त्यांचे हे पूजन अविधीपूर्वक अर्थात अज्ञानपूर्वक आहे.

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।

न तु मामभिजानन्ति तत्वेनातश्च्यवन्ति ते ।।२४।।

अहम्,हि,सर्वयज्ञानाम्,भोक्ता,च,प्रभु:,एव,च ।

न,तु,माम्,अभिजानन्ति,तत्वेन,अत:,च्यवन्ति,ते ।।२४।।

कारण संपूर्ण यज्ञांचा भोक्ता व स्वामी सुध्दा मीच आहे,परन्तु ते मला परमेश्वराला तत्वाने जाणत नाहीत,त्यामुळे ते परत मागे जातात अर्थात पुनर्जन्मास प्राप्त होतात.

यान्ति देवव्रता देवान्पितृन्यान्ति पितृव्रता: ।

भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ।।२५।।

यान्ति,देवव्रता:,देवान्,पितृन्,न्यान्ति,पितृव्रता: ।

भूतानि,यान्ति,भूतेज्या,यान्ति,मद्याजिन:,अपि,माम् ।।२५।।

देवतांचे पूजन करणारे देवतांना,पितरांचे पूजन करणारे पितरांना व भूतांची पूजा करणारे भूतांना प्राप्त होतात,तसेच माझे पूजन करणारे मलाच प्राप्त होतात=येऊन मिळतात,ह्यासाठी माझ्या भक्तांचा पुनर्जन्म होत नाही.

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।

तदेहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन: ।।२६।।

पत्रम्, पुष्पम्,फलम्,तोयम्,य:,मे,भक्त्या,प्रयच्छति ।

तत्,अहम्,भक्त्युपहृतम्,अश्नामि,प्रयतात्मन: ।।२६।।

जो भक्त माझ्यासाठी पत्र,पुष्प,फळ,जल आदि अर्पण करतो,त्या शुध्दबुध्दी निश्काम भक्ताचे प्रेमपूर्वक अर्पण केलेले ते पत्र-पुष्पादि मी सगुणरूपाने प्रकट होऊन प्रेमाने ग्रहण करतो.

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।

यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।२७।।

यत्,करोषि,यत्,अश्नासि,यत्,ज्जुहोषि,वदासि,यत् ।

यत्त,तपस्यसि,कौन्तेय,तत्,कुरुष्व,मदर्पणम् ।।२७।।

हे अर्जुन ! तू जे कर्म करतोस,जे खातोस,जे हवन करतोस,जे दान देतोस व जे तप करतोस,ते सर्व तू मला अर्पण कर.

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनै: ।

सन्न्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ।।२८।।

शुभाशुभफलै:,एवम्,मोक्ष्यसे,कर्मबन्धनै: ।

सन्न्यासयोगयुक्तात्का,विमुक्त:,उपैष्यसि ।।२८।।

ह्याप्रकारे,ज्यात समस्त कर्म माझ्या भगवत स्वरूपास अर्पण होतात,अश्या संन्यासयोगाने युक्त चित्ताचा तू शुभाशुभ फळरूप कर्मबंधनातून मुक्त होशील,त्यानंतर तू मलाच येऊन मिळशील.

समोऽहं सर्वभूतेषु न मे व्देष्योऽस्ति न प्रिय: ।

ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।।२९।।

सम:,अहम्,सर्वभूतेषु,न,मे,व्देष्य,अस्ति,न,प्रिय: ।

ये,भजन्ति,तु,माम्,भक्त्या,मयि,ते,तेषु,च,अपि,अहम् ।।२९।।

मी सर्व भूतात समभावाने व्याप्त आहे,न कोणी माझा अप्रिय ना कोणी प्रिय आहे,परंतू जे भक्त माझे प्रेमाने भजन करतात,ते माझ्यात आहेत व मी त्यांच्यात,प्रत्यक्ष प्रकट आहे.

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।

साधुरेव स मन्तव्य: सम्यग्व्यवसितो हि स:।।३०।।

अपि,चेतु,सुदुराचार:,भजते,माम्,अनन्यभाक् ।

साधु:,एव,स:,मन्तव्य:,सम्यक्,व्यवसित:,हि,स:।।३०।।

जर कोणी अतिशय दुराचारी सुध्दा अनन्यभावाने माझा भक्त होऊन माझे भजन करील तर तो साधुच मानण्यायोग्य आहे.कारण तो यथार्थ निश्र्चय असणारा आहे,अर्थात त्याने विचारपूर्वक निर्णय केला आहे कि भजनासारखे अन्य दुसरे काही नाही.

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्र्वच्छान्तिं निगच्छति ।

कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्त: प्रणश्यति ।।३१।।

क्षिप्रम्,भवति,धर्मात्मा,शाश्र्वत्,शान्तिम्,निगच्छति ।

कौन्तेय,प्रति,जानीहि,न,मे,भक्त:,प्रणश्यति ।।३१।।

तो जलद गतीने धर्मात्मा होतो व कायम रहाणारी परम शान्ति प्राप्त करतो,हे अर्जुन ! तु निश्र्चितपणे सत्य जाण कि माझा भक्त कधीच नष्ट होत नाही.

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय: ।

स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्।।३२।।

माम्,हि,पार्थ,व्यपाश्रित्य,ये,अपि,स्यु:,पापयोनय: ।

स्त्रिय:,वैश्या:,तथा,शूद्र:,ते,अपि,यान्ति,पराम्,गतिम्।।३२।।

हे अर्जुन ! स्त्री,वैश्य,शूद्र तसेच पापयोनी चांडाळहि जो कोणी असेल,ते सुध्दा मला शरण होऊन परमगतीस प्राप्त होतात.

किं पुनर्ब्राह्मणा: पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।

अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ||३३||

किम्,पुन:,ब्राहमणा:,पुण्या:,भक्ता:,राजर्षय:,तथा ।

अनित्यम्,असुखम्,लोकम,प्राप्य,भजस्व,माम् ||३३||

तर इतरांचे आणखी विशेष काय सांगायचे,जे पुण्यशील ब्राहमण तसेच राजर्षी भक्तजन माझ्या शरणास येऊन परमगती प्राप्त करतातच,हयासाठी तू सुखरहित क्षणभंग्डुर असा मनुष्य देह प्राप्त केल्याने माझे भजन कर.

मन्मना भव मभ्दक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।

मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण:||३४||

मन्मना,भव,मदभक्त:,मद्याजी,माम्,नमस्कुरु ।

माम्,एव,एष्यसि,युक्त्वा,एवम,आत्मानम्,मत्परायण:||३४||

माझ्यात मन गुंतलेला असा हो,माझा भक्त हो,माझे पूजन कर,मला प्रणाम कर,हयाप्रकारे आत्म्यास माझ्यात नियुक्त करून मत्परायण होऊन तू मलाच येऊन मिळशील.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रहमविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुहययोग नाम

नवमोऽध्याय: ||९||

## श्रीमदभगवदगीता अध्याय दहावा

## "विभूतीयोग"

**साधक जेव्हा उच्चावस्थेत जातो तेव्हा त्यास विविध उच्च अवस्था प्राप्त होतात त्याचे विवरण हयात केले आहे.**

श्रीभगवान उवाच

भूय एव महाबाहो श्रृणु मे परमं वच: ।

यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ||१||

भूय:,एव,महाबाहो,श्रृणु,मे,परमम्,वच: ।

यत्,ते,अहम्,प्रीयमाणाय,वक्ष्यामि,हितकाम्यया ।।१।।

श्रीभगवान म्हणाले - हे महाबाहो ! तरीसुध्दा माझ्या परमरहस्य व प्रभावयुक्त वचन (बोध) ऐक! जे मी तुझ्यावर अतिशय प्रेम असण्यामुळे तुझ्या हितासाठी सांगतो.

न मे विदु: सुरगणा: प्रभवं न महर्षय: ।

अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वश: ।।२।।

न,मे,विदु:,सुरगणा:,प्रभवम्,न,महर्षय: ।

अहम्,आदि,हि,देवानाम्,महर्षीणाम्,च सर्वश: ।।२।।

माझ्या उत्पत्तीस अर्थात लीलेने प्रकट होण्यास ना देव ना महर्षी जाणतात,कारण मी देव व महर्षी ह्यांचा हि आदिकारण आहे.

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्र्वरम् ।

असम्मूढ: स मर्त्येषु सर्वपापै: प्रमुच्यते ।।३।।

य:,माम्,अजम्,अमनादिम्,च,वेत्ति,लोकमहेश्र्वरम् ।

असम्मूढ:,स,मर्त्येषु,सर्वपापै:,प्रमुच्यते ।।३।।

जो मला अजन्मा अर्थात वास्तविक जन्मरहित,अनादि (आदिरहित-सर्वांचे कारण) व लोकांचा महान ईश्र्वर (लोकमहेश्र्वर) म्हणून तत्वाने जाणतो,तो मनुष्यात ज्ञानवान पुरुष संपूर्ण पापांनी मुक्त होतो.

बुध्दिर्ज्ञानमसम्मोह: क्षमा सत्यं दम: शम: ।

सुखं दु:खं भवोऽभावो भयं चाभयमेव च ।।४।।

बुध्दि:,ज्ञानम्,असंम्मोह:,क्षमा,सत्यम्,दम:,शम: ।

सुखम्,दु:खम्,भव:,अभाव:,भयम्,च,अभयम्,एव,च ।।४।।

अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयश: ।

भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधा: ।।५।।

अहिंसा,समता,तुष्टि:,तप:,दानम्,यश:,अयश: ।

भवन्ति,भावा:,भूतानाम्,मत्त:,एव,पृथग्विधा: ।।५।।

साधक सगळीकडे परमात्मा आहे असे मानतो त्यामुळे सर्व भाव हे त्याचेच आहेत असे मानणे योग्य होते.

निश्चय करण्याची शक्ती,यथार्थ ज्ञान,असम्मूढ़ता,बुध्दी,ज्ञान,असंमोह,क्षमा,सत्य,दम-इंद्रियांना वश करणे,शम-मनाचा निग्रह तसेच सुख-दु:ख,उत्पत्ती-प्रलय,अभाव(नाश)व भय-अभय तसेच अहिंसा,समता,संतोष,तप(स्वधर्माच्या आचरणाने इंद्रियांना तापवून शुध्द करणे -तप), दान,यश,अपयश,कीर्ती-अपकीर्ती असे नानाप्रकारचे भाव माझ्यामुळेच होतात.

महर्षय: सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।

मभ्दावा मानसा जाता येषां लोक इमा: प्रजा: ।।६।।

महर्षय:,सप्त,पूर्वे,चत्वार:,मनव:,तथा ।

मद्भावा,मानसा:,जाता,येषाम्,लोके,इमा:,प्रजा: ।।६।।

सात ऋषी -सात चक्रांची ऋतंभरा अवस्था,चार पुरुषार्थ - सनक,सनादिक इत्यादी,चौदा वि**द्या,**चौदा मनु

सात महर्षीजन,चार त्याच्याही पूर्वी होणारे सनकादि तसेच स्वायम्भुव आदि चौदा मनु - हे माझ्यात भाव असणारे सर्वच्या सर्व माझ्या संकल्पाने उत्पन्न झाले आहेत,ज्यांची संसारात हि संपूर्ण प्रजा आहे.

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्वत: ।

सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशय: ।।७।।

एताम्,विभूतिम्,योगम्,च,मम,य:,वेत्ति,तत्वत: ।

स:,अविकम्पेन,योगेन,च,युज्यते,न,अत्र,संशय: ।।७।।

विभूतीना तत्वाने जाणावे,ज्यानेच साक्षात्कार होतो.

जो पुरुष माझ्या ह्या परमेश्र्वर्यरुपांस विभूतीना व योगशक्तींना तत्वाने जाणतो,तो निश्चल भक्तियोगाने युक्त होतो,ह्यात थोडाही संशय नाही.(दृश्यमात्र संसार हा परमेश्र्वराची माया आहे व वासुदेव भगवानच सर्वत्र परिपूर्ण आहेत असे जाणणे म्हणजे “तत्वत:” जाणणे होय)

अहं सर्वस्य प्रभवो मत्त: सर्वं प्रवर्तते ।

इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विता: ।।८।।

अहम्,सर्वस्य,प्रभव:,मत्त:,सर्वम्,प्रवर्तते ।

इति,मत्वा,भजन्ते,माम्,बुधा,भावसमन्विता: ।।८।।

मी वासुदेवच संपूर्ण जगताच्या उत्पत्तीचे कारण आहे व सर्व जग माझ्यातच ह्या चेष्टा करत आहे,ह्याप्रकारांनी समजून श्रध्दा व भक्तीने युक्त बुध्दिमान भक्तजन मला-परमेश्वरासच नित्य-निरंतर भजतात.

मच्चित्ता मग्दतप्राणा बोधयन्त: परस्परम् ।

कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।९।।

मच्चित्ता,मग्दतप्राणा:,बोधयन्त:,परस्परम् ।

कथयन्त,च,माम,नित्यम्,तुष्यन्ति,च,रमन्ति,च ।।९।।

बुद्धि = बुद् - बुडबुडा,धि - सागर ,व्यक्तिगत बुद-सीमा ओलांडून एक होणे - बुध्दीयोग साधणे.

निरंतर माझ्यात मन लाऊन व माझ्यातच प्राणांना (मग्दतप्राणा: - वासुदेव परमेश्वरासाठीच जीवन अर्पण करणे) अर्पण करणारे भक्तजन माझ्या भक्तीच्या चर्चेव्दारा आपसात माझ्या प्रभावास जाणून तसेच माझ्या गुणांचे व प्रभावासहित माझे कथन करत निरंतर संतुष्ट होतात (ज्याप्रकारे सामान्य माणसे विषयात बुध्दी लावून त्याचे ज्ञान मिळवतात,तसेच भक्त माझ्यात मन लावून मजविषयी जाणतात अर्थात तसा बुध्दीयोग प्राप्त करतात.) व माझ्या वासुदेव स्वरूपात निरंतर रममाण होतात.

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।

ददामि बुध्दियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।१०।।

तेषाम्,सततयुक्तानाम्,भजताम्,प्रीतिपूर्वकम् ।

ददामि,बुध्दियोगम्,तम्,येन,माम्,उपयान्ति,ते ।।१०।।

अश्या निरंतर माझ्या ध्यानादिमध्ये लागलेले व प्रेमपूर्वक भजन करणाऱ्या भक्तांना मी तत्वज्ञानरूप योग देतो,ज्याने ते मलाच प्राप्त होतात.

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तम: ।

नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ।।११।।

तेषाम्,एव,अनुकम्पार्थम्,अहम्,अज्ञानजम्, तम: ।

नाशयामि,आत्मभावस्थ:,ज्ञानदीपेन,भास्वता ।।११।।

अंतःकरणात स्थित असलेला मी अंध:कार नष्ट करून प्रकाशाकडे जाणारा तत्वज्ञानरूप दीपक प्रज्वलित करतो.

हे अर्जुन ! त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठी त्यांच्या अंतःकरणात स्थित असलेला मी स्वयं त्यांच्या अज्ञानजनित अंध:कारास,प्रकाशमय तत्वज्ञानरूप दिप लाऊन नष्ट करतो.

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।

पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ।।१२।।

परम्,ब्रह्म,परम्,धाम,पवित्रम्,परमम्,भवान् ।

पुरुषम्,शाश्वतम्,दिव्यम्,आदिदेवम्,अजम्,विभुम् ।।१२।।

आहुस्त्वामृषय: सर्वे देवार्षिर्नारदस्तथा ।

असितो देवलो व्यास: स्वयं चैव ब्रवीषि मे ।।१३।।

आहु:,त्वाम्,ॠषय:,सर्वे देवार्षि,नारद:,तथा ।

असितो,देवल,व्यास:,स्वयम्,च,एव,ब्रवीषि,मे ।।१३।।

अर्जुन म्हणाला - आपण परब्रह्म,परमधाम व परमपवित्र आहात,कारण आपणास सर्व ॠषीगण सतातन,दिव्य पुरुष एवं देवतांचे सुध्दा आदिदेव अजन्मा व सर्वव्यापी म्हणतात,तसेच देवर्षी,नारद,तसेच असित व देवल ॠषी तसेच महर्षी व्यास सुध्दा म्हणतात तसेच आपलेही मला तेच सांगणे आहे.

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।

न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवा: ।।१४।।

सर्वम्,एतत्,ॠतम्,मन्ये,यत्,माम्,वदसि,केशव ।

न,हि,ते,भगवन्,व्यक्तिम्,विदु:,देवा:,न,दानवा: ।।१४।।

हे केशव ! जे काही आपण मला सांगता ते सर्व मी सत्य मानतो,हे भगवन ! आपल्या लीलामय स्वरूपास देव वा दानव जाणत नाहित.

स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।

भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ।।१५।।

स्वयम्,एव,आत्मनम्,वेत्थ,त्वम्,पुरुषोत्तम ।

भूतभावन,भूतेश,देवदेव,जगत्पते ।।१५।।

हे भूतांना उत्पन्न करणारे ! हे भूतांचे ईश्वर ! देवांचे देव ! हे जगताचे स्वामी ! हे पुरुषोत्तम ! आपण स्वतःच आपण आपणास जाणता.(स्वतःच स्वतःला जाणत - आपण आत्मज्ञानी आहात)

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतय: ।

याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ।।१६।।

वक्तुम्,अर्हसि,अशेषेण,दिव्या:,हि,आत्मविभूतय: ।

याभि:,विभूतिभि:,लोकान्,ईमान,त्वम्,तिष्ठसि: ।।१६।।

ह्यासाठी आपणच त्या दिव्य विभूतींना संपूर्णपणे सांगण्यास समर्थ आहात,ज्या विभूतींव्दारा आपण ह्यासर्व लोकांना व्यापून स्थित आहात.

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।

केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ।।१७।।

कथम्,विद्याम्,अहम्,योगिन्,त्वाम्,सदा,परिचिन्तयन् ।

केषु,केषु,च,भावेषु,चिन्त्य:,असि,भगवन्,मया ।।१७।।

हे योगेश्वर ! मी कशा प्रकारे निरंतर चिंतन करता करता आपणास जाणू शकतो व हे भगवन ! आपण कोठल्या कोठल्या भावाने माझ्याकडून चिंतन करण्यास योग्य आहात?

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।

भूय: कथय तृप्तिर्हि श्रृण्वतो नास्ति मेऽमृतम् ।।१८।।

विस्तरेण,आत्मन:,योगम्,विभूतिम्,च,जनार्दन ।

भूय:,कथय:,तृप्ति:,हि,श्रृण्वत,अस्ति,मे,अमृतम् ।।१८।।

हे जनार्दन ! आपल्या योगशक्तीस व विभूतीस परत विस्ताराने सांगा,कारण तुमच्या अमृतमय वचनांना ऐकून माझी तृप्ती होत नाही कारण माझी उत्कंठा पूर्ण होत नाही,तशीच राहाते.

हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतय: ।

प्राधान्यत: कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ।।१९।।

हन्त,ते,कथयिष्यामि,दिव्या:,हि,आत्मविभूतय: ।

प्राधान्यत:,कुरुश्रेष्ठ,न,अस्ति,अन्त:,विस्तरस्य,मे ।।१९।।

श्रीभगवान म्हणाले - हे कुरुश्रेष्ठ ! आता मी माझी जी दिव्य विभूती आहे,त्या मुख्य मुख्य सांगतो,कारण माझ्या विस्ताराचा अंत नाही.

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित: ।

अहमादिश्र्च मध्यं च भूतानामन्त एव च ।।२०।।

अहम्,आत्मा,गुडाकेश,सर्वभूताशयस्थित: ।

अहम्,आदि,च,मध्यम्,च,भूतानाम,अन्त:,एव,च ।।२०।।

हे अर्जुन ! मी सर्व भुतांच्या हृदयात स्थित सर्वांचा आत्मा आहे,तसेच सर्व भूतांचा आदि,मध्य व अन्त सुध्दा मीच आहे.

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।

मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ।।२१।।

आदित्यानाम्,अहम्,विष्णु:,ज्योतिषाम्,रवि:,अंशुमान् ।

मरीचि:,मरुताम्,अस्मि,नक्षत्राणाम्,अहम्,शशी ।।२१।।

मी अदितीच्या बारा पुत्रांत विष्णू व ज्योतींमध्ये किरण-असणारा सूर्य आहे तसेच मी एकोणचाळीस वायुदेवतांचे तेज व नक्षत्रांचा अधिपति चन्द्रमा आहे.

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासव: ।

इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ।।२२।।

वेदानाम्,सामवेदा,अस्मि,देवानाम्,अस्मि,वासव: ।

इन्द्रियाणाम्,मन:,च,अस्मि,भूतानाम्,अस्मि,चेतना ।।२२।।

मी वेदात सामवेद आहे,देवांत इंद्र आहे,इंद्रियांत मन व भूतप्राण्यांतील चेतना अर्थात जीवनशक्ती आहे.

रुद्राणां शक्ङरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।

वसूनां पावकश्चास्मि मेरू: शिखरिणामहम् ।।२३।।

रुद्राणाम्,शक्ङर,च,अस्मि,वित्तेश:,यक्षरक्षसाम् ।

वसूनाम्,पावक:,च,अस्मि,मेरू:,शिखरिणाम्,अहम् ।।२३।।

मी एकादश रुद्रांत शंकर आहे,यक्ष व राक्षसांत धनाचा स्वामी कुबेर आहे.आठ वसुंत अग्नी आहे,व शिखर असणाऱ्या पर्वतात सुमेर पर्वत आहे.

पुरोधसां च मुख्यं मां विध्दि पार्थ बृहस्पतिम् ।

सेनानीनामहं स्कन्द: सरसामस्मि सागर: ।।२४।।

पुरोधसाम्,च,मुख्यम्,माम्,विध्दि,पार्थ,बृहस्पतिम् ।

सेनानीनाम,अहम्,स्कन्द:,सरसाम्,अस्मि,सागर: ।।२४।।

पुरोहितांत मुख्य बृहस्पती असे मला जाण,मी सेनापतीत स्कन्द व जलाशयात समुद्र आहे.

महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।

यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालय: ।।२५।।

महर्षीणाम्,भृगु:,अहम्,गिराम्,अस्मि,एकम,अक्षरम् ।

यज्ञानाम्,जपयज्ञ:,अस्मि,स्थावराणाम्,हिमालय: ।।२५।।

मी महर्षित भृगु व शब्दांत एक अक्षर ॐकार आहे,सर्व प्रकारच्या जपयज्ञात व स्थिर असणाऱ्यात हिमालय पहाड आहे.

अश्वत्थ: सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारद: ।

गन्धर्वाणां चित्ररथ: सिध्दानां कपिलो मुनि: ।।२६।।

अश्वत्थ:,सर्ववृक्षाणाम्,देवर्षीणाम्,च,नारद: ।

गन्धर्वाणाम्,चित्ररथ:,सिध्दानाम्,कपिल,मुनि: ।।२६।।

सर्व वृक्षांत पिंपळ (अश्वत्थ - श्वास(स्पंदन)रहित अवस्था) वृक्ष,देवर्षित नारद मुनी,गंधर्वात चित्ररथ व सिध्दांमध्ये कपिल मुनि आहे.

उच्चै: श्रवसमश्वानां विध्दि माममृतोभ्दवम् ।

ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ।।२७।।

उच्चै:,श्रवसम्,अश्वानाम्,विध्दि,माम्,अृतोदभवम् ।

ऐरावतम्,गजेन्द्राणाम्,नराणाम्,च,नराधिपम् ।।२७।।

घोड्यांमध्ये अमृताबरोबर उत्पन्न होणारा उच्चै:श्रवा (श्वासरहित अवस्थेत उच्च श्रवण) नामक घोड़ा,श्रेष्ठ हत्तींमध्ये ऐरावत (उच्चशक्ती) नामक हत्ती व मनुष्यात राजा असे मला समज.

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।

प्रजनश्चास्मि कन्दर्प: सर्पाणामस्मि वासुकि: ।।२८।।

आयुधानाम्,अहम्,वज्रम्,धेनूनाम्,अस्मि,कामधुक् ।

प्रजन:,च,अस्मि,कन्दर्प:,सर्पाणाम्,अस्मि,वासुकि: ।।२८।।

कंदर्प - परमात्म्याचे अस्तित्व (दर्प - अहंकार कं -परमात्मा) प्राण - सर्प (प्र - पुढे जाणे,अन् - स्पंदन) वासुकी - श्रेष्ठ प्राणशक्ती

मी शस्त्रांत वज्र (कठोर निर्धार) व गाईंत कामधेनु आहे,शास्त्रोक्त रितीने संतान उत्पत्तीचा हेतु कामदेव आहे व सर्पांचा राजा सर्पराज वासुकी आहे.

अनन्तश्चास्मि नागनां वरुणो यादसामहम् ।

पितृणामर्यमा चास्मि यम: संयमतामहम् ।।२९।।

अनन्त:,च,अस्मि,नागनाम्,वरुण:,यादसाम्,अहम् ।

पितृणाम्,अर्यमा,च,अस्मि,यम:,संयमताम्,अहम् ।।२९।।

नाग - कुंडलिनी

नागांत शेषनाग व जलचरांचा अधिपती वरुण देवता आहे,पितरांत अर्यमा नामक पितर आहे,तसेच शासन करणाऱ्यात यमराज आहे.

प्रल्हादश्चास्मि दैत्यानां काल: कलयतमहम् ।

मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ।।३०।।

प्रल्हाद:,च,अस्मि,दैत्यानाम्,काल:,कलयतम्,अहम् ।

मृगाणाम्,च,मृगेन्द्र,अहम्,वैनतेय,च,पक्षिणाम् ।।३०।।

मृग - काळ मृगराज - काळाचा नाश करणारा

मी दैत्यांत प्रल्हाद व गणना करणाऱ्यांचा वेळ (काळ) आहे,पशुंत मृगराज सिंह व पक्ष्यांत गरुड आहे.

पवन: पवतामस्मि राम: शस्त्रभृतामहम् ।

झषाणां मकरश्चास्मि स्त्रोतसामस्मि जाह्नवी ।।३१।।

पवन:,पवताम्,अस्मि,राम:,शस्त्रभृतास्,अहम् ।

झषाणाम्,मकर:,च,अस्मि,स्त्रोतसाम्,अस्मि,जाह्नवी ।।३१।।

मी पवित्र करणाऱ्यात वायू व शस्त्र धारण करणाऱ्यांत श्रीराम आहे,तसेच माश्यांमध्ये मगर आहे,न**द्यां**मध्ये श्रीभागीरथी गंगा आहे.

सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।

अध्यात्मवि**द्या**वि**द्या**नां वाद: प्रवदतामहम् ।।३२।।

सर्गाणाम,आदि,अन्त,च,मध्यम्,च,एव,अहम्,अर्जुन ।

अध्यात्मविद्या,विद्यानां,वाद:,प्रवदताम्,अहम् ।।३२।।

सर् - सरकणे (काळाचे सरकणे), वाद - सत्याकडे नेणारा वाद

व्यक्ताकडून-अव्यक्ताकडे जाणारा अकार,व्दंव्दाकडून-र्निव्दंव्दाकडे नेणारा

हे अर्जुन ! सृष्टीचा आदि व अन्त तथा मध्य मीच आहे.मी विद्यांतअध्यात्मविद्या अर्थात ब्रह्मविद्या व परस्पर विवाद करणाऱ्यात तत्व-निर्णयांसाठी केलेला वाद आहे.

अक्षराणामकारोऽस्मि व्दन्व्द: सामासिकस्य च ।

अहमेवाक्षय: कालो धाताहं विश्र्वतोमुख: ।।३३।।

अक्षराणाम्,अकार:अस्मि,व्दन्व्द,सामासिकस्य,च ।

अहम,एव,अक्षय,काल:,धात,अहम्,विश्र्वतोमुख: ।।३३।।

मी अक्षरात अकार आहे,समासात व्दंव्द समास आहे.अक्षयकाळ अर्थात काळाचा हि महाकाळ आहे,तसेच सगळीकडे तोंडे असलेला,विराटस्वरूप,सर्वांचे धारण पोषण करणारा सुध्दा मीच आहे.

मृत्यु: सर्वहरश्र्चाहमुभ्दवश्र्च भविष्यताम् ।

कीर्ती: श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृति: क्षमा ।।३४।।

मृत्यु:,सर्वहर,च,अहम्,उदभव,च,भविष्यताम् ।

कीर्ती:,श्री,वाक्,च,नारीणाम्,स्मृति:,मेधा,धृति:,क्षमा ।।३४।।

मृत्यु- गतीची शून्यावस्था,कृ - कर्म-कर्मातून किर्ती,श्री - श्रेष्ठ,भाग्य वाक् - वाणी - सत्य व प्रिय वाणी,धृती - प्राप्त संस्कारांची यथा योग्य धारणा,क्ष - कल्याण क्षमा - कल्याणकारी

मीच सगळ्यांचा नाश करणारा मृत्यु व उत्पन्न होणाऱ्यांसाठी उत्पत्ती हेतू आहे.तसेच स्त्रीयांत कीर्ती,श्री,वाक्,स्मृति,मेधा,धृति व क्षमा (देवतांच्या स्त्रिया) आहे.

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।

मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकर: ।।३५।।

बृहत्साम,तथा,साम्नाम्,गायत्री,छन्दसाम्,अहम् ।

मासानाम्,मार्गशीर्ष:,अहम्,ॠतूनाम्,कुसुमाकर: ।।३५।।

तसेच गायन करण्यायोग्य श्रुतिंमध्ये मी ब्रूहत्साम व सर्व छंदात गायत्री छंद आहे तसेच महिन्यात मार्गशीर्ष व ॠतुंमध्ये वसंत मीच आहे.

द्युतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।

जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्वं सत्ववतामहम् ।।३६।।

द्युतम्,छलयताम्,अस्मि,तेज:,तेजस्विनाम्,अहम् ।

जय:,अस्मि,व्यवसाय:,अस्मि,सत्वम्,सत्ववताम्,अहम् ।।३६।।

मी छल करणाऱ्यात जुगार व प्रभावशाली पुरुषांचा प्रभाव आहे,मी जिंकणाऱ्यांचा विजय आहे,निश्र्चय करणाऱ्यांचा निश्र्चय व सात्विक पुरुषांचा सात्विक भाव आहे.

वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनञ्जय: ।

मुनीनामप्यहं व्यास: कवीनामशना कवि: ।।३७।।

वृष्णीनाम्,वासुदेव:,अस्मि,पाण्डवानाम्,धनञ्जय: ।

मुनीनाम्,अपि,अहम्,व्यास:,कवीनाम्,उशना,कवि: ।।३७।।

वृषु - सिंचन करणे-दिव्य शक्तींचे सिंचन, धनंजय (नाडी) - इंद्रियसंयम ,शुक्राचार्य - पुरुषार्थ

वृष्णिवंशियात (यादवांमधील एक अंतर्गतवंश) वासुदेव अर्थात मी स्वयं सखा,पांडवात धनंजय (अर्थात तू),मुनींमध्ये वेदव्यास,कवींमध्ये शुक्राचार्य कवी सुध्दा मीच आहे.

दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।

मोनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ।।३८।।

दमन - हिन वृत्तीचे दमन,मौन,गुह्य- न जाणता येणारे

दण्ड:,दमयताम्,अस्मि,नीति:,अस्मि,जिगीषताम् ।

मोनम्,च,एव,अस्मि,गुह्यानाम्,ज्ञानम्,ज्ञानवताम्,अहम् ।।३८।।

मी दमन करणाऱ्यांचा दंड अर्थात दमन करणारी शक्ती आहे,जिंकायची इच्छाअसणाऱ्यांची निती मीच आहे,गुप्त ठेवण्याच्या भावांचा रक्षक (गुप्तता राखणारा) मीच आहे,तसेच ज्ञानी पुरुषात तत्वज्ञान मीच आहे.

यच्चापि सर्वभूतांना बीजं तदहमर्जुन ।

न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ।।३९।।

यत्,च,अपि,सर्वभूतांनाम्,बीजम्,तत्,अहम्,अर्जुन ।

न,तत,अस्ति,विना,यत्,स्यात्,मया,भूतम्,चराचरम् ।।३९।।

आणि हे अर्जुन ! सर्व भूतांच्या उत्पत्तीचे कारण आहे,ते मीच आहे,कारण असे चर-अचर कोणतेही भूत नाही जे माझ्याशिवाय आहे.

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंन्तप ।

एष तूघ्येशत: प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ।।४०।।

न,अन्त:,अस्ति,मम,दिव्यानाम्,विभूतीनाम्,परंन्तप ।

एष:,तु,उघ्येशत:,प्रोक्त:,विभूते,विस्तर:,मया ।।४०।।

हे परंतप ! माझ्या दिव्य विभूतींचा अन्त नाही,मी आपल्या विभूतींचा हा विस्तार तुझ्यासाठी एकदेश अर्थात संक्षिप्त स्वरुपात सांगितला.

यद्यव्दिभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।

तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ।।४१।।

यत्,यत्,विभूतिम्,सत्वम्,श्रीमत्,उर्जित्,एव,वा ।

तत्त्,तत्,एव,अवगच्छ,त्वम्,मम,तेजोंऽशसंम्भवम् ।।४१।।

जि जि विभूतियुक्त अर्थात ऐश्र्वर्ययुक्त,कांतियुक्त व शक्तियुक्त वस्तू आहे.त्या त्या वस्तूस तु माझ्या तेजाच्या अंशाची अभिव्यक्ती समज.

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।

विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ||४२||

अथवा,बहुना,ऐतेन,किम्,ज्ञातेन,तव,अर्जुन ।

विष्टभ्य,अहम्,इदम्,कृत्सनम्,एकांशेन,स्थित:,जगत् ||४२||

अथवा हे अर्जुन ! हे इतके जाणण्याचे तुझे काय प्रयोजन आहे !,मी ह्या संपूर्ण जगतास आपल्या योगशक्तीच्या एका अंशाने धारण केले आहे.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतीयोगो नाम दशमोऽध्याय: ||१०||

## श्रीमदभगवदगीता अध्याय अकरावा

## " विश्र्वरूपदर्शनयोग "

अनेक दिव्य विभूती अवस्थेनंतर त्यास सगळीकडे परमेश्र्वराचेच स्वरूप आहे असे जाणवते पण त्यास त्यास त्याचा आदि मध्य अंत कळत नाही,त्याचा अहंभाब नष्ट होतो व साधक नम्र होतो.

अर्जुन उवाच

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसञ्ज्ञितम् ।

यत्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ||१||

मदनुग्रहाय,परमम्,गुह्यम्,अध्यात्मसञ्ज्ञितम् ।

यत्.त्वया,उक्त्मम्,वच:,तेन,मोह:,अयम्,विगत:,मम ||१||

अर्जुन म्हणाले- माझ्यावर अनुग्रह करण्यासाठी आपण जे परम गोपनीय अध्यात्मविषयक वचन (बोध) अर्थात उपदेश सांगितला,त्याने माझे अज्ञान नष्ट झाले.

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।

त्वत्त: कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ||२||

भवाप्ययौ,हि.भूतानाम्,श्रुतौ,विस्तरश:,मया ।

त्वत्त:,कमलपत्राक्ष,माहात्म्यम्,अपि,अव्ययम् ||२||

कारण हे कमलनेत्र ! मी आपल्याकडून भूतांची उत्पत्ति व प्रलय विस्तारपूर्वक ऐकला,तसेच तुमचा अविनाशी महिमा सुध्दा ऐकला,

एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।

द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरूषोत्तम।।३।।

एवम,एतत्,यथा.आत्थ,त्वम,आत्मानम्,परमेश्वर ।

द्रष्टुम्,इच्छामि,ते,रूपम्,ऐश्वरम्,पुरूषोत्तम।।३।।

हे परमेश्वर ! आपण आपले वर्णन करता ते ठीक असेच आहे,परंतु ! हे पुरुषोत्तम ! तुमच्या ज्ञान,ऐश्वर्य,शक्ती,बळ,वीर्य व तेजयुक्त ऐश्वर (ऐश्वर्य संपन्न) स्वरूपास मी प्रत्यक्ष पाहू इच्छितो.

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।

योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ।।४।।

मन्यसे,यदि,तत्,शक्यम्,मया,द्रष्टुम,इति,प्रभो ।

योगेश्वर,ततः,मे,त्वम्,दर्शय,आत्मानम्,अव्ययम् ।।४।।

हे ! प्रभो जर मला ते रूप पाहणे शक्य आहे,असे आपण समजत असाल,तर त्या अविनाशी स्वरूपाचे मला दर्शन घडवा.

श्रीभगवानुवाच

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्त्रशः ।

नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ।।५।।

पश्य,मे,पार्थ,रूपाणि,शतशः,अथ,सहस्त्रशः ।

नानाविधानि,दिव्यानि,नानावर्णाकृतीनि,च ।।५।।

परमेश्वर निर्गुण निराकार आहे परंतु साधना मार्गाने जाताना आपल्या पूर्वसंस्कारानुसार तो अनेक अनुभव पाहतो.त्याचे निराकरण झाल्यावरच निर्गुण स्वरूप पाहता येते.साधकाच्या अवस्थेनुसार विविध वर्णांचे दर्शन होते.

श्रीभगवान म्हणाले - हे पार्थ ! आता तु माझ्या शेकडो हजारो नानाप्रकारचे व नाना वर्ण तथा आकृती असलेले अलौकिक रुप पहा.

पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।

बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ।।६।।

पश्य,आदित्यान्,वसून,रुद्रान्,अश्विनौ,मरुत:,तथा ।

बहूनि,अदृष्टपूर्वाणि,पश्य,आश्चर्याणि,भारत ।।६।।

हे भरतवंशी अर्जुन ! तु माझ्यात आदित्यांचे अर्थात आदितीच्या व्दादश पुत्रांचे,आठ वसूंचे,एकादश रुद्रांचे,दोन्ही अश्विनी कुमारांचे व एकोणचाळीस मरूद्गणांना पहा,तसेच बरीच आधी कधीच न पाहिलेली आश्चर्यमय रूपे पहा.

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्दय सचराचरम् ।

मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ।।७।।

इह,एकस्थम्,जगत्,कृत्स्नम्,पश्य,अद्य,सचराचरम् ।

मम,देहे,गुडाकेश,यत्,च,अन्यत्,द्रष्टुम्,इच्छसि ।।७।।

गुडाकेश - आळस व निद्रा ह्यांचा नाश करणारा साधक,जे दिव्य दर्शनासाठी आवश्यक आहे.

हे अर्जुन ! आता तु माझ्या शरीरात एका जागी स्थित चराचरासहित संपूर्ण जग पहा व अजूनही काही जे पाहायचे असेल ते पहा.

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।

दिव्यं ददामि ते चक्षु; पश्य मे योगमैश्वरम् ।।८।।

न,तु,माम्,शक्यसे,द्रष्टुम,अनेन,एव,स्वचक्षुषा ।

दिव्यम्,ददामि,ते,चक्षु;,पश्य,मे,योगम्,ऐश्वरम् ।।८।।

योगमार्गातील साधक दिव्य दर्शन हे ज्ञानदृष्टीने घेतो चर्मचक्षु तेव्हा बंद होतात,हे ज्ञान शब्द व दृश्य ह्याप्रकाराने होते,ऋषी तुर्यावस्थेत हे ज्ञान प्राप्त करतात.

परंतु मला तु ह्या आपल्या सध्याच्या डोळ्यांनी पाहू शकण्यासनि:संदेह असमर्थ आहेस,ह्यासाठी मी तुला दिव्य अलौकिक नेत्र देतो,ह्याने तु माझ्या ईश्वरीय योगशक्तीस पहा.

एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरि: ।

दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ।।९।।

एवम्,उक्त्वा,तत,राजन्,महायोगेश्वर:,हरि: ।

दर्शयामास,पार्थाय,परमम्,ऐश्वरम् ।।९।।

संजय म्हणाले, हे राजन ! महायोगेश्वर व सर्व पापांचा नाश करणाऱ्या भगवंताने ह्याप्रकारे सांगून त्या पश्चात अर्जुनास परम ऐश्वर्ययुक्त दिव्यस्वरूप दाखविले,

अनेकवक्त्रनयनमनेकाभ्दुतदर्शनम् ।

अनेकदिव्याभरणं दिव्याणेकोद्यतायुधम् ।।१०।।

अनेकवक्त्रनयनम्,अनेकादभुतदर्शनम् ।

अनेकदिव्याभरणम्,दिव्यानेकोद्ययतायुधम् ।।१०।।

दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।

सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ।।११।।

दिव्यमाल्याम्बरधरम्,दिव्यगन्धानुलेपनम् ।

सर्वाश्चर्यमयम्,देवम्,अनन्तम्,विश्वतोमुखम् ।।११।।

अनेक मुख व नेत्रांनी युक्त,अनेक अभ्दुत दर्शन असणाऱ्या,बऱ्याचश्या दिव्य भूषणांनी व शस्त्रांनीयुक्त व बरीच दिव्य शस्त्रे हातात असलेल्या,दिव्य माळा व वस्त्र धारण केलेल्या व दिव्य गंधाचा लेप सर्वत्र शरीरास लावलेल्या व सगळीकडे तोंड असलेल्या विराटस्वरूप परमदेव परमेश्वरास अर्जुनाने पाहिले.

दिवि सूर्यसहस्त्रस्य भवेद्दयुगपदुत्थिता ।

यदि भा: सदृशी सा स्याभ्दासस्तस्य महात्मन: ।।१२।।

दिवि,सूर्यसहस्त्रस्य,भवेत्,युगपत्,उत्थिता ।

यदि,भा:,सदृशी,सा,स्यात,भास:,तस्य,महात्मन: ॥१२॥

आकाशात एकचवेळी हजारसूर्यांचा उदय झाल्यावर जो प्रकाश असेल,तसा प्रकाश त्या विश्र्वरूप परमात्म्याच्या प्रकाशासारखा कदाचित असू शकेल.

तंत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।

अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्ड़वस्तदा ॥१३॥

तंत्र,एकस्थम्,जगत्,कृत्स्नम्,प्रविभक्तम्,अनेकधा ।

अपश्यत्,देवदेवस्य,शरीरे,पाण्ड़व,तदा ॥१३॥

पांण्डुपुत्र अर्जुनाने त्यावेळी अनेक प्रकारच्या विभक्त अर्थात विविध-विविध संपूर्ण जगास,देवांचा देव श्रीकृष्ण भगवंताच्या त्या शरीरात एका ठिकाणी स्थित पाहिले,

तत: स विसंयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जय: ।

प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥१४॥

तत:,स:,विसंयाविष्ट:,हृष्टरोमा,धनञ्जय: ।

प्रणम्य,शिरसा,देवम्,कृताञ्जलि:,अभाषत ॥१४॥

त्यांच्या अवर्णनीय स्वरूपाने आश्र्चर्यचकित व पुलकित (रोमांचयुक्त) अर्जुन प्रकाशमय विश्र्वरूप परमात्म्यास श्रध्दा-भक्तिसहित साष्टांग प्रणाम करून हाथ जोड़ून म्हणाले.

अर्जुन उवाच

पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वास्तथा भूतविशेषसघ्ड़ान् ।

ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्र्च सर्वांनुरगांश्र्च दिव्यान् ॥१५॥

पश्यामि,देवान्,तव,देव,देहे,सर्वान्,तथा,भूतविशेषसंघान् ।

ब्रह्माणम्,ईशम्,कमलासनस्थम्,ऋषींन्,सर्वांन्,उरगान्,च,दिव्यान् ॥१५॥

साधकाच्या कुंडलिनी जागृतीतील अनुभव आहेत.जे देहभानावर (मूळपदी आल्यावर) कथन केले आहेत.

अर्जुन म्हणाले - हे देव ! मी आपल्या शरीरात संपूर्ण देवांना तसेच अनेक भुतांच्या समुदायास,तसेच कमळावर विराजमान ब्रह्मा,महादेव व संपूर्ण ऋषिंना तसेच दिव्य सर्पांना पाहतो आहे.

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽन्तरुपम् ।

नान्तं न मध्यं न पुनस्तवादिंपश्यामि विश्र्वेश्र्वर विश्र्वरूप ।।१६।।

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्,पश्यामि,त्वाम्,सर्वत:,अन्तरुपम् ।

न,अन्तम्,मध्यम्,न,पुत्र:,तव,आदिम्,पश्यामि,विश्र्वेश्र्वर,विश्र्वरूप ।।१६।।

हे संपूर्ण विश्र्वाच्या स्वामी ! आपल्याला अनेक भूजा,पोट,मुख व नेत्रयुक्त तसेच सगळीकडून अनन्त रूपे असणारा मी पाहतो ! हे विश्र्वरूप ! मला तुमचा ना अन्त ना मध्य ना आदि (सुरवात) दिसत नाही.

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।

पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ।।१७।।

किरीटिनम्,गदिनम्,चक्रिणम्,च,तेजोराशिम्,सर्वत:,दीप्तिमन्तम् ।

पश्यामि,त्वाम्,दुर्निरीक्ष्यम्,समन्तात्,दीप्तानलार्कद्युतिम्,अप्रमेयम् ।।१७।।

तुम्हाला मी मुकुट घातलेला,गदायुक्त व चक्र धारण केलेला तसेच सर्वप्रकारांनी प्रकाशमान तेज:पुज्ज,प्रज्वलित अग्नि व सूर्यासारखा (सदृश्य) ज्योतियुक्त,पाहण्यास व जाणण्यास कठिण व सर्व बाजूंनी अप्रमेय (ज्याचा थांग लागत नाही असे) स्वरूप पाहतो आहे.

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्र्वस्य परं निधानम् ।

त्वमव्यय: शाश्र्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ।।१८।।

त्वम्,अक्षरम्,परमम्,वेदितव्यम्,त्वम्,अस्य,विश्र्वस्य,परम्,निधानम् ।

त्वम्,अव्यय:,शाश्र्वतधर्मगोप्ता,सनातन:,त्वम्,पुरुष:,मत:,मे ।।१८।।

तुम्हीच जाणण्यास योग्य परम अक्षर अर्थात परब्रह्म परमात्मा आहात.तुम्हीच ह्या जगाचे परम आश्रय आहात,तुम्हीच अनादि व धर्माचे रक्षक आहात.व तुम्हीच अविनाशी सनातन पुरुष आहात.असे माझे मत आहे.

अनादिमध्यान्तमनन्तवीर्य मनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।

पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्र्वमिदं तपन्तम् ।।१९।।

अनादिमध्यान्तम्,अनन्तवीर्यम्,अनन्तबाहुम्,शशिसूर्यनेत्रम् ।

पश्यामि,त्वाम्,दीप्तहुताशवक्त्रम्,स्वतेजसा,विश्र्वम्,इदम्,तपन्तम् ।।१९।।

तुम्हि आदि,अन्त व मध्य रहित,अनन्त सामर्थ्याने युक्त,अनंत भुजा असलेले,चन्द्र-सूर्यरूप नेत्रांचे,प्रज्वलित अग्निरूप मुख असणारे व आपल्या तेजाने ह्या जगास तापवणारे (प्रकाशित) आहात असे मला दिसत आहे.

द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्र्च सर्वा: ।

दृव्ष्टाभ्दुतं रूपमूग्रं तवेदंलोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ।।२०।।

द्यावापृथिव्यो:,इदम्,अन्तरम्,हि,व्याप्तम्,त्वया,एकेन,दिश:,च,सर्वा: ।

दृव्ष्टादभ्दुतम्,रूपम,उग्रम्,तव,इदम्,लोकत्रयम्,प्रव्यथितम्,महात्मन् ।।२०।।

हे महात्मा ! स्वर्ग व पृथ्वीच्या मधले संपूर्ण आकाश तसेच सर्व दिशा आपल्या मुळेच परिपूर्ण आहेत.तसेच तुमच्या अलौकिक व भयंकर रूपास पाहून तिन्ही लोक अतिशय व्यथीत होत आहेत.

अमी हि त्वां सुरसघ्ङा विश्यन्ति केचिभ्दीता: प्रात्र्जलयो ग्रुणन्ति ।

स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसघ्ङा स्तुवन्ति त्वां स्तुतिभि: पुष्कलाभि: ।।२१।।

अमी,हि,त्वाम्,सुरसंघा,विश्यन्ति,केचित्,भिता:,प्रात्र्जलय:,ग्रुणन्ति ।

स्वस्ति,इति,उक्त्वा,महर्षिसिद्धसघा,स्तुवन्ति,त्वाम्,स्तुतिभि:,पुष्कलाभि: ।।२१।।

तसेच देवतांचे समूह आपल्यात प्रवेश करून व थोडे भयभीत होऊन हाथ जोडून तुमच्या नाम व गुणांचे उच्चांरण करत आहेत,तसेच महर्षी व सिध्दांचे समुदाय “कल्याण असो” म्हणत उत्तम उत्तम स्त्रोत्रांनी आपली स्तुती करत आहेत.

रुदादित्या वसवो ये च साध्याविश्र्वेऽश्र्विनौ मरुतश्र्चोष्मपाश्र्च ।

गन्धर्वयक्षासुरसिद्धसघ्ङावीक्षन्ते त्वां विस्मिताश्र्वैव सर्वे ।।२२।।

रुदादित्या:,वसव:,ये,च,साध्या:,विश्र्वे,अश्र्विनि,मरुत:,उष्मपा:,च ।

गन्धर्वयक्षासुरसिध्दसंघा,वीक्षन्ते,त्वाम्,विस्मिता:,च,एव,सर्वे ।।२२।।

अकरा रुद्र व बारा आदित्य तसेच आठ वसू,सिध्दगण,विश्र्वदेव,अश्र्विनीकुमार तसेच मरूद्गण व पितर ह्यांचा समुदाय तसेच गंधर्व,यक्ष,राक्षस व सिध्दांचा समुदाय आहे,ते सर्वच विस्मित होऊन आपणास पाहात आहेत.

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरूपादम् ।

बहुदरं बहुदंष्ट्राकरालं दृव्ष्टा लोका: प्रव्यथितास्तथाहम् ।।२३।।

रूपम्,महत्,ते,बहुवक्त्रनेत्रम्,महाबाहो,बहुबाहूरूपादम् ।

बहुदरम्,बहुदंष्ट्राकरालम्,दृव्ष्टा,लोका:,प्रव्यथिता:,तथा,अहम् ।।२३।।

हे महाबाहो ! मोठे मुख व नेत्र असणारेआपले बरेच हात,जंघा व पाय,बरीच पोटे व बऱ्याच दाढांच्यामुळे अत्यंत विक्राळ असे महानरूप (भयंकर) पाहून सर्व लोक व्याकूळ होत आहेत,तसेच मी सुध्दा व्याकूळ होत (झालो) आहे.

नभ:स्पृशं दीप्तमनेकवर्णव्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।

दृव्ष्टा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ।।२४।।

नभ:स्पृशम्,दीप्तमनेकवर्ण,व्यात्ताननम्,दीप्तविशालनेत्रम् ।

दृव्ष्टा,हि,त्वाम्,प्रव्यथितान्तरात्मा,धृतिम्,न,विन्दामि,शमम्,च,विष्णो ।।२४।।

कारण हे विष्णो ! आकाशास स्पर्श करणाऱ्या,दैदिप्यमान,अनेक वर्णांनी युक्त तसेच उघडलेली विक्राळ मुखे व प्रकाशमान विशाल नेत्रयुक्त आपणास पाहून भयभीत अंतःकरण असणारा मी धैर्य व शान्ति गमावून बसलो आहे.

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृव्ष्टैव कालानलसन्निभानि ।

दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ।।२५।।

दंष्ट्राकरालानि,च,ते,मुखानि दृष्टवा,कालानलसन्निभानि, ।

दिश:,न,जाने,न,लभे,च,शर्म,प्रसीद,देवेश,जगन्निवास ।।२५।।

देहबुध्दीत,वस्तू व काळ ह्यांच्यामुळे दिशेचे ज्ञान होते,पण योगमार्गात जसे जसे साधक वर जातो तसतसे हे ज्ञान धूसर होत जाते.

दाढांमुळे विक्राळ व प्रलयंकारी (जणू प्रलयकाळचा अग्नीच) अग्नि आपल्यामुखात प्रज्वलीत पाहून मला दिशाच दिसत नाहित,ज्याने मला सुख-संतोष होत नाही.म्हणून हे देवेश ! हे जगन्निवास ! माझ्यावर प्रसन्न व्हा.

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्रा: सर्वे सहैवावनिपालसङ्घै: ।

भीष्मो द्रोण: सुतपूत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यै: ।।२६।।

अमी,च,त्वाम्,धृतराष्ट्रस्य,पुत्रा:,सर्वे,सह,एव,अवनिपालसघै: ।

भीष्म:द्रोण:,सूतपूत्र:,तथा,असौ,सह,अस्मतीयै:,अपि,योधमुख्यै: ।।२६।।

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।

केचिद्विलग्ना दशनान्तरेषु सद्रुश्यन्ते चूर्णितैरुत्तमाग्डै: ।।२७।।

वक्त्राणि,ते,त्वरमाणा:,विशन्ति,दंष्ट्राकरालानि,भयानकानि ।

केचित्,विलग्ना,दशनान्तरेषु:,सद्रुश्यन्ते,चूर्णितै,उत्तमाग्डै: ।।२७।।

वाईट प्रवृत्ती वेगाने नष्ट होत असल्याचे साधकाच्या लक्षात येते.

ते सर्व धृतराष्ट्राचे पुत्र,राजांचे समुदाय,आपल्यात प्रवेश करत आहेत व भीष्मपितामह,द्रोणाचार्य तसेच त्यांच्या पक्षातील कर्ण व आमच्या पक्षातील सुध्दा मुख्य योध्दयांसहित सर्वच्या सर्व आपल्या दाढांमुळे विक्राळ व भयानक मुखात मोठ्या वेगाने (दौडत) प्रवेश करत आहेत. व काही,डोक्यांचा भुगा झालेल्या स्थितीत दातांच्या मध्ये दिसत आहेत.

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगा: समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।

तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ।।२८।।

यथा,नदीनाम्,बहव:,अम्बुवेगा:,समुद्रम्,एव,अभिमुखा:,द्रवन्ति ।

तथा,तव,अमी,नरलोकवीरा:,विशन्ति,वक्त्राणी,अभिविज्वलन्ति ।।२८।।

ज्याप्रकारे नदिचे पाणी स्वाभाविकपणे समुद्राच्या दिशेने वाहते. अर्थात समुद्रास जाऊन मिळते, त्याचप्रमाणे हे नरलोकाचे वीर सुध्दा तुमच्या प्रज्वलित मुखात प्रवेश करत आहेत.

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गाविशन्ति नाशाय समृध्दवेगा: ।

तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृध्दवेगा: ।।२९।।

यथा,प्रदीप्तम्,ज्वलनम्,पतङ्ग,विशन्ति,नाशाय,समृध्दवेगा: ।

तथा,एव,नाशाय,विशन्ति,लोका:,तव,अपि,वक्त्राणि,समृध्दवेगा: ।।२९।।

जसा पतंग मोहवश नष्ट होण्यासाठी प्रज्वलित अग्नीत अतिवेगाने=जणू धावतच प्रवेश करतो,तसेच हे सर्व नरलोकाचे वीर सुध्दा आपल्या नाशासाठी तुमच्या मुखात धावतच प्रवेश करत आहेत.

लेलिह्यसे ग्रसमान: समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भि: ।

तेजोभिरापूर्य जगत्समग्रंभासस्तवोग्रा: प्रतपन्ति विष्णो ।।३०।।

लेलिह्यसे,ग्रसमान:,समन्तात्,लोकान्,समग्रान्,वदनै:,ज्वलद्भि: ।

तेजोभि:,आपूर्य,जगत्,समग्रम्,भास:,तव,उग्रा:,प्रतपन्ति,विष्णो ।।३०।।

तुम्ही ह्या जगाचे पालन कर्ता असून सुध्दा संपूर्ण लोकांचा प्रज्वलित मुखाने ग्रास (नाश) करत सगळीकडून सारखे-सारखे चाटत आहात.आपला उग्रप्रकाश संपूर्ण जगास तेजाने परिपूर्ण करून तापवीत (ताप देत) आहे.

आख्याहि मे को भवानुग्ररुपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।

विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्दयं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ।।३१।।

आख्याहि,मे,क:,भवान्,उग्ररुप,नम:,अस्तु,ते,देववर,प्रसीद ।

विज्ञातम्,इच्छामि,भवन्तम्,आद्यम्,न,हि,प्रजानामि,तव,प्रवृत्तिम् ।।३१।।

शून्यावस्थेत साधकास सवय नसल्याने दुर्घट अवस्थेचा अनुभव येतो तेव्हा तो माघारी येतो व त्या स्वरूपाविषयी विचार करतो.

मला सांगा,कि आपण उग्ररूपवाले हे कोण आहात? हे देवांत श्रेष्ठ ! आपल्याला नमस्कार असो ! आपण प्रसन्न व्हा ! आदिपुरुष आपणाला मी विशेषरूपाने जाणू इच्छितो,कारण मी आपल्या (तुमच्या) प्रवृत्तीस जाणत नाही.

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृध्दोलोकान्समाहर्तुमिह प्रवृत्त: ।

ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिता: प्रत्यनीकेषु योधा: ।।३२।।

काल:,अस्मि,लोकक्षयकृत्,प्रवृध्द:,लोकान्,समाहर्तुम्,इह,प्रवृत्त: ।

ऋते,अपि,त्वाम्,न,भविष्यन्ति,सर्वे,ये,अवस्थिता:,प्रत्यनीकेषु,योधा: ।।३२।।

कल्पनारहित अवस्थेत सर्वव पूर्वीच्या धारणा व कल्पना ह्यांचा नाश होतो.

श्रीभगवान म्हणाले - मी लोकांचा नाश करण्यासाठी,वाढलेला महाकाळ आहे,ह्यावेळी ह्या लोकांना नष्ट करण्यास प्रवृत्त झालो आहे.ह्यासाठी जे प्रतिपक्षाच्या सेनेत स्थित योध्दा लोक आहेत,ते सर्व तुझ्याशिवाय सुध्दा असणार नाहीत,अर्थात तु युध्द कर अथवा करू नकोस त्यांचा नाश होणारच आहे.

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।

मयैवैते निहता: पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ।।३३।।

तस्मात्,त्वम,उत्तिष्ठ,यश:,लभस्व,जित्वा,शत्रून्,भुङ्क्ष्व,राज्यम,समृध्दम् ।

मया,एव,एते,निहता:,पूर्वम,एव,निमित्तमात्रम्,भव,सव्यसाचिन् ।।३३।।

साधारण समाज हा डावीकडे असतो व त्याची अपेक्षा त्यामार्गने फळ प्राप्तीची अपेक्षा असते,धनुर्धारी हि उजव्या हाताने करतात पण अर्जुन असामान्य (वृत्ती साधक) योध्दा दोन्ही हाताने बाण चालवितो.

म्हणून तू उठ ! यश प्राप्त कर व शत्रूंवर मात करून त्यांना जिंकून धन-धान्याने संपन्न राज्याचा भोग घे,सर्व शूरवीर प्रथमच माझ्याकडून मारले गेले आहेत,हे सव्यसाची ! (डाव्या हाताने सुध्दा बाण सोडणारा ) तू केवळ निमित्तमात्र हो.

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।

मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठायुध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ।।३४।।

द्रोणम्,च,भीष्मम्,च,जयद्रथम्,च,कर्णम्,तथा,अयान्,अपि,योधवीरान् ।

मया,हतातन,त्वम्,जहि,मा,व्यथिष्ठा,युध्यस्व,जेतासि,रणे,सपत्नान् ।।३४।।

द्रोणाचार्य व भीष्मपितामह तसेच जयद्रथ व कर्ण तसेच आणि सुध्दा बरेच माझ्याकडून मारले गेलेले शूरवीर त्यांना तू मार,भयाचा त्याग कर ! नि:संदेह तू युध्दात वैऱ्यांना जिंकशील,म्हणून युध्द कर.

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमान: किरीटी ।

नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णंसगग्ददं भीतभीत: प्रणम्य ।।३५।।

एतत्,शुत्वा,वचनम्,केशवस्य,कृताञ्जलि:,वेपमान:,किरीटी ।

नमस्कृत्वा,भूय:,एव,आह,कृष्णम्,सगदगदम्,भीतभीत:,प्रणम्य ।।३५।।

साधना अवस्थेच्या वरच्या स्तरावर अष्ट सात्विकभाव जागे होऊन तो गदगद होतो.

संजय म्हणाले– केशव-भगवंताच्या ह्या वचनास ऐकून मुकुटधारी अर्जुन हात जोडून कापत नमस्कार करून,तरीसुध्दा अत्यंत भयभीत होऊन प्रणाम करून भगवान श्रीकृष्णाच्या प्रति गद्गद वाणीने म्हणाले,

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृयष्यत्यनुरज्यते च ।

रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसघ्ङा ।।३६।।

स्थाने,हृषीकेश,तव,प्रकीर्त्या,जगत्,प्रहुष्यति,अनुरज्यते,च ।

रक्षांसि,भीतानि,दिश:,द्रवन्ति,सर्वे,नमस्यन्ति,च,सिध्दसघ्ङा ।।३६।।

अर्जुन म्हणाले ! हे अंतर्यामी ! हे योग्यच आहे कि आपल्या नाम,गुण व प्रभावाच्या कीर्तनाने जगत् अतिहर्षित होत आहे व अनुरागासच प्राप्त होत आहे,तसेच भयभीत राक्षसलोग सर्व दिशांना पळत आहेत,तसेच सर्व सिध्दगणांचे समुदाय आपणास नमस्कार करत आहेत,

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।

अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ।।३७।।

कस्मात्,च,ते,न,नमेरन्,महात्मन्,गरीयसे,ब्रह्मण:,अपि,आदिकर्त्रे ।

अनन्त,देवेश,जगन्निवास,त्वम्,अक्षरम्,सत्,असत्,तत्परम्,यत् ।।३७।।

हे महात्मा ! ब्रह्माचा सुध्दा आदिकर्ता अश्या सगळ्यात मोठ्यास (तुम्हास) ते नमस्कार का करणार नाहित? हे योग्यच आहे,कारण हे अनन्त ! हे देवेश ! हे जगन्निवास ! जे सत्य असत्य व त्यापलीकडील अक्षर अर्थात सच्चिदानन्दघन ब्रह्म आहे,ते आपणच आहात.

त्वमादिदेव: पुरुष: पुराणस्त्वमस्य विश्र्वस्य परं निधानम् ।

वेत्तासि वेद्दयं च परं च धाम त्वया ततं विश्र्वमनन्तरूप ।।३८।।

त्वम,आदिदेव:,पुरुष:,पुराणस्त्वमस्य,विश्र्वस्य,परम्,निधानम् ।

वेत्ता,असि,वेद्यम्,च,परम्,च,धाम,त्वया,ततम्,विश्र्वम्,अनन्तरूप ।।३८।।

आपण आदिदेव व सनातन पुरुष आहात,आपण ह्या जगाचे परम आश्रय व जाणणारे तसेच जाणण्या योग्य असे परम धाम आहात ! हे अनन्तरूप ! आपणच हे सर्व जग व्यापलेले अर्थात परिपूर्ण आहे.

वायुर्यमोऽग्निर्वरुण: शशाक्ङ: प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्र्च ।

नमो नमस्तेऽस्तु सहस्त्रकृत्व: पुनश्र्च भूयोऽपि नमो नमस्ते ।।३९।।

वायु:,यम:,अग्नि:,वरुण:,शशाक्ङ:,प्रजापति,त्वम्,प्रपितामह:,च ।

नम:,नम:,ते,अस्तु,सहस्त्रकृत्व:,पुन:,च,भूय:,अपि,नम:,नम:ते ।।३९।।

आपणच आप,वायु,यमराज,अग्नि,वरुण,चन्द्रमा,प्रजेचे स्वामी ब्रह्मा व ब्रह्माचे सुध्दा वडील आहात,आपल्याला हजार वेळा नमस्कार असो ! नमस्कार असो ! आपल्याला परत-परत नमस्कार ! नमस्कार !!

नम: पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।

अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्व समाप्नोषि ततोऽसि सर्व: ।।४०।।

नम:,पुरस्तात्,अथ,पृष्ठत:,ते,नम:,अस्तु,ते,सर्वत:,एव,सर्व ।

अनन्तवीर्य,अमितविक्रम:,त्वम्,सर्वम्,समाप्नोषि,तत:,असि,सर्व: ।।४०।।

हे अनन्त सामर्थ्यवान ! आपणास मागून पुढून सुध्दा नमस्कार असो ! हे सर्वात्मन् ! आपणाला सर्व बाजूंनी नमस्कार असो,कारण अनन्त पराक्रमशाली तुम्ही समस्त संसारच व्यापलेला आहे,म्हणून तुम्हीच सर्वरूप आहात.

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।

अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥४१॥

सखा,इति,मत्वा,प्रसभम्,यत्,उक्तम्,हे,कृष्ण,हे,यादव,हे,सखे,इति ।

अजानता,महीमानम्,तव,इदम्,मया,प्रमादात्,प्रणयेन,अपि ॥४१॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।

एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥

यत्,च,अवहासाथम्,असत्कृत:,असि,विहारशय्यासनभोजनेषु ।

एक:,अथवा,अपि,अच्युत,तत्समक्षम्,तत्,क्षामये,त्वाम्,अहम,अप्रमेयम् ॥४२॥

आपल्या ह्या स्वभावास न जाणता,तुम्ही माझे सखा आहात असे समजून प्रेम अथवा प्रमादाने सुध्दा मी “हे कृष्ण” ! ‘ हे यादव ‘ ! ‘ सखा ‘ ! जे विचार न करता,काही न समजता अनाहूतपणे म्हंटले तसेच हे अच्युत ! सहजपणे विनोदाने विहार,शय्या,आसन व भोजन ह्या वेळेस एकट्याने वा मित्रांबरोबर माझ्याकडून आपला अपमान झाला असेल त्या सर्व अपराधांची मी हे अनाकलनीयस्वरूप अर्थात अचिंत्य प्रभाव असणाऱ्या तुमची (मी) क्षमा मागतो.

पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्र्च गुरुर्गरीयान् ।

न त्वत्समोऽस्त्यभ्यधिक: कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥४३॥

पिता,असि,लोकस्य,चराचरस्य,त्वम्,अस्य,पूज्य,च,गुरु,गरीयान् ।

न,त्वत्सम,अस्ति,अभ्यधिक:,कुत:,अन्य,लोकत्रये,अपि,अप्रतिमप्रभाव ॥४३॥

आपण ह्या चराचर जगताचे पिता व सगळ्यात मोठे गुरु आहात,तसेच अति पूजनीय आहात,,हे अनुपम प्रभाव असणाऱ्या ! तीनही लोकात आपल्या समान कोणी नाही,त्यामुळे आपल्या पेक्षा मोठे असणारा कसा असू शकतो.

तस्मात्पणम्य प्रणिधाय कायंप्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।

पितेव पुत्रस्य सखेव सख्यु: प्रिय: प्रिय: प्रियायार्हसि देव सोढुम् ॥४४॥

तस्मात्,प्रणम्य,प्रणिधाय,कायम्,प्रसादये,त्वाम्,अहम्,इशम्,ईड्यम् ।

पित,इव,पुत्रस्य,सखा,इव,सख्यु:,प्रिय:,प्रियाया:,अर्हसि,देव,सोढुम् ।।४४।।

त्यासाठी हे प्रभो ! माझा देह आपल्या चरणी निवेदन (अर्पण) करून,विनम्र प्रणाम करून,स्तुती करण्यायोग्य तुम्हा ईश्वराला प्रसन्न होण्यासाठी प्रार्थना करतो. हे देव ! पिता जसे पुत्राचे,सखा जसे सख्याचे व पति जसे प्रियतमा पत्नीचे अपराध सहन करतो,त्याप्रमाणे तुम्हीसुध्दा त्याचप्रमाणे माझ्या अपराधांना सहन करण्यास योग्य आहात.

अदृष्टपूर्व हृषितोऽस्मि दृव्ष्टा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।

तदेव मे दर्शय देवरूपं प्रसीद देवेश जगन्निवास ।।४५।।

अदृष्टपूवम्,हृषित:,अस्मि,दृव्ष्टवा,भयेन,च,प्रव्यथितम्,मन:,मे ।

तत,एव,मे,दर्शय,देव,रूपम्,प्रसीद,देवेश,जगन्निवास ।।४५।।

मी प्रथम कधी न पाहिलेल्या आपल्या आश्र्चर्यमय रुपास पाहून हर्षित होत आहे व माझे मन भयाने अतिशय व्याकूळ सुध्दा झाले आहे,म्हणून आपण आपल्या देवरूप,चतुर्भुज विष्णूरूपाचे मला दर्शन करावे,हे देवेश! हे जगन्निवास ! आपण प्रसन्न व्हावे.

किरीटिनं गदिनं चक्रहस्त मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।

तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्त्रबाहो भव विश्र्वमूर्ते ।।४६।।

किरीटिनम्,गदिनम्,चक्रहस्तम्,इच्छामि,त्वाम्,द्रष्टुम्,अहम्,तथा,एव ।

तेन,एव,रूपेण,चतुर्भुजेन,सहस्त्रबाहो,भव,विश्र्वमूर्ते ।।४६।।

मी आपणास मुकुट धारण केलेले व शंख चक्र गदा हातात घेतलेले पाहू इच्छितो,म्हणून हे विश्र्वस्वरूप ! हे सहस्त्रबाहु ! आपण आपल्या चतुर्भुज स्वरूपातच प्रकट व्हा.

मया प्रसन्नेन तवांर्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।

तेजोमयं विश्र्वमनन्तमाद्दयं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ।।४७।।

मया,प्रसन्नेन,तव,अर्जुन,इदम्,रूपम्,परम्,दर्शितम्,आत्मयोगात् ।

तेजोमयम्,विश्र्वम्,अनन्तम्,आद्यम्,यत्,मे,त्वदन्येन,न,दृष्टपूर्वम् ।।४७।।

श्रीभगवान म्हणाले - हे अर्जुन ! अनुग्रहपूर्वक मी आपल्या योगशक्तीने माझे तेजोमय,सर्वांचा आदि व सीमारहित असे विराट स्वरूप तुला दाखविले,तुझ्या शिवाय दुसऱ्या कोणीही हे प्रथम पाहिलेले नाही.तसेच हा अनुभव कोणासही पूर्वी आलेला नाही.

न वेद्दयज्ञाध्ययनैर्न दानै र्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रै: ।

एवंरूप: शक्य अहं नृलोके दृष्टुं त्वदन्येन कुरप्रवीर ।।४८।।

न,वेदयज्ञाध्ययनै:,न,दानै:,न,च,क्रियाभि:,न,तपोभि:,उग्रै: ।

एवंरूप:,शक्य:,अहम्,नृलोके,दृष्टुम्,त्वदन्येन,कुरप्रवीर ।।४८।।

हे अर्जुन ! मनुष्यलोकात ह्याप्रकारचे माझे विश्र्वरूप ह्याशिवाय वेद,यज्ञाने,अध्ययनाने, दानाने,क्रियांनी तसेच उग्र तप ह्याशिवाय दुसऱ्या प्रकारांनी पाहू शकत नाहीत,ज्याचे फक्त तुलाच दर्शन घडले.

मा ते व्यथा मा च विमूढभावो द्दव्ष्टा रूपं घोरमीद्दङ्ममेदम् ।

व्यपेतभी: प्रीतमना: पुनस्त्वंतदेव मे रूपमिदं प्रपश्य ।।४९।।

मा,ते,व्यथा,मा,च,विमूढभाव:, द्यव्ष्टा,रूपम्,घोरम्,इदृक,मम,इदम् ।

व्यपेतभी:,प्रीतमना:,पुन:,त्वम्,तत्,एव,मे,रूपम्,इदम्,प्रपश्य ।।४९।।

माझे अशा विक्राळ स्वरूप पाहून तु व्याकूळ होणे व मूढभाव तुझ्या ठाई जागृत होणे योग्य नाही,तु भयरहित व माझ्यावर प्रीती असलेल्या मनाने माझे ते विक्राळ स्वरूप व शंख चक्र गदा पद्मचतुर्भुज रुपास परत पहा.

संजय उवाच

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूय: ।

आश्र्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुन: सौम्यवपुर्महात्मा ।।५०।।

इति,अर्जुनम्,वासुदेव:,तथा,उक्त्वा,स्वकम्,रूपम्,दर्शयामास्,भूय: ।

आश्र्वासयामास,च,भीतम्,एनम्,भूत्वा,पुन:,सौम्यवपु:,महात्मा ।।५०।।

संजय म्हणाले -- वासुदेव भगवंताने अर्जुनास असे सांगून परत आपले चतुर्भुज स्वरूप दाखविले व महात्मा श्रीकृष्णाने सौम्यमुर्ती होऊन भयभीत अर्जुनास धीर दिला.

अर्जुन उवाच

दृव्ष्टेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।

इदानीमस्मि संवृत्त: सचेता: प्रकृतिं गत: ।।५१।।

दृव्ष्टवा,इदम्,मानुषम्,रूपम्,तव,सौम्यम्,जनार्दन ।

इदानीम्,अस्मि,संवृत्त:,सचेता:,प्रकृतिम्,गत: ।।५१।।

अर्जुन म्हणाले - हे जनार्दन ! आपल्या ह्या अतिशांत मनुष्यरुपास पाहून आता माझे चित्त स्थिर झाले आहे व मी आपल्या स्वाभाविक स्थितीत परत आलो आहे.

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।

देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिण: ।।५२।।

सुदुर्दर्शम्,इदम्,रूपम्,दृष्टवानसि,यत्,मम् ।

देवा:,अपि,अस्य,रूपस्य,नित्यम्,दर्शनकाङ्क्षिण: ।।५२।।

श्रीभगवान म्हणाले - माझे जे चतुर्भुज स्वरूप तु पाहिलेस हे सुदुर्दर्श आहे अर्थात ह्याचे दर्शन अतिशय दुर्लभ आहे.देवता सुध्दा नेहमी ह्या रूपाच्या दर्शनाची आकांक्षा करतात.

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।

शक्य एवंविधो द्रुष्टुं द्रुष्टवानसि मां यथा ।।५३।।

न,अहम्,वेदै,तपसा,न,दानेन,न,च,इज्यया ।

शक्य:,एवंविध:,दृष्टुम्,दृष्टवानसि,माम्,यथा ।।५३।।

ज्यातर्हेने तु मला पाहिले आहेस,ह्या प्रकारचे चतुर्भुज स्वरूप वेद,तप,दान,यज्ञ ह्यांनी पाहता येत नाही.

भकत्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।

ज्ञातुं द्द्ष्टुं च तत्वेन प्रवेष्टु च परन्तप ।।५४।।

भकत्या,तु,अनन्यया,शक्य:,अहम्,एवंविध:,अर्जुन ।

ज्ञातुम्,द्यष्टुम्,च,तत्वेन,प्रवेष्टुम्,च,परन्तप ।।५४।।

परंतु हे परंतप अर्जुन ! अनन्यभक्तीने ह्याप्रकारचे चतुर्भुजस्वरूप प्रत्यक्ष पाहणे,तत्वाने जाणणे,तसेच त्यात प्रवेश करणे अर्थात एकीभाव उत्पन्न व प्राप्त होणे ह्यामार्गाने शक्य आहे.

मत्कर्मकृन्मत्परमो मभ्दक्त: सग्ङवर्जित: ।

निर्वैर: सर्वभुतेषु य: स मामेति पाण्ङव ।।५५।।

मत्कर्मकृत्,मत्परम:,मभ्दक्त:,सग्ङवर्जित: ।

निर्वैर:,सर्वभुतेषु,य:,स:,माम्,एति,पाण्ङव ।।५५।।

हे अर्जुन ! जो पुरुष केवळ माझ्यासाठीच संपूर्ण कर्तव्यकर्म करणारा आहे,मत्परायण आहे,माझा भक्त आहे,आसक्तीरहित आहे व संपूर्ण भूतप्राण्यात वैरभाव रहित आहे,तो अनन्यभक्तीयुक्त पुरुष मलाच येऊन मिळतो.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्द्यायां योगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे विश्र्वरूपदर्शनयोगो नामैकादशोऽध्याय: ।।११।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय बारावा

## “भक्तियोग”

**भक्तीने जोडणे - शरीराचे मनास,मनाचे बुद्धीस,बुद्धीचे आत्म्यास व आत्म्याचे परमात्म्यास जोडणे,अहंकाराचा त्याग करून,वृत्तीरहित अवस्थेत जाणे जणु दगड होणे न्या नंतर परमात्म्यास पहाणे होय.**

अर्जुन उवाच

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।

ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमा: ।।१।।

(एवम्,सततयुक्ता:,ये,भक्ता:,त्वास्,पर्युपासते ।

ये,च,अपि.अक्षरम्,व्यक्तम्,तेषाम्,के,योगवित्तम: ।।१।।

अर्जुनाने सांगितले - जो अनन्यप्रेमी भक्तजन पूर्वोक्त प्रकाराने निरंतर तुमच्या भजन-ध्यानात निरंतर लागून तुमच्या सगुणस्वरूपास (सगुण परमेश्र्वरास) व दुसरे केवळ अविनाशी सच्चिदानन्दघन निराकार (अव्यक्त अक्षर) ब्रह्माचे अतिश्रेष्ठ भावाने भजन करतो,ह्या दोन्ही प्रकारच्या उपासकात अतिउत्तम योगवेत्ता कोण आहे?

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।

श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ।।२।।

मयि,आवेश्य,मनः,ये,माम्,नित्ययुक्ताः,उपासते ।

श्रध्दया,परया,उपेताः,ते,मे,युक्ततमाः,मताः ।।२।।

(आवेश - सर्वशक्ती)

श्रीभगवंत सांगु लागले - माझ्यात मनाला एकाग्र करून निरंतर माझ्या भजन-ध्यानात असणारे जे भक्तजन अतिश्रेष्ठ श्रध्देने युक्त होऊन माझ्या सगुणरुपाचे (परमेश्र्वरास) भजन करतात,ते मला योग्यांत अति उत्तम वाटतात.(सर्व आवेश माझ्याकडे लाऊन परमश्रध्देने माझी उपासना करतात)

ये त्वक्षरनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।

सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं धृवम् ।।३।।

ये,तु,अक्षरम्,निर्देश्यम्,व्यक्तम्,पर्युपासते ।

सर्वत्रगम्,अचिन्त्यम्,च कूटस्थम्,चलम्,धृवम् ।।३।।

सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुध्दयः ।

ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ।।४।।

सन्नियम्य,इन्द्रियग्रामम्,सर्वत्र,समबुध्दयः ।

ते,प्राप्नुवन्ति,माम,एव,सर्वभूतहिते,रताः ।।४।।

परंतु जे पुरुष इंद्रियांच्या समुदायास योग्य प्रकारे वश करून मन-बुध्दिच्या पुढे सर्वव्यापी अकथनियस्वरूप (अचिंत्य) व सदा एकरस राहाणारे,नित्य,अचल,निराकार,अविनासी,सच्चीदानन्दघन

ब्रह्माचे निरंतर एकीभावाने  ध्यान करून भजन करतात.ते संपूर्ण भूतांच्या हितात रत व सगळ्यात समान भाव असणारे योगी मलाच प्राप्त होतात.

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।

अव्यक्ता हि गतिर्दु:खं देहवद्भिरवाप्यते ।।५।।

क्लेश:,अधिकतर:,तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।

अव्यक्ता,हि,गतिदु:खम्,देहवद्भि:,अवाप्यते ।।५।।

योगमार्ग हा अतिशय गतीने प्रगती करणारा आहे परंतु जेव्हा जीवात्म्याची (अव्यक्ताकडे होणारी उत्क्रांती ) गति वाढते त्याच वेगाने शरीरात (गुणात) बदल होत नाहित ज्याने क्लेश होतात,भक्तिमार्गात जीवाची प्रगती व शारीरिक बदल ह्यांची गति कमी असते.

त्या सच्चिदानन्दघन निराकार ब्रह्मात आसक्त चित्त असलेल्या पुरुषांच्या साधनात परिश्रम विशेष आहे,कारण देहाभिमान असणाऱ्यात अव्यक्त विषयक गति दु:खपूर्वक प्राप्त होते.

ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य मत्परा: ।

अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।।६।।

ये,तु,सर्वाणि,कर्माणि,मयि,सन्यस्य,मत्परा: ।

अनन्येन,एव,योगेन,माम्,ध्यायन्त:,उपासते ।।६।।

परंतु माझ्याशी एकनिष्ठ असणारे भक्तजन संपूर्ण कर्म मलाच अर्पण करून माझ्या सगुणरूप-परमेश्वराची अनन्य भक्ति निरंतर चिंतन करून करतात व त्याचे भजन करतात.

तेषामहं समुध्दर्ता मृत्यु संसारसागरात् ।

भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।।७।।

तेषाम्,अहम्,समुध्दर्ता,मृत्युसंसारसागरात् ।

भवामि,नचिरात्,पार्थ,आवेशितचेतसाम् ।।७।।

हे अर्जुन ! त्या माझ्यात चित्त लावणाऱ्या प्रेमी भक्तांचा मी शिघ्र मृत्युरूप संसारसागरातून उध्दार करणारा असतो.

मय्येव मन आधत्स्व मयि बुध्दि निवेशय ।

निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्व न संशय: ।।८।।

मयि,ऐव,मन,आधत्स्व,मयि,बुध्दिम्,निवेशय ।

निवसिष्यसि,मयि,एव,अत:,ऊर्ध्वम्,न,संशय: ।।८।।

(धनंजय - आपल्या इंद्रियाचा संयम करण्यास सक्षम श्रेष्ठ साधक)

माझ्यात मन (मनाच्या सर्व धारणा) लाव व माझ्यातच बुध्दि लाव,त्यानंतर तू माझ्यातच निवास करशील,ह्यात जराही संशय नाही.

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।

अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय ।।९।।

अथ,चित्तम्,समाधातुम्,न,शक्नोषि,मयि,स्थिरम् ।

अभ्यासयोगेन,तत:,माम्,ईच्छा,आप्तुम्,धनंजय ।।९।।

(अनासक्त कर्म - योगमार्गातील अभ्यास ज्याने कर्म करताना नंतर कर्म विनासायास आपसूक घडते.)

जर तू माझ्यात स्थिर-अचल मन ठेऊ (स्थापू) शकण्यास असमर्थ असशील तर हे अर्जुना ! अभ्यासरूप योगाव्दारे मला प्राप्त करण्याची इच्छा कर.

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।

मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिध्दिमवाप्स्यसि ।।१०।।

अभ्यासे,,अपि,असमर्थ:,असि,मत्कर्मपरम:,भव ।

मदर्थम्,अपि,कर्माणि,कुर्वन्,सिध्दिम्,अवाप्स्यसि ।।१०।।

परमेश्वराचे नाम व गुण ह्याचे श्रवण,कीर्तन,मनन तसेच श्र्वास व्दारा जप व भगवत प्राप्ती विषयक शास्त्रांचे पठण-पाठन इत्यादी चेष्टा भगवतप्राप्तीसाठी वारंवार करणे हाच "***अभ्यास*** " आहे.
स्वार्थाचा त्याग करून परमेश्र्वर हाच परमआश्रय व परमगती आहे असे समजून निष्काम भावाने

पतिव्रता स्त्रीप्रमाणे मन,वाणी व शरीरव्दारा परमेश्वरासाठी यज्ञ दान व तपादि संपूर्ण कर्तव्य कर्म करण्यास "***भगवदर्थ कर्म करण्यासाठी परायण होणे*** " होय.

जर तू ह्या अभ्यासात असमर्थ असशील तर केवळ माझ्यासाठी कर्म करून (मदपरायण) माझाच हो,अश्याप्रकारे माझ्या निमित्त कार्य करता करता माझ्या प्राप्तीसाठी लागणाऱ्या सिध्दी प्राप्त करशील.

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तु मद्योगमाश्रित: ।

सर्वकर्मफलत्यागं तत: कुरु यतात्मवान् ।।११।।

अथ,एतत्,अपि,अशक्त:,असि,कतुम्,मद्योगम्,आश्रित: ।

सर्वकर्मफलत्यागम्,तत:,कुरु,यतात्मवान् ।।११।।

साधन करण्यास सुध्दा तू असमर्थ असशील तर मन-बुध्दि आदिवर विजय प्राप्त करणारा होऊन सर्व कर्म फळांचा त्याग कर.ज्याने तु आत्मरूप अवस्था प्राप्त करशील.

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाध्दयानं विशिष्यते ।

ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ।।१२।।

श्रेय:,हि,ज्ञानम्,अभ्यासात्,ज्ञानात्,ध्यानम्,विशिष्यते ।

ध्यानात्,कर्मफलत्याग:,त्यागात्,शान्ति:,अनन्तरम् ।।१२।।

केवळ भगवदर्थ कर्म करणाऱ्या पुरुषाचे भगवंतात प्रेम व श्रध्दा तसेच भगवंताचे चिंतन असतेच,ह्यासाठी कर्मफळाचा त्याग " ***श्रेष्ठ*** " असे म्हंटले आहे.

मर्म न जाणताच केलेल्या अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे,ज्ञानापेक्षा (माझ्या) परमेश्वराच्या स्वरूपाचे ध्यान श्रेष्ठ आहे व ध्यानापेक्षा सर्व कर्माच्या फळांचा त्याग श्रेष्ठ आहे,कारण त्यागाने तात्काळच परमशांती प्राप्त होते.

अव्देष्टा सर्वभूतानां मैत्र: करुण एव च ।

निर्ममो निरहक्ङार: समदु:खसुख: क्षमी ।।१३।।

अव्देष्टा,सर्वभूतानाम्,मैत्र:,करुण:,एव,च ।

निर्मम:,निरहंकार:,समदु:खसुख:,क्षमी ।।१३।।

संन्तुष्ट: सततं योगी यतात्मा दृढनिश्चय: ।

मय्यर्पितमनोबुध्दिर्यो मभ्दक्त: स मे प्रिय: ।।१४।।

संन्तुष्ट:,सततम्,योगी,यतात्मा,दृढनिश्चय: ।

मयि,अर्पितमनोबुध्दि:,य:,मद्,भक्त:,स:,मे,प्रिय: ।।१४।।

जो पुरुष सर्व भूतात व्देष भावरहित,स्वार्थरहित,सर्वांचा प्रेमी व हेतुरहित दयाळु आहे तसेच ममत्व रहित अहंकाररहित,सुख-दु:खाच्या प्राप्तीत सम व क्षमावान आहे अर्थात अपराध करणाऱ्यास अभय देणारा तसेच जो योगी निरंतर संतुष्ट आहे व माझ्यात दृढ निश्चय असणारा आहे,तो मला अर्पण केलेले मन व बुध्दी असणारा भक्त मला प्रिय आहे.

यस्मान्नोव्दिजते लोको लोकान्नोव्दिजते च य: ।

हर्षामर्षभयोव्देगैर्मुक्तो य: स च मे प्रिय: ।।१५।।

यस्मात्,न,उव्दिजते,लोक:,लोकात्,उव्दिजते,च,य: ।

हर्षामर्षभयोव्देगै:,मुक्त:,य:,स:,च,मे,प्रिय: ।।१५।।

ज्याच्यामुळे कोणत्याही जीवास उव्देग होत नाही व स्वत:लाज्यास कोणत्याही जीवामुळे उव्देग होत नाही,असा हर्ष,अमर्ष (दुसऱ्याची उन्नती पाहून संताप होणे - अमर्ष),भय व उव्देगरहित भक्त मला प्रिय आहे.

अनपेक्ष: शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथ: ।

सर्वारम्भपरित्यागी यो मभ्दक्त: स मे प्रिय: ।।१६।।

अनपेक्ष:,शुचि,दक्ष,उदासीन:,गतव्यथ: ।

सर्वारम्भपरित्यागी,य:,मद्भक्त:,स:,मे,प्रिय: ।।१६।।

जो पुरुष आकांक्षारहित,अंर्तबाहय शुध्द,चतुर,पक्षपात रहित व दु:खापासून मुक्त आहे,तो सर्व आरंभाचा त्यागी (त्याग करणारा) माझा भक्त मला प्रिय आहे.

यो न हृष्यति न व्देष्टि न शोचति न काङ्क्षति ।

शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्य: स मे प्रिय: ।।१७।।

य:,न,हृष्यति,न,व्देष्टि,न,शोचति,न,काड़्क्षति ।

शुभाशुभपरित्यागी,भक्तिमान्,य:,स:,मे प्रिय: ।।१७।।

जो न कधी हर्षित होतो,न व्देष करतो,न शोक करतो,न कामना करतो,तसेच जो शुभ अशुभ कर्मांचा त्यागी आहे,असा भक्तीयुक्त पुरुष मला प्रिय आहे.

सम: शत्रो च मित्रे च तथा मानापमानयो: ।

शीतष्णसुखदु:खेषु सम: सग्ड़विवर्जित: ।।१८।।

सम:,शत्रौ,च,मित्रे,च,तथा,मानापमानयो: ।

शीतोष्णसुखदु:खेषु,सम:,सग्ड़विवर्जित: ।।१८।।

जो शत्रू व मित्रात व मान-अपमानात सम आहे तसेच सर्दी,गर्मी व सुख-दु:खादि व्दंव्दात सम आहे व आसक्ती रहित आहे. (ह्याचा अभ्यास करून देहबुध्दीच्या वर राहणारा)

तुल्यनिन्दास्तुतिर्मैनी संतुष्टो येन केनचित् ।

अनिकेत: स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नर: ।।१९।।

तुल्यनिन्दास्तुति:,मौनी,संतुष्ट:,येन,केनचित् ।

अनिकेत:,स्थिरमति:,भक्तिमान्,प्रिय:,नर: ।।१९।।

जो निंदा स्तुतीस समान समजणारा,मननशील व ज्याप्रकाराने शरीराचा निर्वाह होईल त्यात संतुष्ट आहे व राहण्याच्या स्थानात ममता व आसक्ती रहित आहे,तो स्थिरबुध्दि भक्तिमान पुरुष मला प्रिय आहे.

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।

श्रध्यधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रिया: ।।२०।।

ये,तु,धर्म्यामृतम्,इदम्,यथा,उक्तम्,पर्युपासते ।

श्रध्यधाना:,मत्परमा:,भक्ता:,ते,अतीव,मे,प्रिया: ।।२०।।

वेद,शास्त्र,महात्मा व गुरुजन तथा परमेश्वर ह्यांच्या वचनात जणू स्वत:च-प्रत्यक्ष असल्याप्रमाणे विश्वास असणे ह्यास " ***श्रध्दा*** " असे म्हणतात.

परंतु जो श्रध्दायुक्त पुरुष मत्परायण होऊन अश्या-वर निर्देशित केलेल्या धर्ममय अमृतास निश्काम प्रेमभावाने सेवन करतो,तो भक्त मला अतिशय प्रिय आहे.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम व्दादशोऽध्याय: ।।१२।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय तेरावा

## " क्षेत्रक्षेत्रज्ञयोग "

**साधक पूर्णावस्थेत पोहोचला तरी अंतःकाळ पर्यन्त त्याचे शरीर शिल्लक राहते जे क्षेत्र आहे,ज्यात जीवात्मा संसारात सापडतो,परमेश्वराशी भक्त झाल्यावर पूर्णत्व येऊन हे समाप्त होते.**

श्रीभगवान उवाच

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।

एतद्यो वेत्ति तं प्राहु: क्षेत्रज्ञ इति तव्दिद: ।।१।।

(इदम्,शरीरम्,कौन्तेय,क्षेत्रम्,इति,अभिधीयते, ।

एतत्,य:,वेत्ति,तम्,प्राहु:,क्षेत्रज्ञ:,इति,तव्दिद: ।।१।।)

कर्म संस्काररूप बीजाचे फळ योग्य वेळी प्रकट होते म्हणून ह्यास क्षेत्र असे म्हणतात.जसे शेतात जसे बी उगवावे तसे अनुरूप फळ मिळते.

श्रीभगवान म्हणाले - हे अर्जुन ! हे शरीर "क्षेत्र" ह्या नावाने ओळखले जाते. ह्यास जो जाणतो त्यास "क्षेत्रज्ञ" ह्या तत्वाने ज्ञानीजन जाणतात.

क्षेत्रज्ञं चापि मां विध्दि सर्वक्षेत्रेषु भारत ।

क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ।।२।।

(क्षेत्रज्ञम्,च,अपि,माम्, विध्दि,सर्वक्षेत्रेषु,भारत ।

क्षेत्रक्षेत्रज्ञयो:,ज्ञानम्,यत्,तत्,ज्ञानम्,मतम्, मम ।।२।।)

प्रकृति व पुरुष ह्याचा मिलन स्तर प्रकृतीची परावस्था आहे,जेथे जीव धारणा होते,प्रकृति आपल्या गुणकर्मानुसार चालते,ज्यात पुरुषाचे सावधान अस्तित्व आहे,ज्याने प्रकृति आपले कार्य-क्रमण करू शकते,योगाच्या समाधी अवस्थेत हे कार्य थांबते ते कार्य शरीरभावात आल्यावर परत सुरु होते.

हे अर्जुन ! तु सर्व क्षेत्रात "क्षेत्रज्ञ" अर्थात जीवात्मा असे समजून घे,तसेच क्षेत्र-क्षेत्रज्ञ अर्थात विकारा-सहित प्रकृति व पुरुष ह्यास तत्वत: जाणणे आहे.तेच ज्ञान आहे,असे माझे मत आहे.

तत्क्षेत्रं यच्च याद्रृक्च यद्विकारि यतश्र्च यत् ।

स च यो यत्प्रभावश्र्च तत्समासेन मे श्रृणु ।।३।।

तत्,क्षेत्रम्,यत्,च,याद्रृक,च,तत्,समासेन,मे, ।

स,च,य:,यत्प्रभाव:,च,तत,समासेन,मे,श्रृणु ।।३।।

ते क्षेत्र जे व जसे आहे तसेच ज्या विकारांनी युक्त आहे व ज्या कारणाने झाले आहे.तसेच तो "क्षेत्रज्ञ" आहे व ज्या प्रभावाने युक्त आहे.ते सर्व तु संक्षिप्तपणे माझ्याकडून ऐक.

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधै: पृथक ।

ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमभ्दिर्विनिश्र्चितै: ।।४।।

ऋषिभि:,बहुधा,गीतम्,छन्दोभि:,विविधै:,पृथक् ।

ब्रह्मसूत्रपदै:,च,एव,हेतुमद्भि:,विनिश्चितै: ।।४।।

हे "क्षेत्र"-क्षेत्रज्ञ तत्त्व ऋषींनी अनेक वेळा बऱ्याच प्रकारांनी सांगितले आहे व विविध वेदमंत्रांव्दारा विभागपूर्वक सांगितले आहे.बऱ्याच विचारांनी निश्र्चय केलेल्या युक्तीयुक्त ब्रह्मसूत्रांच्या पदांनी सुध्दा हे सांगितले आहे.

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।

इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचरा:।।५।।

महाभूतानि,अहंकार:,बुध्दि:,अव्यक्तम्,एव,च ।

इन्द्रियाणि,दश,एकम्,च,पञ्च,च,इन्द्रियगोचरा:।।५।।

पाँच महाभूत,अहंकार,बुध्दि व मूळप्रकृति तसेच दहा इंद्रिये,एक मन व पाँच इंद्रियांचे विषय अर्थात शब्द,स्पर्श,रूप,रस व गंध

इच्छा व्देष: सुखं दु:खं संघ्डातश्चेतना धृति:।

एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ।।६।।

इच्छा,व्देष:,सुखम्,दु:खम्,संघात:,चेतना,धृति: ।

एतत,क्षेत्रम्,समासेन,सविकारम्,उदाहृतम् ।।६।।)

संघात: चेतना धृती: । -- समघात अर्थात सापेक्ष अवस्थेत सापेक्ष शक्तीचा संघ होऊन त्या गुणांनी संघामुळे नवी चेतना उत्पन्न होणे,एकापेक्षा जास्त समघात प्रकृतीपासून वेगळा गुण असणारी चेतना, इच्छा,व्देष,सुख,दु:ख,स्थूल – हा जड शरीराचा व्यापार (चवथा देह) इतर तीन देहात असतोच असे नाही.

तथा इच्छा,व्देष,सुख,दु:ख,स्थूल देहाचा पिंड चेतना व धृति (धारणा) ह्या विकारांसहित हे क्षेत्र संक्षिप्त स्वरुपात सांगितले आहे.

अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ।

आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रह: ।।७।।

(अमानित्वम्, अदम्भित्वम्,अहिंसा,क्षान्ति:,आर्जवम् ।

आचार्योपासनम्,शौचम्,स्थैर्यम,आत्मविनिग्रह: ।।७।।)

(सत्यतापूर्वक शुध्द व्यवहार द्रव्याची व त्याच्या अन्नाने आहाराची तथा यथायोग्य व्यवहाराने आचरणाची व जल मृतकादीने शरीराची शुध्दी ज्यास (बाह्य) बाहेरची शुध्दी म्हणतात,तसेच राग व्देष व कपट आदि विकारांचा नाश होऊन अंतःकरण स्वच्छ होणे हि आतील शुध्दी सांगितली आहे.)

श्रेष्ठतेच्या अभिमानाचा अभाव,दंभाचा अभाव,कोणत्याही प्राण्यास कोणत्याही तऱ्हेने न सतावणे,क्षमा-भाव,मन-वाणी आदिची सरळता,श्रध्दा-भक्तिसहित गुरूची सेवा बाहेर-आत शुध्दी,अंतःकरणाची स्थिरता व मन-इंद्रियासहित शरीराचा निग्रह.

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहक्ङार एव च ।

जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम ।।८।।

इंद्रियार्थेषु,वैराग्यम्,अनहकार:,एव,च ।

जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम ।।८।।)

ह्या तसेच परलोकातील संपूर्ण भोगाच्या आसक्तीचा अभाव व अहंकाराचा अभाव,जन्म,मृत्यु,जरा, व रोग आदि दु:ख व दोष ह्यांचा सतत विचार करणे.

आसक्तिरनभिष्वङ्ग: पुत्रदारगृहादिषु ।

नित्यं च समचित्तंत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ।।९।।

आसक्ति:अनभिष्वङ्ग:,पुत्रदारगृहादिषु ।

नित्यम्,च,समचित्तंत्व्,इष्टानिष्टोपपत्तिषु ।।९।।)

पुत्र,स्त्री,घर व धन ह्यात आसक्तीचा अभाव,ममत्व नसणे,तसेच प्रिय वा अप्रिय गोष्टींच्या प्राप्तीत चित्ताची समानता.

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।

विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ।।१०।।

मयि,च,अनन्ययोगेन,भक्ति:,अव्याभिचारिणी ।

विविक्तदेशसेवित्वम्,अरति:,जनसंसदि ।।१०।।

माझ्यात (परमेश्वरात) अनन्य योगाने अव्याभिचारिणी भक्ति (सर्व शक्तिमान परमेश्वरास आपला स्वामी मानून स्वार्थ व अभिमानाचा त्याग करून,श्रध्दा भावाने,परमप्रेमाने ईश्वराचे चिंतन– हिच अव्याभीचारिणी भक्ति) तसेच एकान्त व शुध्द देशात रहाण्याचा स्वभाव,विषयासक्त मनुष्यांच्या समुदायात प्रेम नसणे.

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम ।

एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ।।११।।

अध्यात्मज्ञाननित्यत्वम्,तत्वज्ञानार्थदर्शनम ।

एतत्,ज्ञानम्,इति,प्रोक्तम्,अज्ञानम्,यत्,अत:,अन्यथा ।।११।।

ज्या ज्ञानाने आत्मवस्तूचे व अनात्मवस्तूचे तत्वत: ज्ञान होते त्यास “अध्यात्मज्ञान” म्हणतात.व तत्वज्ञान प्राप्तीच्या हेतू असलेल्या इतरास “ज्ञान”म्हंटले आहे.वरील सांगितलेल्या ज्ञानाच्या विपरीत जो मान,दंभ,हिंसा आदि आहेत तो अज्ञानाच्या वृध्दीचा हेतू असल्याने “अज्ञान” म्हणून म्हंटले आहे.

अध्यात्मज्ञानात नित्यस्थिती व तत्वज्ञानाच्या अर्थरूप परमेश्र्वरास पहाणे,हे सर्व ज्ञान आहे व ह्यापेक्षा विपरीत आहे ते सर्व अज्ञान आहे.असे समजले जाते.

ज्ञेयं यत्तत्प्रवक्षामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।

अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नादुच्यते ।।१२।।

ज्ञेयम्,यत्,तत,प्रवक्षामि,यत्,ज्ञात्वा,अमृतम्,अनुते ।

अनादिमत्,परम्,ब्रह्म,न,सत्,तत्,न,असत्,उच्यते ।।१२।।

जे जाणण्यास योग्य आहे व जे जाणल्याने मनुष्य परमानंद (अमृततत्व) प्राप्त करतो,ते विचारपूर्वक योग्यपणे सांगतो,ते अनादि परब्रह्म ना सत्य ना असत्य समजले जाते.

सर्वतःपाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमूखम् ।

सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ।।१३।।

(सर्वतःपाणिपादम्,तत्,सर्वतोऽक्षिशिरोमूखम् ।

सर्वतः श्रुतिमत्,लोके,सर्वम्,मावृत्य,तिष्ठति ।।१३।।)

जो सगळीकडे हातपाय असलेला,सगळीकडे डोळे,डोके व मुख असलेला तसेच सगळीकडे कान असलेला आहे, कारण तो संसारात सगळ्यास व्यापून स्थित आहे.

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।

असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ।।१४।।

सर्वेन्द्रियगुणाभासम्,सर्वेन्द्रियविवर्जितम् ।

असक्तम्,सर्वभृत्,च,एव,निर्गुणम्,गुणभोकतृ,च ।।१४।।

तो संपूर्ण इंद्रियांच्या विषयाला जाणणारा परंतु वास्तविक सर्व इंद्रियरहित आहे तसेच आसक्तीरहित असून सर्वांचे धारण-पोषण करणारा आहे व निर्गुण असून सुध्दा गुणांना भोगणारा आहे.

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेत्र च ।

सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ।।१५।।

(बहि:,अन्त:,च,भूतानाम्,चरम्,चरम्,एव,च ।

सूक्ष्मत्वात्,तत्,अविज्ञेयम्,दूरस्थं चान्तिके च तत् ।।१५।।)

आकाश सर्व वायु,अग्नी,जल व पृथ्वी हयांना व्यापून स्थित आहे,तसेच परमात्मा सुध्दा सर्वांचा कारण असून संपूर्ण चराचर जगतास व्याप्त असून स्थित आहे.जसे सूर्यकिरणात व्याप्त जल सुक्ष्म असल्याने सर्वसाधारणास समजत नाहीत तसेच परमात्मा सूक्ष्म असल्याने समजत नाही.तो परमात्मा सर्वत्र परिपूर्ण व सर्वांचा आत्मा असल्याने अत्यंत समीप आहे.श्रध्दारहित,अज्ञानी पुरुषांसाठी न जाणता येण्यासारखा असल्याने बराच दूर आहे.

तो चराचर सर्व भूतात बाहेर-आत परिपूर्ण आहे व चर-अचर सुध्दा तोच आहे.तसेच सूक्ष्म असल्याने अविज्ञेय आहे.तसेच अतिशय जवळ व दूर सुध्दा स्थित आहे.

अविभक्तं च भूतेषू विभक्तमिव च स्थितम् ।

भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ।।१६।।

अविभक्तम्,च,भूतेषु,विभक्तम्,इव,च,स्थितम् ।

भूतभर्तृ,च,तत्,ज्ञेयम्,ग्रसिष्णु,प्रभविष्णु,च ।।१६।।

जसे महाकाश विभागलेले नसून सुध्दा घटात वेगवेगळे आहेसे वाटते,तसाच परमात्मा सर्व भूतात एकरूप स्थित असून सुध्दा वेगवेगळा आहे असा भास होतो. (ते परमतत्वच जीवांची उत्पत्ती,स्थिती व लय हयास कारण आहे,)

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमस: परमुच्यते ।

ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठीतम् ।।१७।।

ज्योतिषाम्,अपि,तत,ज्योती:,तमस:,परम्,उच्यते ।

ज्ञानम्,ज्ञेयम्,ज्ञानगम्यम्,हृदि,सर्वस्य,विष्ठीतम् ।।१७।।

ते परब्रह्म ज्योतीची ज्योती असून मायेच्यापेक्षा अत्यंत वेगळी अशी विशेष आहे.तो परमात्मा बोधस्वरूप जाणण्यास योग्य तसेच तत्वज्ञानाने प्राप्त करण्यायोग्य आहे व सगळ्यांच्या हृदयात विशेषरूपाने स्थित आहे.

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेय चोक्तं समासत: ।

मभ्दक्त एतव्दिज्ञाय मभ्दवायोपद्यपयते ।।१८।।

इति,क्षेत्रम्,तथा,ज्ञानम्,ज्ञेयम्,च,उक्तम्,समासत: ।

मद्भक्त:,एतत्,विज्ञाय,मद्भावाय,उपपद्यते ।।१८।।

अश्यारितीने क्षेत्र तसेच ज्ञान व जाणण्यास योग्य (ज्ञेय) असे परमात्मा स्वरूप संक्षिप्तपणे सांगितले,माझा भक्त ह्यास तत्वाने जाणून माझ्या स्वरूपास प्राप्त होतो.

प्रकृति पुरुषं चैव विध्दयनादी उभावपि ।

विकारांश्च गुणांश्चैव विध्दि प्रकृतिसम्भवान् ।।१९।।

प्रकृतिम्,पुरुषंम्,च,एव,विध्दि,अनादी,उभ्,अपि ।

विकारान्,च,गुणान्,च,एव,विध्दि,प्रकृतिसंभवान् ।।१९।।

प्रकृती व पुरुष ह्या दोघांना हि तु अनादि समज व रागव्देषांदि विकारांना तसेच त्रिगुणात्मक संपूर्ण पदार्थांना सुध्दा प्रकृतीतून उत्पन्न असे जाण.

कार्यकरणकर्तृत्वे हेतु: प्रकृतिरुच्यते ।

पुरुष: सुखदु:खानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ।।२०।।

कार्यकरणकर्तृत्वे,हेतु:,प्रकृति,उच्यते ।

पुरुष:,सुखदु:खानाम्,भोक्तृत्वे,हेतु:,उच्यते ।।२०।।

आकाश,वायु,अग्नी,जल,व पृथ्वी तसेच शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध ह्यास “कार्य” म्हणतात,व बुध्दी,अहंकार व मन तसेच श्रोत्र,त्वचा,रसना,नेत्र व घ्राण अर्थात वाक्,हस्त,पाद,उपस्थ व गुद ह्या तेरांस (१३) नावांस “करण” असे म्हणतात.

कार्य व करण (कारण) ह्यास उत्पन्न करण्याचा हेतू प्रकृती आहे असे समज व जीवात्मा सुख दु:खाच्या भोक्तेपणाने अर्थात भोगाचा हेतू असे समजले जाते.(जीवात्मा शरीरात असेपर्यन्त व श्वास-प्रश्वास असे पर्यन्त प्रकृति कार्यरत राहते,समाधीत हि स्थिती नाहीशी होते.)

पुरुष: प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान् ।

कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ।।२१।।

पुरुष:,प्रकृतिस्थ:,हि,भुङ्क्ते,प्रकृतिजान्,गुणान् ।

कारणम्,गुणसङ्ग:,अस्य,सदसद्योनिजन्मसु ।।२१।।

सत्वगुणांमुळे देवयोनीत तसेच रजोगुणाच्या संगतीने मनुष्ययोनी व तमोगुणामुळे पशु,पक्षी ह्या सारख्या नीच योनीत जन्म होतो.(देवयान मार्ग - सर्व विश्वाचे स्पंदन,पितृयान मार्ग - उच्चावस्थेतून परत देहस्थिती)

प्रकृतीत (परमेश्वराची त्रिगुणात्मक माया) स्थित पुरुष प्रकृतीतून उत्पन्न त्रिगुणात्मक पदार्थांना भोगणारा आहे व ह्या गुणांचा संगच जीवात्म्यास चांगल्या वाईट योनीत जन्म घेण्यास कारण आहे.

उपद्रष्टानुन्मता च भर्ता भोक्ता महेश्वर: ।

परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मित्पुरुष: पर: ।।२२।।

उपद्रष्टा,अनुन्मता,च,भर्ता,भोक्ता,महेश्वर: ।

परमात्मा,ईति,च,अपि,उक्त,देहे,अस्मिन,पुरुष:,पर: ।।२२।।

ह्या देहात स्थित हा आत्मा वास्तविक परमात्माच आहे ! हा सर्व साक्षी होण्याकारणाने उपद्रष्टा व यथार्थ सम्मति देणारा असल्यामुळे अनुमन्ता,सर्वांचे धारण-पोषण करणारा असल्याने भर्ता,जीवरूपाने भोक्ता,ब्रह्मा व इतर ह्या सर्वांचा स्वामी असल्याने महेश्वर व शुध्द सच्चिदानन्दघन असल्याने परमात्मा-असे सांगितले आहे.

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृति च गुणै: सह ।

सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ।।२३।।

य,एवम्,वेत्ति,पुरुषम्,प्रकृतिम्,च,गुणै:,सह ।

सर्वथा,वर्तमान:,अपि,न,स:,भूय:,अभिजायते ।।२३।।

दृश्यमात्र जगत हे मायेचे कार्य असल्याने क्षणभंगुर,नाशवान,जड व अनित्य आहे,तसेच जीवात्मा,नित्य,चेतन,निर्विकार व अविनाशी आहे तसेच शुध्द,बोधस्वरूप,सच्चिदानन्दघन परमात्म्याचाच सनातन अंश असल्याने,ह्याप्रकारे समजून मायिक पदार्थांच्या संगाचा सर्वथा त्याग करून परमपुरुष परमात्म्यात एकीभावाने नित्य स्थित रहाण्यासच त्यास "***तत्वाने***" जाणणे आहे.

अश्यातर्हेने पुरुष व गुणांसाहित प्रकृतिस जो मनुष्य तत्त्वतः जाणतो तो सर्वप्रकारची कर्तव्य कर्म करत असून सुध्दा परत जन्मास येत नाही.

ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।

अन्ये सांङ्ख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ।।२४।।

ध्यानेन्,आत्मनि,पश्यन्ति,केचित्,आत्मानम्,आत्मना ।

अन्ये,सांङ्ख्येन,योगेन,कर्मयोगेन,च,आपरे ।।२४।।

त्या परमात्म्यास कित्येक साधक शुध्द झालेल्या सूक्ष्म बुध्दीने ध्यान व्दांरा हृदयात पाहतात,अन्य कित्येक ज्ञानयोगाने व दुसरे कित्येक कर्मयोगाने पाहतात,अर्थात प्राप्त करतात.

अन्ये त्वेवमजानन्त: श्रृत्वान्येभ्य उपासते ।

तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणा: ।।२५।।

अन्ये,तु,एवम्,अजानन्त:,श्रृत्वा,अन्येभ्य,उपासते ।

ते,अपि,च,अतितरन्ति,एव,मृत्युम्,श्रुतिपरायणा: ।।२५।।

परंतु जे दुसरे मंदबुध्दी पुरुष आहेत ते ह्याप्रकाराने न जाणता दुसऱ्यांकडून अर्थात तत्वाने जाणणाऱ्या पुरुषांकडून ऐकून त्यानुसार उपासना करतात असे श्रवणपरायण पुरुष सुध्दा मृत्युरूप संसार सागर नि:संदेह तरून जातात.

यावत्सञ्जायते किंञ्चित्सत्त्वमं स्थावरजङ्गमम् ।

क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तव्दिध्दि भरतर्षभ ।।२६।।

(यावत्,संजायते,किंचित,सत्वम्,स्थावरजङ्गमम् ।

क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्,तत्,विध्दि,भरतर्षभ ।।२६।।)

हे अर्जुन ! अश्यारितीने स्थावर - जंगम प्राणी उत्पन्न होतात,त्या सर्वाना तु क्षेत्र व क्षेत्राच्या संयोगाने उत्पन्न असे जाण.

समं सर्वेषू भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।

विनश्यत्स्वविनश्यन्तं य: पश्यति स पश्यति ।।२७।।

समम्,सर्वेषू,भूतेषु,तिष्ठन्तम्,परमेश्वरम् ।

विनश्यत्सु,अविनश्यन्तम्,य:,पश्यति,स:,पश्यति ।।२७।।

जे पुरुष नष्ट होताना,सर्व चराचर भूतात परमेश्र्वरास नाशरहित व समभावाने स्थित असे पाहतात,तोच यथार्थपणे पाहतो.

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।

न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ।।२८।।

समम्,पश्यम,हि,सर्वत्र,समवस्थितम्,ईश्वरम्,न।

हिनस्ति,आत्मन:,आत्मानम्,तत:,याति,पराम्,गतिम् ।।२८।।

कारण जे पुरुष सर्वांत समभावाने स्थित परमेश्र्वरास समान पाहताना आपल्या व्दांरा आपल्यास नष्ट करत नाहीत.त्याने तो परमगतीस प्राप्त होतो.

प्रकृत्येव च कर्माणि क्रियमणानि सर्वश: ।

य: पश्चति तथात्मानकर्तारं स पश्चति ।।२९।।

(प्रकृत्या,एव,च,कर्माणि,क्रियमणानि,सर्वश: ।

य:,पश्चति,तथा,आत्मानम्,अकर्तारम्,स:,पश्यति ।।२९।।)

तसेच जे पुरुष संपूर्ण कर्मांना सर्व प्रकाराने प्रकृतिव्दांराच केल्याचे पाहतात व आत्म्यास अकर्ता असे पाहतात,तेच यथार्थपणे पाहतात.

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।

तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ।।३०।।

यदा,भूतपृथग्भावमेकम्,एकस्थम्,अनुपश्यति ।

तत्,एव,च,विस्तारम्,ब्रह्म,संपद्यते तदा ।।३०।।

ज्या क्षणी हे पुरुष भुतांच्या विविध भावांना एका परमात्म्यात स्थित पाहतात,तसेच त्या परमात्म्यापासूनच भूतांचा विस्तार झाला असल्याचे पाहतात,त्याच क्षणी ते सच्चिदानन्दघन ब्रह्मास प्राप्त होतात.

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमायमव्यय: ।

शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ।।३१।।

अनादित्वात्,निर्गुणत्वात्,परमात्मा,अयम,अव्यय: ।

शरीरस्थ:,अपि,कौन्तेय,न,करोति,न,लिप्यते ।।३१।।

हे अर्जुन ! अनादि होण्यामुळे व निर्गुण होण्यामुळे हा अविनाशी परमात्मा शरीरात स्थित होऊन सुध्दा वास्तविक ना काही करतो ना लिप्त होतो.

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।

सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ।।३२।।

यथा,सर्वगतम्,सौक्ष्म्यात्,आकाशम्,न,उपलिप्यते ।

सर्वत्र,अवस्थित:,देहे,तथा,आत्मा,न,उपलिप्यते ।।३२।।

ज्याप्रकारे सर्वत्र व्याप्त आकाश सूक्ष्म होण्यामुळे लिप्त होत नाही,त्याचप्रमाणे देहात सर्वत्र स्थित आत्मा निर्गुण असल्यामुळे देहाच्या गुणांनी लिप्त होत नाही.

यथा प्रकाशयत्येक: कृत्स्नं लोकमिमं रवि: ।

क्षेत्र क्षेत्रो तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ।।३३।।

(यथा,प्रकाशयति,एक:,कृत्स्नम्,लोकम्,ईमम्,रवि: ।

क्षेत्रम्,क्षेत्रो,तथा,कृत्स्नम्,लोकम्,प्रकाशयति,भारत ।।३३।।)

हे अर्जुन ! ज्याप्रकारे एकच सूर्य सर्व ब्रह्मांडास प्रकाशित करतो,त्याचप्रकारे एकच आत्मा संपूर्ण क्षेत्रास प्रकाशित करतो.

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।

भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ।।३४।।

(क्षेत्रक्षेत्रयो:,एवम्,अन्तरम्,ज्ञानचक्षुषा ।

भूतप्रकृतिमोक्षम्,च,ये,विदु:,यान्ति,ते,परम् ।।३४।।)

अश्यारितीने क्षेत्र व क्षेत्रज्ञ भेदास तथा कार्यासहित प्रकृतिपासून मुक्त होण्यामुळे जे पुरुष ज्ञानदृष्टीने तत्वास जाणतात, ते महात्माजन परमब्रह्म परमात्म्यास प्राप्त होतात.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्याय: ।।१३।।

## श्रीमद-भगवदगीता अध्याय चौदावा

## “गुणत्रयविभागयोग”

**सत्व,रज,तम ह्या गुणांनी कोणते व्यवहार होतात व त्यांचे फळ काय हे सांगितले आहे.**

श्रीभगवानुवाच ---भगवंतानी सांगितले

(सत्य जे मुळाकडे नेते,त्याच्याजवळील गुण सत्व,परमेश्वर प्राप्तीसाठी सत्वगुण आवश्यक आहे,परमेश्वर जाणण्यासाठी ह्याचा सुध्दा त्याग करणे आवश्यक आहे.अर्थात निर्गुण व्हावे लागते.मुळप्रकृतीत स्पंदन उत्पन्न करून निम्न अवस्थेकडे नेणारा रजोगुण व त्याहून निम्न तमोगुण अर्थात अप्रकाश अंधार,मुळप्रकृति गुणांनी जड होऊन तमोगुणात्मक होते.)

परं भूय: प्रवक्षामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।

यज्ज्ञात्वा मुनय: सर्वे परां सिध्दिमितो गता: ।।१।।

(परम्,भूय:,प्रवक्षामि,ज्ञानानाम्,ज्ञानम्,उत्तमम् ।

यत्,ज्ञात्वा,मुनय:,सर्वे,पराम्,सिध्दिम्,इत:,गता: ।।१।।)

(क्षेत्रास जड,विकारी,क्षणिक व नाशवान तथा क्षेत्रज्ञास नित्य,चेतन,अविकारी व अविनाशी समजले जाते.हयाच्या भेदास जाणणे आवश्यक आहे.)

सर्वज्ञानांत उत्तम ज्ञान (ध्यान) परत सांगतो जे ज्ञान समजल्यानंतर सर्व मुनी संसारपाशातुन मुक्त होउन परमसिध्दिस प्राप्त करतात.

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागता: ।

सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ।।२।।

इदम्,ज्ञानम्,उपाश्रित्य,मम,साधर्म्यम्,आगता: ।

सर्गे,अपि,न,उजायन्ते,प्रलये,न,व्यथन्ति,च ।।२।।

हे ज्ञान प्राप्त करणारे पुरुष सृष्टीच्या उत्पत्तीकाळी जन्म घेत नाहीत किंवा प्रलयकाळात व्यथीत होत नाहीत.

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भ दधाम्यहम् ।

संभव: सर्वभूतानां ततो भवति भारत ।।३।।

मम,योनि:,महत्,ब्रह्म,तस्मिन,गभम्,दधामि,अहम् ।

संभव:,सर्वभूतानाम्,तत:,भवति,भारत ।।३।।

हे ! भारत माझी महत् ब्रह्म स्वरूपप्रकृति सर्वभूतांचे गर्भाशय आहे,तेथे मी चेतनारूप गर्भाची स्थापना करतो,ज्याच्या व्दांरा सर्वभूतांची उत्पत्ती होते. केवल जड प्रकृतीने ह्यासृष्टीची उत्पत्ती होत नसून त्यापेक्षा अतिसूक्ष्म अश्या स्पंदनबीजरूप प्रकृतीच्या गर्भात स्थापित होऊन जीवसृष्टीचा विस्तार होतो,(योगी परमअवस्थेत शरीरापासून वेगळा होतो,हयावरून हे समजते)

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तय: संम्भवन्ति या: ।

तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रद: पिता ।।४।।

सर्वयोनिषु,कौन्तेय,मूर्तय:,संभवन्ति,या:, ।

तासाम्,ब्रह्म,महत्,योनि:,अहम्,बीजप्रद:,पिता ।।४।।

हे कौन्तेय ! आता योन्यांमध्ये जेवढ्या मुर्त्या अर्थात शरीरधारी प्राणी उत्पन्न होतात त्यांची माता प्रकृती आहे व मी बीजरूप पिता आहे.

सत्वं रजतम इति गुणा: प्रकृतिसंभवा: ।

निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ।।५।।

सत्वम्,रज:,तम:,इति,गुणा:,प्रकृतिसंभवा: ।

निबध्नन्ति,महाबाहो,देहे,देहिनम्,अव्ययम् ।।५।।

प्रकृतीतुन उत्पन्न सत्व,रज,तम हे गुण निर्विकार जीवात्म्यास ह्या देहात बांधून ठेवतात.

तत्र सत्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।

सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ।।६।।

तत्र,सत्वम्,निर्मलत्वात,प्रकाशकम्,अनामयम् ।

सुखसङ्गेन,बध्नाति,ज्ञानसङ्गेन,च,अनघ ।।६।।

हे निष्पाप ! ह्या तीनही गुणात सत्वगुण निर्मळ असल्याने प्रकाशक व विकाररहित आहे,हा गुण जीवात्म्यास सुख व ज्ञान ह्यांच्या संबंधाने अर्थात अभिमानाने बांधतो.

रजो रागात्मकं विध्दि तृष्णासङ्गसमुभ्दवम् ।

तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसग्डेन देहिनम् ।।७।।

रज:,रागात्मकम्,विद्धि,तृष्णासङ्गसमुद्भवम् ।

तत्,निबध्नाति,कौन्तेय,कर्मसङ्गेन,देहिनम् ।।७।।

हे अर्जुन ! रागरूप रजोगुणास कामना व आसक्ती ह्यांनी उत्पन्न असे जाण,जो जीवात्म्यास कर्म व त्याचे फळ ह्या संबंधाने बांधतो.

तमस्त्वज्ञानजं विध्दि मोहनं सर्वदेहिनाम् ।

प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबन्धाति भारत ।।८।।

(तम:,तु,अज्ञानजम्,विध्दि,मोहनम्,सर्वदेहिनाम् ।

प्रमादालस्यनिद्राभि:,तत्,निबन्धाति,भारत ।।८।।)

हे अर्जुन ! सर्वदेहाभिमान्यांना मोहित करणारा तमोगुण,तो अज्ञानाने उत्पन्न झाला असे जाण,तो जीवात्म्यास प्रमाद आळस व निद्रा ह्यांनी बांधतो.

सत्वं सुखे संजयति रज: कर्मणि भारत ।

ज्ञानमावृत्य तु तम: प्रमादे संजयत्युत ।।९।।

सत्वम्,सुखे,संजयति,रज:,कर्मणि,भारत ।

ज्ञानम,आवृत्य,तु,तम:,प्रमादे,संजयति,उत ।।९।।

हे अर्जुन ! सत्वगुण सुखात,रजोगुण कर्मात,तर तमोगुण ज्ञानास झाकून प्रमादास सुध्दा लावतो.

रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ।

रज: सत्त्वं तमश्चैव तम: सत्त्वं रजस्तथा ।।१०।।

रज:,तम:,च,एव,अभिभूय,सत्वम्,भवति,भारत ।

रज:,सत्त्वम्,तम:,च,एव,तम:,सत्त्वम्,रज:,तथा ।।१०।।

सत्व-रज ह्यास दाबून तम,रज-तम ह्यास दाबून सत्व व तर सत्व-तम ह्यास दाबून ऱज अश्या रितीने गुण वाढतात.(इतर दोघांना दाबून तिसरा गुण प्रबळ होतो. )

सर्वव्दारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।

ज्ञानं यदा तदा विद्याव्दिवृध्दंसत्त्वमित्युत ।।११।।

सर्वव्दारेषु,देहे,अस्मिन्,प्रकाश:,उपजायते ।

ज्ञानम्,तदा,विद्दयात,विवृध्दंम्,सत्त्वम्,इति,उत ।।११।।

ज्या वेळेस इंद्रियाव्दांरा जीवात्मा व अंत:करण ह्यात ज्ञानप्रकाश तसेच विवेकशक्ती उत्पन्न होते तेव्हा सत्वगुण वाढीस लागला असे समजावे.

लोभ: प्रवृत्तिरारम्भ: कर्मणामशम: स्पृहा ।

रजस्येतानि जायन्ते विवृध्दे भरतर्षभ ।।१२।।

लोभ:,प्रवृत्ति:,आरम्भ:,कर्मणाम्,अशम:,स्पृहा ।

रजसि,एतानि,जायन्ते,विवृध्दे,भरतर्षभ ।।१२।।

हे भरतर्षभ ! रजोगुण वाढल्यानंतर लोभप्रवृत्ति,स्वार्थबुध्दि ह्याने सकामकर्मास आरंभ होतो,अशान्ति आणि विषयभोग ह्यांची लालसा वाढते.

अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।

तमस्येतानि जायन्ते विवृध्दे कुरुनन्दन ।।१३।।

अप्रकाश:,अप्रवृत्ति:,प्रमाद:,मोह:,एव,च ।

तमसि,एतानि,जायन्ते,विवृध्दे,कुरुनन्दन ।।१३।।

हे कुरुनंदन ! तमोगुण वाढल्यावर अंतःकरण व इंद्रियात अप्रकाश,कर्तव्य-कर्मात अप्रवृत्ती व प्रमाद,निद्रादि अंतःकरण ह्याची मोहिनी वृत्ती,हे सर्व उत्पन्न होते.

यदा सत्त्वे प्रवृध्दे तु प्रलयं याति देहभृत् ।

तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ।।१४।।

यदा,सत्त्वे,प्रवृध्दे,प्रलयम्,याति,देहभृत् ।

तदा,उत्तमविदाम्,लोकान्,अमलान,प्रतिपद्यते ।।१४।।

(ल- माया लोक - स्पंदन,स्पंदनाने अनेक वृत्ति उत्पन्न होतात,ह्या वृत्ती गुणस्पंदनाचा आधार घेऊनच जीवात्मा मृत्यु नंतर राहतो,जड स्पंदनाने नरक व हलक्या स्पंदनाने स्वर्ग प्राप्त होतो)

जेव्हा जीवात्म्यात सत्वगुणांची वृध्दि होते तेव्हा मृत्यु प्राप्त झाला तर उत्तम कर्म करणाऱ्या निर्मळ दिव्य लोकांच्या अवस्थेस प्राप्त होतो.

रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।

तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ।।१५।।

रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।

तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ।।१५।।

(प्रेत = प्रे - पुढे एत - स्पंदन = पुढील गति )

जेव्हा जीवात्म्यात रजोगुणांची वृध्दि होते तेव्हा मृत्यु प्राप्त झाला तर मनुष्यलोक व मूढ अवस्थेत मृत्यु आल्यास मूढ योनीत जन्म होतो.

कर्मण: सुकृतस्याहु: सात्विकं निर्मलं फलम् ।

रजसस्तु फलं दु:खमज्ञानं तमस: फलम् ।।१६।।

कर्मण: सुकृतस्याहु: सात्विकं निर्मलं फलम् ।

रजसस्तु फलं दु:खमज्ञानं तमस: फलम् ।।१६।।

चांगल्या सात्विक कर्माचे फळ हे निर्मळ आहे,राजस कर्माचे फळ हे दु:ख व तामसी कर्माचे फळ हे अज्ञान असे समजले जाते.(प्रत्येक जीवास आपले जीवन चांगले वाटते,उन्नत व्यक्तीस त्याचे पूर्व जीवन खराब वाटते,उत्क्रांतीसाठी उन्नत कर्म करणे आवश्यक आहे,हे न होण्याने जीवात्मा उच्चअवस्थेत जाऊ शकत नाही व नीच अवस्थतेहि जाऊ शकत नाही.त्यास त्रिशंकु अवस्थेत रहावे लागते.)

सत्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।

प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ।।१७।।

सत्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।

प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ।।१७।।

सत्वगुणांनी ज्ञान,रजोगुणांनी लोभ व तमोगुणांनी प्रमाद,मोह व अज्ञान उत्पन्न होते.

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसा: ।

जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामस: ।।१८।।

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसा: ।

जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामस: ।।१८।।

सत्वगुणांचे पुरुष उच्चलोकांत,रजोगुणांचे लोक मध्यम म्हणजे मनुष्य लोकात व तमोगुणाचे लोक निद्रा,मोह,प्रमाद ह्या अधोगुणांत असतात.

नान्यं गुणेभ्य: कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।

गुणेभ्यश्च परं वेत्ति मभ्दावं सोऽधिगच्छति ।।१९।।

नान्यं गुणेभ्य: कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।

गुणेभ्यश्च परं वेत्ति मभ्दावं सोऽधिगच्छति ।।१९।।

तो मनुष्य माझ्या स्वरूपास तेव्हा प्राप्त होतो ज्या वेळेस तीनही गुणांव्यतिरिक्त दुसरा कोणी कर्ता नाही असे समजतो (त्रिगुण हेच सर्व करणारे आहेत असे समजतो) व मला (तीनही गुणां पलीकडच्या अश्या सच्चिदानंद स्वरूपास ) तत्वाने जाणतो.(सर्व करणारा परमात्मा आहे अशी भक्तीमार्गाची प्रारंम्भ अवस्था आहे व अंतीम अवस्था हि साधक स्वतः परमेश्वरच होतो.)

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुभ्दवान ।

जन्ममृत्युजरादु:खै:खैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ।।२०।।

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुभ्दवान ।

जन्ममृत्युजरादु:खै:र्विमुक्तोऽमृतमश्नुते ।।२०।।

(देह उत्पत्तीस कारण असे) तिन्ही गुणांचे उलंघन करून जन्म,मृत्यु,वृध्दावस्था व सर्व प्रकारची दु:खे हयांनी मुक्त असा तो परमानंदास प्राप्त होतो.

अर्जुन उवाच

कैर्लिग्डैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।

किमाचार: कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ।।२१।।

कैर्लिग्डैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।

किमाचार: कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ।।२१।।

अर्जुनाने विचारले,हया तीन गुणांच्या पलीकडील पुरुष कोठकोठल्या लक्षणांनी युक्त असतो व कोठल्या प्रकारे आचरण करतो तसेच हे प्रभो ! मनुष्य कोठल्या उपायांनी हया तीन गुणांच्या पलीकडे जातो.

श्रीभगवानुउवाच

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्ड़व ।

न व्देष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ।।२२।।

प्रकाशं च प्रवृत्ति च मोहमेव च पाण्ड़व ।

न व्देष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ।।२२।।

श्रीभगवंतानी सांगितले कि - हे अर्जुन ! जो पुरुष सत्वगुणांनी कार्यरूप “प्रकाश” रजोगुणांनी कार्यरूप प्रवृत्ति तथा तमोगुण कार्यरूप “मोह” ह्या तिन्ही प्रवृत्त झाल्यास ना व्देष करतो ना निवृत्त झाल्यास त्याची आकांक्षा करतो.(अंतःकरण व इंद्रियादि ह्यात आळसाचा अभाव असून एक प्रकारची चेतना हाच “प्रकाश” होय,व ह्या चेतनशक्तीचा अभाव वा लय हाच “मोह”)

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।

गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेग्ड़ते ।।२३।।

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।

गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेग्ड़ते ।।२३।।

जो सर्व भावनांच्या वर अर्थात उदासीन साक्षीरूप राहून गुणांमुळे जो विचलित होत नाही.तसेच गुणांचा गुणांत खेळ चालला आहे असे जो समजून परमात्म्यात एकीभावाने स्थिर राहतो तो त्या स्थितीतुन कधीच विचलित होत नाही.(त्रिगुणात्मक मायेने उत्पन्न अंतःकरणासहित इन्द्रिये आपल्या-आपल्या विषयात रममाण होतात.)

समदु:खसुख: स्वस्थ: समलोष्टाश्मकाञ्चन: ।

तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुति: ।।२४।।

समदु:खसुख: स्वस्थ: समलोष्टाश्मकाञ्चन: ।

तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुति: ।।२४।।

जो निरंतर आत्मभावात स्थित,दु:ख व सुखास समान समजणारा,माती,दगड,सोनेसारखे समजणारा ज्ञानी,प्रिय तसेच अप्रिय एकसमान मानणारा व आपली निंदा स्तुती ह्यात समान भाव ठेवणारा असतो.

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयो: ।

सर्वारम्भपरित्यागी गुणातीत: स उच्यते ।।२५।।

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयो: ।

सर्वारम्भपरित्यागी गुणातीत: स उच्यते ।।२५।।

जो मान व अपमानात सम मित्र व वैरी ह्यात समदृष्टी व संपूर्ण आरंभाच्या कर्तेपणात अभिमानरहित पुरुष गुणांतीत आहे असे समजले जाते.

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।

स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ।।२६।।

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।

स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ।।२६।।

आणि जो पुरुष अव्यभिचारी भक्तीयोगाने मजला निरंतर भजतो,तो सुध्दा ह्या तीनही गुणांना ओलांडून ब्रह्मप्राप्तीसाठी योग्य होतो.

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।

शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ।।२७।।

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।

शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ।।२७।।

कारण त्या अविनाशी परब्रह्माचा व अमृताचा तसेच नित्य धर्माचा व अखंड एकरस आनंदाचा आश्रय मीच आहे.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे

गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्याय: ।।१४।।

## **श्रीमदभगवदगीता अध्याय पंधरावा**

### **“ पुरूषोत्तमयोग “**

**जीवात्मा शिवात्मा होतो पण जो पर्यन्त संसार वृक्षाचा नाश होत नाही तो पर्यन्त येणे जाणे चालू रहाते,त्यानंतरच योगी उत्तमपुरुष जो ह्या संसार वृक्षापासून वेगळा आहे त्याचाशी अविभक्त होतात व मुक्त होतात अर्थात येणे जाणे संपते.**

ऊर्ध्वमूलमध:शाखमश्वत्थं प्राहूरव्ययम् ।

छन्दासि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।।१।।

ऊर्ध्वमूलम्, अध:शाखम् , अश्वत्थम्, प्राहु: , अव्ययम

छन्दासि,यस्य,पर्णानि,य:,तम्,वेद,स:,वेदवित् ।।१।।

अश्वत्थ - (अ-नसणे,श्व-स्पंदन,त्थ-अवस्था) प्रपंचवृक्ष,सरकणारा संसार,छंद - वेदमंत्र)

मूळ (ब्रह्म)वर असणाऱ्या व मायारूप खाली आहे असा संसार वृक्ष ज्यास वेदरुपी पाने आहेत तो बदलणारा आहे ज्याचा नाश (स्पंदनरहित अवस्थेत) होतो,म्हणून वेद सुद्धा नाहीसे होतात हे जो जाणतो तोच खरा वेद जाणणारा आहे.

आदिपुरुष नारायण वासुदेव नित्य व अनन्त असून सगळ्याचा आधार असल्यामुळे सर्वात-वर नित्यधाम असलेले व सगुणरुप आहेत,जे मायापती व तेच सर्वशक्तिमान परमेश्वर ह्या संसाररूप वृक्षाचे कारण आहेत अर्थात हा वृक्ष वरमूळ असलेला " ऊर्ध्व " आहे.त्या आदि पुरुषापासून उत्पन्न व नित्यधामाच्या खाली असलेल्या ब्रह्मलोकास "अध:" म्हंटले आहे.हा वृक्ष अनादि आहे,अविनाशी आहे.

अधश्चॉर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवाला: ।

अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुन्धीनि मनुष्यलोके ।।२।।

अध:,च,ऊर्ध्वस्,प्रसृता:,तस्य,शाखा,गुणप्रवृद्धा:,विषयप्रवाला: ।

अध: च मूलानि,अनुसन्ततानि,कर्मानुन्धीनि,मनुष्यलोके ।।२।।

त्रिगुणात्मक विषयांनी वृद्धी होऊन जे उर्ध्व (ब्रह्म) आहे त्याचे अधोरूप(माया)असून,त्याच्या शाखा विषयरूप (अहंता,ममता,वासनारूप) होऊन खाली मनुष्यलोकात पसरल्या आहेत,तसेच विषयामुळे काही शाखा वर गेल्या आहेत.

ह्या संसार वृक्षाची मुळे तीन (त्रिगुण) गुण असलेल्या योनीत देव मनुष्य व तिर्यक आदि योन्यांत खाली,वर तसेच मनुष्य लोकात अहंता,ममता व वासनारूप ह्यामुळे वर व खाली पसरली आहेत.ह्याची (संसारवृक्षाची) रक्षा व वृद्धि करणारे  व शोभा वाढवणारे वेद ह्याची पाने आहेत,भगवंताचा हा संसार

क्षणभगूर व दु:खरूप आहे,ह्याचे चिंतन करणे सोडून परमेश्वराचे नित्य-निरंतर व अनन्य प्रेमाने चिंतन करावे हेच वेदांचे तात्पर्य आहे.ब्रह्मापासून उत्पन्न देव मनुष्य व तिर्यक ह्या योन्याना शाखा व शब्द,स्पर्श,रूप,रस,गन्ध ह्या स्थुल (इंद्रियापेक्षा सूक्ष्म ) देहांस फांद्या असे समजले आहे.

न रुपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।

अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण द्रृढेन छित्वा ।।३।।

न रुपम्,अस्य,इह,तथा,उपलभ्यते,न अन्त:,न,च,आदि,न,च,संप्रतिष्ठा ।

अश्वत्थम,एनम्,सुविरूढमूलम्,असङ्गशस्त्रेण,द्रृढेन,छित्वा ।।३।।

अशा खालीवर पसरलेल्या संसारवृक्षामुळे त्याचे रूप गहन चिंतनाने सुद्धा समजत नाही,कारण ह्याचा आदि-मध्य-अन्त समजत नाही,अशा ह्या संस्काराने खोलवर असलेल्या गहन वृक्षाला मुळापासून नाहीसे करण्यासाठी,त्याचा असंग करणे हेच शस्त्र आहे,द्दढपणे असे करून हा वृक्ष नाहिसा करावा.

तत: पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूय: ।

तमेव चाद्दयं पुरुषं प्रपद्द्ये यत: प्रवृत्ति: प्रसृता पुराणी ।।४।।)

(तत:,पदम्,तत्,परिमार्गितव्यम्,यस्मिन,गता:,न,निवर्तन्ति,भूय:,

तम,एव,च,आद्दयम्,पुरुषम्,प्रपद्द्ये,यत:,प्रवृत्ति:,प्रसृता,पुराणी ।।४।।)

ह्या मार्गाने मार्गक्रमण करत केल्यास जेथून योगी परत येत नाहित (संसारात) अश्या आद्दय पुरुषाचे स्थान शोधावे (तरच ते शोधणे शक्य आहे),ज्याच्यापासून ह्या सनातन-पुरातन अश्या संसार प्रवृत्ती-प्रकृतीचा उगम होतो त्यास मी शरण गेलो आहे अशी भावना करावी.

निर्मानमोहा जितसंङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामा: ।

व्दन्व्दैर्विमुक्ता: सुखदुख:संज्ञैर्गच्छन्त्यमूढा: पदमव्ययं तत् ।।५।।

निर्मानमोहा:,जितसंङ्गदोषा:,अध्यात्मनित्या,विनिवृत्तकामा: ।

व्दन्व्दै:,विमुक्ता:,सुखदुख:संज्ञै:,गच्छन्ति,अमूढा:,पदम,अव्ययम्,तत् ।।५।।

असा साधक ज्याने व्दन्व्द,सुखदु:ख,मोह,प्रकृतीसंग व काम ह्यावर ताबा मिळवला आहे,ज्याच्या कामना पूर्णपणे नष्ट झाल्या आहेत असे विमुक्त ज्ञानीजन ह्या अविनाशी पदापर्यन्त पोहोचण्यास उत्तम आहे.(तेच त्या पदापर्यन्त जातात)

न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक: ।

यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।।६।।

न,तत्,भासयते,सूर्य:,न,शशाङ्क:,न,पावक: ।

यत,गत्वा,न,निवर्तन्ते,तत्,धाम,परमम्,मम ।।६।।

साधक मार्गक्रमण करताना वायुरूप अवस्थेत वेगाने अनेक सूर्य चन्द्र आकाशगंगा मागे पडतात,त्यानंतर अतितीव्र वेग तयार होतो व जेथे हे सर्व काहीच नसल्याची अवस्था प्राप्त होते,जेथे वेळ काळ व स्मृतिसुद्धा शिल्लक राहत नाही, (अशा अंधारमय-गूढ स्थिति) नंतर पुढे माझे (आद्दय-पुरुषाचे) स्थान आहे.

ज्या परमपदास गेल्यावर योगीजन परतून येत नाहीत अश्या स्वयंप्रकाशित परमपदास सूर्य,चन्द्र,अग्नी कोणीच प्रकाशीत करू शकत नाहित.तेच माझे परमधाम आहे.

ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन: ।

मन:षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ।।७।।

मम,एव,अंश,जीवलोके,जीवभूत:,सनातन: ।

मन:षष्ठानी ईन्द्रियाणि,प्रकृतिस्थानि,कर्षति ।।७।।

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वर: ।

गृहीत्वैतानी संयोति वायुर्गन्धानिवाशयात् ।।८।।)

शरीरम्,यत्,अवाप्नोति,यत्,च,अपि,उत्क्रामती,ईश्वर: ।

गृहीत्वा,एतानी,संयाति,वायु,गन्धान्,इव,आशयात् ।।८।।

जसे घटातील आकाश वेगळे असल्याचा भास होतो तसाच हा जीवात्मा वेगळा आहे असे वाटते पण खरे तर हा परमेश्र्वराचाच अंश आहे.

माझा परत्म्याचाच सनातन (जीवरूप) अंश जेव्हा शरीर धारण करतो (पूर्वसंस्कारानुसार योग्य शरीरात जन्म घेतो) तेव्हा मन व पंचेन्द्रिये ह्याचा ताबा घेतो,तसेच जसा वारा सुगंध घेऊन जातो त्याचप्रमाणे मृत्युसमयी जीवअंश मन व पंचेन्द्रीयरूप सूक्ष्म शरीर घेऊन नवीन शरीरात जातो.

श्रोत्रं चक्षु: स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।

अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ।।९।।

श्रोत्रम्,चक्षु:,स्पर्शनम्,च,रसनम्,घ्राणम,एव,च ।

अधिष्ठाय,मन:,च,अयम्,विषयान्,उपसेवते ।।९।।

श्रोत्रं,चक्षु:,घ्राण,त्वचा,तसेच रसना व मन ह्यांना अधीन करून ह्याच्या साह्याने जीवात्मा विषयांचे सेवन करतो (जीवात्मा हा शरीर नसल्याने कर्म करण्यासाठी तो शरीराचा उपयोग करतो,योगीजन कर्मरहित होऊन साधनेव्दारे शरीरापासून वेगळेपणाचा अनुभव घेतात.)

उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।

विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुष: ।।१०।।

उत्क्रामन्तम्,स्थितम्,वा,अपि,भुञ्जानम्,वा,गुणान्वितम् ।

विमूढा,अनुपश्यन्ति,पश्यन्ति,ज्ञानचक्षुष: ।।१०।।

शरीरात असताना व विषय भोगात परमात्माचे प्रतिबिंब असलेल्या ह्या जीवात्म्यास (तीन गुणांनी युक्त) अज्ञानी लोक जाणत नाहीत,कारण त्यास तशी ज्ञान दृष्टी लाभलेली नसते,जे साधना करतात त्या योग्यास हि दिव्य द्दष्टी (उच्च अवस्था) प्राप्त असल्याने हे साधक त्यास जाणतात.

यतन्तो योगिनश्चॅनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।

यतन्तोऽप्यकृतात्मानो नैव पश्यन्त्यचेतस:।।११।।

यतन्त:,योगिन:,च,एनम,पश्यत्नि,आत्मनि,अव्यस्थितम् ।

यतन्त:,अपि,अकृतात्मान:,नैनम्,पश्यन्ति,अचेतस:।।११।।

ज्यांचे अंतःकरण शुद्ध झाले आहे ते त्या आत्मतत्वास जाणु शकतात परंतु ज्यांचे अंतःकरण शुद्ध नाही असे अज्ञानी त्यास प्रयत्न करून सुद्धा जाणत नाहीत.

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।

यच्चन्द्रमसि यच्चाग्नी तत्तेजो विद्धि मामकम ।।१२।।

यत्,आदित्यगतम्,तेज,जगत्,भासयते,अखिलम् ।

यत:,चन्द्रमसि,यत्,च,अग्नौ,यत्,च,अग्नौ,तत्,तेज,विद्धि,मामकम् ।।१२।।

जगास प्रकाशित करणारे सूर्यतेज,चंद्रतेज,तसेच जे तेज अग्नीत आहे ते तेज ते माझेच आहे असे तु लक्षात घे.

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।

पुष्णामि चौषधी: सर्वो सोमो भूत्वा रसात्मक: ।।१३।।

गाम्,आविश्य,च,भूतानि,धारयासि,अहम्,ओजसा ।

पुष्णामि,च,औषधी:,सर्वा:,सोम,भूत्वा,रसात्मक: ।।१३।।

मीच पृथ्वीत आपल्या शक्तीने भूतांना धारण करतो,रसरूप अर्थात अमृतमय चंद्रमा होऊन सर्व औषधीना पुष्ट करतो.

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित: ।

प्राणापानसमायुक्त: पचाम्यन्नं चतुर्विधम् ।।१४।।

अहम्,वैश्वानर:,भूत्वा,प्राणिनाम्,देहम्,आश्रित: ।

प्राणापान,समायुक्त:पचामि,अन्नम्,चतुर्विधम् ।।१४।।

मीच प्राण व अपान ह्याने संयुक्त होऊन वैश्र्वानर अग्नी रूपाने आश्रय करतो व भक्ष्य चोक्ष्य लेह्य आणि पेय (खाणे,चोखणे.चाटणे,पिणे) अश्या चार प्रकारच्या अन्नाचे पचन करतो.

सर्वस्य चाहं हृदि सनिविष्टो मत्त: स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।

वेदैश्च सर्वेरहमेव वेद्दयो वेदान्तवृव्देदविदेव चाहम् ।।१५।।

सर्वस्य,चाहम्,हृदि,सनिविष्ट:,मत्त:,स्मृति:,ज्ञानस्,अमपोहनम्,च ।

वेदे:,च,सर्वे:,अहम्,एव,वेद्दय:,वेदान्तकृत,वेदवित्,एव,च,अहम् ।।१५।।

सर्वांच्या हृदयात मीच राहणारा आहे,तसेच स्मृति,ज्ञान,तर्क अथवा विवेक शक्ति (विचाराने संशय-विपर्यय आदिदोषांना हटवणे म्हणजेच अपोहन ) माझ्याच व्दारा आहे,सर्व वेदांव्दारा मीच जाणण्यास योग्य आहे,तसेच वेदांताचा कर्ता आणि वेदांना जाणणारा मीच आहे.

व्दाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।

क्षर: सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ।।१६।।

व्दौ,इमौ,पुरुषौ,लोके,क्षर:,च,अक्षर:,एव,च, ।

क्षर:,सर्वाणि,भूतानि,कूटस्थ,अक्षर:,उच्यते ।।१६।।

ह्या संसारत नाशिवंत व अविनाशी असे दोन प्रकारचे पुरुष आहेत,सर्व भूत प्राण्यांचे शरीर हे नाशवंत असून जीवात्मा (कूटस्थ) हा अविनाशी आहे.

उत्तम पुरुषस्त्वन्य: परमात्मेत्युदाहृत: ।

यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वर: ।।१७।।

उत्तम:,पुरुष:,तु,अन्य:,परमात्मा,इति,उदाहृत: ।

य:,लोकत्रयम्,अविश्य,बिभर्ति,अव्यय,ईश्वर: ।।१७।।

उत्तम पुरुष हा ह्या दोन्हीपेक्षा वेगळा असून तोच तिन्ही लोकात प्रवेश करून त्याचे भरण पोषण करतो,ज्यास अविनाशी परमात्मा असे म्हंटले आहे.

यस्मात्क्षरमतीऽहमक्षरावपि चौत्तम: ।

अतोऽस्मि लोके वेदे च प्रथित: पुरुषोत्तम: ।।१८।।

यस्मात्,क्षरम्,अतीत,अहम्,अक्षरात्,अपि,च,उत्तम: ।

अत:,अस्मि,लोके,वेदे,च,प्रथित:,पुरुषोत्तम: ।।१८।।

मी जडवर्ग क्षेत्रापासून वेगळा व अविनाशी जीवात्म्यापेक्षा उत्तम आहे म्हणून लोकांत व वेदात मी उत्तम पुरुष म्हणून प्रसिद्ध आहे.

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।

स: सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ।।१९।।

य:,माम,एवम्,असंमूढ:,जानाति,पुरुषोत्तमम् ।

स:,सर्ववित्,भजति,माम्,सर्वभावेन,भारत ।।१९।।

हे भारत ! जो मला ह्याप्रकारे (पुरूषोत्तम स्वरूप) जाणतो तो सर्वज्ञ जाणता पुरुष सर्वप्रकारे निरंतर मला परमेश्वरास भजतो.

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।

एतदबुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृतश्च भारत ।।२०।।

इति,गुह्यतमम्,शास्त्रम्,इदम्,उक्तम्,मया,अनघ ।

एतत्,बुद्ध्वा,बुद्धिमान्,स्यात्,कृतकृत:,च,भारत ।।२०।।

हे निष्पाप ! ह्याप्रकारे अतिरहस्ययुक्त गोपनिय शास्त्र माझ्या व्दारे तुला सांगितले,ह्या तत्वाला जाणून मनुध्य ज्ञानवान व कृतार्थ होतो.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरूषोत्तमयोगो नाम

पंत्र्चदशोध्याय: ।।१५।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय सोळावा

## “ दैवासुरसंपदविभागयोग ”

अज्ञान वश जीव चुकीच्या मार्गाने जातात,म्हणून ह्यात दैवी व आसुरी गुणांचे वर्णन केले आहे.

श्रीभगवानुवाच –श्रीभगवान सांगू लागले

अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थिति: ।

दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ।।१।।

अभयम्,सत्वसंशुद्धि,ज्ञानयोगव्यवस्थिति: ।

दानम्,दम:,च,यज्ञ:च,स्वाध्याय:,तप:, आर्जवम् ।।१।।

(अभय-साधनावस्थेत येणारे अनुभव हे साधारण नसून अधिक बलशाली असतात,त्याने भय स्थिती उत्पन्न होते ह्यासाठी दैवी गुण अभय सांगितला आहे,जो निर्वैर,प्रेमपूर्ण,आंतरिकशक्ती पूर्ण असलेला अभय आहे ,चित्तशुद्धि- शुद्धचित्त हे सत्याकडे जाणाऱ्या धारणेसाठी आवश्यक,ज्ञानयोगाची व्यवस्थिति- चित्तशुद्ध धारणेसाठी पद्धतशीरपणे केलेले प्रयत्न जसे परमेश्वराचे एकिभावाने केलेले ध्यान ,दान- दान करून सहानभुती,प्रेम मिळवणे ज्याने चित्त शुद्ध करण्यास मदत होते ,इंद्रियदमन - इंद्रिय दम अर्थात संयम ज्याने अशुद्ध प्रवृत्ती नष्ट करता येतील ,यज्ञ- जीवन हा यज्ञ मानणे ,स्वाध्याय- चित्तशुद्धिसाठी पठण,मनन ,तप- शुद्धसंस्कार ग्रहण करण्यास केलेला अभ्यास ,आर्जव- अहंकार व आढयता नाहीसे करणारी वृत्ती)

भय सर्वथा नसणे,अंतःकरणाची पूर्ण निर्मळता,तत्वज्ञानासाठी ध्यानयोगात निरंतर द्दढ स्थिति,सात्विक दान,इन्द्रियांचे दमन,भगवान,देवता,गुरुजनांची पूजा,तसेच अग्नीहोत्र आदि उत्तम कर्माचे आचरण,वेदशास्त्रांचे पठण-पाठण तसेच परमेश्वराच्या नाम व गुणांचे कीर्तन,स्वधर्म पालन करण्यासाठी कष्टसहन करणे आणि शरीर तसेच इंद्रियासहित अंतःकरणाचा सरळपणा.

अहिंसा सत्यमक्रोधस्त्याग: शन्तिरपैशुनम् ।

दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दव ह्रीरचापलम् ।।२।।

अहिंसा सत्यम् अक्रोध:,त्याग: शान्ति,अपैशुनम् ।

दया,भूतेषू,अलोलुप्त्वम्,मार्दवम्,ह्री,अचापलम् ।।२।।

(अहिंसा- कायावाचामने आक्रमक न होणे,जरुरी पुरतेच घेणे किंवा ग्रहण करणे ,सत्य-सत्य धारणा,व्यवहार वाणीव्दारा प्रकट करणे, अक्रोध- चित्ताचे संतुलन बिघडून वृत्ती आक्रमक न होणे ,त्याग- जीवनदायी त्यागाने चित्तात स्वस्थता आणणे तसे न केल्यास शुद्ध स्थिति बिघडू शकते. ,शान्ति- त्यागातुन शांति ,अपैशुनम- पशुप्रमाणे वागणूक,कोणाचीही निंदा न करणे,दया - हेतुरहित दया, मार्दव - चित्ताची कोमलता, ह्री-कठोर आचरण,चापलम -कल,प्रवृत्ती)

कायावाचामने कोणालाही त्रास होणार नाही ह्याची दक्षता घेणे,आपले वाईट चिंतणाऱ्यावरही क्रोध न करणे,कर्मात कर्तेपणाचा अभिमान त्याग,अंतःकरण स्थिर असणे अर्थात चंचलता नसणे,कोणाचीही निंदा न करणे,हेतुरहित सर्वप्राण्यांत दया,इंद्रिये विषयात असताना आसक्त न होणे,कोमळता,लोक व शास्त्र विरुद्ध वर्तनाची लाज तसेच व्यर्थ कार्याचा अभाव.

तेज: क्षमा धृति: शौचमद्रोहो नातिमानिता ।

भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ।।३।।

तेजः,क्षमा,धृतिः,शौचम्,अद्रोहः,नातिमानिता, ।

भवन्ति,संपदम्,दैवीम्,अभिजातस्य,भारत ।।३।।

( तेज -तीव्रशक्ती ज्याने अशुद्धभावना नष्ट होतील,क्षमा-धैर्याचा संतुलित व्यवहार,धृति-श्रेष्ठ धारणा शक्ती,शौचम्-शुद्ध व्यवहार ,अद्रोह -ज्याच्या कडून घेतले त्याच्याशी कृतज्ञअसणे दगा न करणे,अतिमानिता-अहंगंड नसणे ,दैवीम् - दैवी,अभिजातस्य - परिपूर्ण )

अंतःकरण व इंद्रियाव्दारे जसा निश्चय होईल तसेच्या तसे प्रिय शब्दात सांगणे ह्याचे नाव 'सत्यभाषण' श्रेष्ठ पुरुषांच्या ह्या शक्तीस "**तेज**" म्हणतात,ज्याने अशुद्ध शक्ति बलहीन होऊन श्रेष्ठ पुरुष ज्यामार्गाने नेतील तसे वर्तन करतात.(नीच प्रवृत्ती सदप्रवृत्तीकडे वळतात)कोणाबद्दल हि शत्रुता नसणे तसेच आपल्या बद्धल अहंगंड नसणे ( आपण पूजनीय आहोत श्रेष्ठ आहोत असे न वाटणे ) हे दैवी गुण होत.

दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।

अज्ञान चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम् ।।४।।

दम्भः,दर्पः,अभिमानः,क्रोधः,पारुष्यम्,एव,च, ।

अज्ञानम्,च,अभिजातस्य,पार्थ,संपदम्, आसुरीम् ।।४।।

दम्भ,घमेंड,अभिमान,क्रोध,कठोरता,अज्ञान,हे सर्व आसुरी संपत्तीचे गुण मानले गेले आहेत.

दैवी संपव्दिमोक्षाय निबन्धायासुरी मता ।

मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ।।५।।

दैवी,संपत्ति,विमोक्षाय,निबन्धाय,आसुरी,मता ।

मा,शुचः,संपदम्,दैवीमाभिजातोऽसि,पाण्डव ।।५।।

दैवी संपत्ती हि मोक्षास तर आसुरी संपत्ती बंधानास कारण आहे,त्यासाठी शोक करू नकोस,हे पाण्डव! तु दैवी संपत्तीने संपन्न आहेस.

व्दौ भूतसर्गो लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।

दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे श्रृणु ।।६।।

व्दौ,भूतसर्गौ,लोके,अस्मिन्,दैव,आसुर,एव,च ।

दैवः,विस्तरशः,प्रोक्त,आसुरम्,पार्थ,मे,शृणु ।।६।।

हे अर्जुन,ह्या भूतसर्गात दोन प्रकारचे लोक आहेत,दैवी व आसुरी,ह्यातील दैवी संपत्तीच्या लोकांचे वर्णन विस्ताराने केलेले आहे,आता तु आसुरी संपत्तीच्या लोकांचे वर्णन ऐक .

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।

न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्दयते ।।७।।

प्रवृत्तिम्,च,निवृत्तिम्,च,जनाः,न,विदुःआसुराः ।

न,शौचम्,न,अपि,च,आचारः,न,सत्यम्,तेषु,विद्दयते ।।७।।

आसुरी संपत्तीचे लोक प्रवृत्ती वा निवृत्ती दोन्ही जाणत नाहीत,म्हणून त्यांच्यात बाहेरील व आतील शुद्धता,सदाचार व सत्यता,सत्यभाषण नसते.

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।

अपरस्परसभुतं किमन्यत्कामहैतुकम् ।।८।।

असत्यम्,अप्रतिष्ठम्,ते,जगत्,आहुः,अनीश्वरम् ।

अपरस्परसंभुतम्,किम्, अन्यत्,अकामहैतुकम् ।।८।।

ते मानतात कि हा संसार आश्रयरहित असून सर्वथा असत्य आहे तसेच ह्यात ईश्वर नसून केवल स्त्री-पुरुष ह्याच्या संयोगाने उत्पन्न झाल्याने ह्यात कामवासने शिवाय काय आहे?

एता द्रृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।

प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ।।९।।

एता द्रृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।

प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ।।९।।

अशा प्रकारचे लोक दुषितबुद्धि असलेले क्रूर असून मंदबुद्धि असतात ते सर्वांचे अहित करणारे असून जगाचा नाश करणाण्यासाठीच उत्पन्न झालेले आहेत.

काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विता:।

मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रता: ।।१०।।

कामम्,आश्रित्य,दुष्पूरम्,दम्भमान,मदान्विता: ।

मोहात्,,गृहीत्वा सद्ग्राहान् प्रवर्तन्ते अशुचिव्रता: ।।१०।।

कधीही पूर्ण न होणाऱ्या विषयकामनांचा आश्रय घेऊन दम्भ अभिमान व मद ह्यांनी युक्त होऊन तसेच मोहवश मिथ्या सिद्धांताना ग्रहण करून ते अमंगळ कर्म करण्यास प्रवृत्त होतात.

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिता: ।

कामापभोगपरमा एतावदिति निश्चिता: ।।११।।

चिन्ताम्,अपरिमेयाम्,च,प्रलयान्ताम्,उपाश्रिता: ।

कामापभोगपरमा:,एतावत्,इति,निश्चिता: ।।११।।

आमरणान्त सुखोपभोगासाठी चिन्तेने ग्रस्त,कामोपभोगात डूबलेले लोक ह्यासच सर्वस्व मानणारे असतात.

आशापाशशतैर्बद्धा: कामक्रोधपारायणा: ।

ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसत्र्चयान् ।।१२।।

आशापाशशतै:,बद्धा:,कामक्रोधपारायणा: ।

ईहन्ते,कामभोगार्थम्,अन्यायेन,अर्थसत्र्चयान् ।।१२।।

शेकडो आशापशांनी बद्ध,कामक्रोध परायण हे असुरी लोक सुखाच्या उपभोगासाठी अन्यायाने धनाचा संचय करण्याचाच प्रयत्न करतात.

इदमद्दय मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।

इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्।।१३।।

इदम्,अद्दय,मया,लब्धम्,इमम्,प्राप्स्ये,मनोरथम् ।

इदम्,अस्ति,इदम्,अपि,मे,भविष्यति पुनर्धनम् ।।१३।।

आज माझ्याकडे ईतके धन आहे **उद्या** मी अधिक यत्न करून मिळवीन,हे धन माझेच आहे व ते माझेच राहणार आहे.

असौ मया हत: शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।

ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ।।१४।।

असौ,मया,हत:,शत्रु:,हनिष्ये,च,अपरान्,अपि ।

ईश्वर,अहम्,अहम्,भोगी,सिद्ध:,अहम्, बलवान,सुखी ।।१४।।

ह्या शत्रुला मी मारले व दुसऱ्यांना सुद्धा मारीन,मीच ईश्वर आहे,मीच सगळ्याचा उपभोग घेणारा आहे.मीच सिद्ध,मीच बलाढय,मीच सुखी आहे.

आढयोऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।

यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिता: ।।१५।।

आढय:,अभिजनवान,अस्मि,क:अन्य:,अस्ति,सदृश:,मया ।

यक्ष्ये,दास्यामि,मोदिष्ये,इति,अज्ञानविमोहिता: ।।१५।।

मीच मोठा धनी,मोठे माझेच कुटुंब आहे,मी यज्ञ करणार,दान करणार,चैन करणार,अशातर्हेने अज्ञानाने मोहग्रस्तअसतो.

अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृता:।

प्रसक्ता: कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुची ।।१६।।

अनेकचित्तविभ्रान्ता:,मोहजालसमावृता:।

प्रसक्ता:,कामभोगेषु,पतन्ति,नरके,अशुची ।।१६।।

अनेक कल्पनांनी भ्रमित,मोहजाळात फसलेले हे लोक विषयभोगात आसक्त असून हे आसुरी जन महान अपवित्र कार्याने नरकात जातात.

आत्मसंभाविता: स्तब्धा धनमानमदान्विता: ।

यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ।।१७।।

आत्मसंभाविता:,स्तब्धा,धनमानमदान्विता: ।

यजन्ते,नामयज्ञै,ते,दम्भेन,अविधिपूर्वकम् ।।१७।।

आत्मप्रशंसक घमेंडी पुरुष धन आणि मान ह्याच्या मदाने युक्त होऊन केवळ नाममात्र अश्या यज्ञाव्दारा पाखंडाने शास्त्ररहित कार्य करतात.

अहंक्ङारं बलं दर्प कामं क्रोधं च संश्रिता: ।

मामात्मपरदेहेषु प्रव्दिषन्तोऽभ्यसूयका:।।१८।।

अहंकारम्,बलम्,दपम्,कामम्,क्रोधम्,च,संश्रिता: ।

माम,आत्मपरदेहेषु,प्रव्दिषन्त:,अभ्यसूयका:।।१८।।

अहंकार,बल,दर्प,काम व क्रोध ह्यांनी फुलून आपल्या व इतरांच्या शरीरात असलेल्या परमात्म्याचा (माझा) व्देष करणारे असतात.

तानहं व्दिषत: क्रूरान्संसारेषु नराधमान् ।

क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ।।१९।।

तान्,अहम्,व्दिषत:,क्रूरान्,संसारेषु,नराधमान् ।

क्षिपामि,अजस्रम्,अशुभान्,आसुरीषु,ऐव,योनिषु ।।१९।।

अशा व्देष करणाऱ्या पापाचारी व कृरकर्मी नराधमांना मी संसारात नेहमी सारखे-सारखे आसुरी योनीतच ढकलतो.

आसुरी योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।

मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ।।२०।।

आसुरीम्,योनिम्,आपन्ना,मूढा:,जन्मनि,जन्मनि ।

माम्,अप्राप्य,एव,कौन्तेय,तत:,यान्ति,अधमाम,गतिम् ।।२०।।

हे कौन्तेय ! अशाप्रकारे जन्मोजन्मी आसुरी योनी प्राप्त झालेले हे मूढ लोक,मला प्राप्त न होता (मजपर्यन्त-परमात्म्यापर्यन्त) न पोहोचता नीच योनीत जातात व अतिनीच योनीत जाऊन घोर नरकात जातात.

त्रिविधं नरकस्येदं व्दारं नाशनमात्मन:।

काम: क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत।।२१।।

त्रिविधम्,नरकस्य,इदम्,व्दारम्,नाशनम्,आत्मन:।

काम:,क्रोध:,तथा,लोभ:,तस्मात्,एतत्,त्रयम्,त्यजेत।।२१।।

काम,क्रोध व लोभ हि आत्म्याचा नाश करणारी,अर्थात अधोगतीस जाणारी,नरकाची व्दारे आहेत म्हणून त्यांचा (तिन्हींचा) त्याग करावा.

एतैर्विमुक्ता: कौन्तेय तमोव्दारैस्त्रिभिर्नर: ।

आचारत्यात्मन: श्रेयस्ततो याति परां गतिम् ।।२२।।

एत्,विमुक्ता:,कौन्तेय,तमोव्दारे:,त्रिभि:,नर: ।

आचारीत,आत्मन:,श्रेय,तत:,याति,पराम्,गतिम् ।।२२।।

हे कौन्तेय ! हया तीन नरकाच्या व्दारांनी मुक्त असा पुरुष,कल्याणकारी आचरण करून परमगतीस प्राप्त होतो.

य: शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारत: ।

न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ।।२३।।

य:,शास्त्रविधिम्,उत्सृज्य,वर्तते,कामकारत: ।

न,स:,सिद्धिम्,अवाप्नोति,न,सुखम्,न,पराम्,गतिम् ।।२३।।

शास्त्रविधि सोडून व कामप्रेरित होऊन जो मनमानी आचरण करतो,तो ना परमगतीस ना सुख,सिद्धि प्राप्त करतो.

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।

ज्ञात्वा शास्त्रविधानोक्त्मं कर्म कर्तुमिहार्हसि ।।२४।।

तस्मात्,शास्त्रम्,प्रमाणम्,ते,कार्याकार्यव्यवस्थिती ।

ज्ञात्वा,शास्त्रविधानोक्तम्,कर्म,कर्तुम्,ईह,अर्हसि:।।२४।।

ह्यासाठी कर्तव्य व अकर्तव्य ह्यासाठी तुला शास्त्र हेच प्रमाण आहे म्हणून तु शास्त्रविधिने नियत कार्य करणे योग्य आहे.(शास्त्रांनी केलेले नियम बऱ्याच विचाराने व सर्वांच्या कल्याणासाठी असतात पण त्याचा विचार करून नियम पाळावेत,त्यातील हेतु लक्षात घ्यावा)

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपदविभागयोगो नाम

षोडशोऽध्याय:।।१६।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय सतरावा

## “श्रद्धात्रयविभागयोग”

**पूर्वसंस्कारानुसार जीव त्रिगुणाच्या अधिपत्याखाली श्रद्धा ठेऊन वागतात त्याचे काय फळ आहे ते सांगितले आहे.**

अर्जुन उवाच-अर्जुनाने विचारले

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रध्दयान्विता: ।

तेषा: निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तम: ।।१।।

ये,शास्त्रविधिम्,उत्सृज्य,यजन्ते,श्रध्दया,अन्विता: ।

तेषाम्,निष्ठा,तु,का,कृष्ण,सत्वम,आहो,रज:,तम: ।।१।।

जो माणूस शास्त्रांचा त्याग करून श्रध्देने देवाची पूजा करत असेल,त्याची स्थिति कोणती? सात्विक,राजसी की तामसी? ( श्रध्दा व शास्त्र काय आहे?)

श्रीभगवान उवाच

त्रिविधा भवति श्रध्दा देहिनां सा स्वभावजा ।

सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां श्रृणु ।।२।।

त्रिविधा,भवति,श्रध्दा,देहिनाम्,सा,स्वभावजा ।

सत्विकी,राजसी,च,एव,तामसी,च,इति,ताम्,श्रृणु ।।२।।

स्वभावजा - अनेक जन्मांपासून संचित संस्कारांनी उत्पन्न श्रध्दा

मनुष्याच्या स्वभावानुसार त्याची श्रध्दासात्विक,राजसी किंवा तामसी असते ते कसे हे तु माझ्याकडून ऐक.

सत्वानुरूपा सर्वस्य श्रध्दा भवति भारत ।

श्रध्दामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रध्द स एव स: ।।३।।

सत्वानुरूपा,सर्वस्य,श्रध्दा,भवति,भारत ।

श्रध्दामय:,अयम्,पुरुष:य:,यच्छ्रध्द:,सा,एव,स: ।।३।।

हे भारत! सर्व मनुष्यांची श्रध्दात्यांच्या प्रकृतीस्वभावानुसार असते,पुरुष स्वतः श्रध्दामय आहे म्हणून जशी त्याची श्रध्दा त्या श्रध्देनुसार तो स्वतःसुध्दा (मनुष्य) आहे.

यजन्ते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसा: ।

प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जना:।।४।।

यजन्ते,सात्विका,देवान्,यक्षरक्षांसि,राजसा: ।

प्रेतान्,भूतगणान्,च,अन्ये,यजन्ते,तामसा:,जना:।।४।।

सात्विक प्रवृत्तीचे लोक देवतांचे यजन,राजस वृत्तीचे राक्षसादिंचे पूजन व तामसी लोक भूतप्रेतादिंची आराधना करतात.

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जन: ।

दम्भाहंक्ङारसंयुक्ता: कामरागबलान्विता: ।।५।।

अशास्त्रविहितम्,घोरम्,तप्यन्ते,ये,तप:,जना: ।

दम्भाहंकारसंयुक्ता:,कामरागबलान्विता: ।।५।।

जो (ती माणसे) माणूस शास्त्रविधी रहित केवळ मनोकल्पित घोर तप करतात,तसेच दम्भ व अहंकार ह्यांनी युक्त व कामना व आसक्ती तथा बल ह्याचा अभिमान ह्यांनी युक्त आहेत.

कर्षयन्त: शरीरस्थं भूतग्राममचेतस: ।

मां चैवान्त:शरीरस्थं तान्विध्दयासुरनिश्र्चयान् ।।६।।

कर्षयन्त:,शरीरस्थम्,भूतग्रामम्,अचेतस:, ।

माम्,च,एव,अन्त:शरीरस्थम्,तान्,विद्धि,आसुरनिश्र्चयान् ।।६।।

जे लोक शरीरस्थित भूतसमुदाय व अंतःकरण ह्यास (ह्यात स्थित मला परमात्म्याला) कृश करून दु:ख देतात त्या अज्ञाज्ञांना तु असुर स्वभावाचे समज.(इंद्रियांचे लाड वा इंद्रियांना त्रास देणे असे दोन्ही योगासाठी न करता त्याचे फक्त योग्य पालन करून आंतरिक शक्तीने परमात्म्यास जाणणे हाच मार्ग योग्य आहे.)

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रिय: ।

यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं श्रृणु ।।७।।

आहार:,तु,अपि,सर्वस्य,त्रिविधा:,भवति,प्रिय: ।

यज्ञ:,तप,तथा,दानम्,तेषाम्,भेदम्,इदम्,श्रृणु ।।७।।

भोजन सर्वांना आप-आपल्या प्रकृती स्वभावानुसार तीन प्रकारचा प्रिय आहे,तसेच यज्ञ,तप व दान हे सुध्दा तीन प्रकारचे आहे त्याचे पृथक-पृथक भेद तु ऐक.

आयु:सत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धना: ।

रस्या: स्निग्धा: स्थिरा हृद्या आहारा: सात्विकप्रिया:।।८।।

आयु:सत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धना: ।

रस्या: स्निग्धा: स्थिरा हृद्दया आहारा: सात्विकप्रिया:।।८।।

आयु (वय) बुध्दि,बल,आरोग्य,सुख आणि प्रीति वाढवणारे रसयुक्त स्निग्ध, चिकट,जास्त काळ स्थिर राहणारे तसेच स्वभावाने मनास प्रिय असा आहार अर्थात भोजन पदार्थ सात्विक लोकांना प्रिय आहेत.

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरुक्षविदाहिन: ।

आहारा राजसस्येष्टा दुख:शोकामयप्रदा: ।।९।।

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरुक्षविदाहिन: ।

आहारा:,राजसस्य,इष्टा,दुख:शोकामयप्रदा: ।।९।।

कडवट,तुरट,आंबट,लवणयुक्त,अतिशय गरम,तिखट,दाहकारक व दु:ख,चिंता,रोग उत्पन्न करणारे पदार्थ राजसगुणांनी युक्त लोकांना आवडतात.

यातयामं गतरसं पुर्ति पर्युषितं च यत् ।

उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ।।१०।।

यातयामम्,गतरसम्,पुर्ति,पर्युषितम्,च,यत् ।

उच्छिष्टम्,अपि,च,अमेध्यम्,भोजनम्,तामसप्रियम् ।।१०।।

जे भोजन अर्धवट शिजलेले,रसरहित,दुर्गंधीयुक्तवास येणारे उष्टे असते तसेच जे अपवित्र सुध्दा आहे असे भोजन तामसी लोकांस आवडते.

अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।

यष्टव्यमेवेति मन: समाधाय स सात्विक:।।११।।

अफलाकाङ्क्षिभि:,यज्ञ:,विधिदृष्ट:,य:,इज्यते ।

यष्टव्यम,एव,इति,मन:,समाधाय,स:,सात्विक:।।११।।

फळाची इच्छा सोडून आणि मनाचे समाधान करून तसेच कर्तव्य मानून विधिवत केलेला शास्त्रशुध्द यज्ञ सात्विक आहे.( शास्त्रविधीने नियत यज्ञच कर्तव्य आहे असे मनाचे समाधान मानून करणे)

अभिसन्धाय तु फलं दन्भार्थमपि चैव यत् ।

इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विध्दि राजसम् ।।१२।।

अभिसन्धाय,तु,फलम्,दन्भार्थम,अपि,च,एव,यत् ।

इज्यते,भरतश्रेष्ठ,तम्,यज्ञम्,विद्धि,राजसम् ।।१२।।

(स्वर्गादिची कामना करून केलेला यज्ञ हा अयज्ञ आहे.) दम्भाचरण व फळाची इच्छा धरून केलेला यज्ञ तु राजस यज्ञ समज.

विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् ।

श्रध्दाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ।।१३।।

विधिहीनम्,असृष्टान्नम्,मन्त्रहीनम्,दक्षिणम् ।

श्रध्दाविरहितम्,यज्ञम्,तामसम्,परिचक्षते ।।१३।।

शास्त्रविधि सोडून,अन्नदान,मंत्र,दक्षिणा (नम्रतापूर्वक दान) व श्रध्दारहित यज्ञ तामसी यज्ञ होय.(यज्ञात अन्नदान,विद्ध्यादान व प्रेमदान व चिंतनरुपी मंत्र आवश्यक)

देवव्दिजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।

ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ।।१४।।

देवव्दिजगुरुप्राज्ञपूजनम्,शौचम,आर्जवम् ।

ब्रह्मचर्यम,अहिंसा,च,शारीरम्,तप:,उच्यते ।।१४।।

गुरु - आपल्या पेक्षा वडिलधारी

देवता,ब्राह्मण,गुरु व ज्ञानी ह्यांचे पूजन,पवित्रता,सरलता,ब्रह्मचर्य व अहिंसा हेच शरीरासंबंधी तप सांगितले आहे.

अनुव्देगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।

स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङमयं तप उच्यते।।१५।।

अनुव्देगकरम्,वाक्यम्,सत्यम्,प्रियहितम्,च यत् ।

स्वाध्यायाभ्यसनम्,च,एव,वाङमयम्,तप उच्यते।।१५।।

यथार्थ - मन इंद्रियाव्दांरा जसा अनुभव असेल,तसेच सांगणे

उव्देग न करणारे प्रिय आणि हितकारक यथार्थ भाषण,तसेच वेदशास्त्र पठण,तसेच नाम जपाचा अभ्यास,तेच वाणी संबंधी तप सांगितले आहे.

मन:प्रसाद: सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रह: ।

भावसंशुध्दिरित्येतत्तपो मानसमुच्यते ।।१६।।

मन:प्रसाद:,सौम्यत्वम्,मौनम्,आत्मविनिग्रह: ।

भावसंशुध्दि,इति,एतत्,तप,मानसम्,उच्यते ।।१६।।

मनाची प्रसन्नता,शांतभाव,आत्मचिंतन (भगवतचिंतन),मनाचा निग्रह,अंतःकरणाची पवित्रता ह्यास मनासंबंधी तप म्हणून म्हंटले आहे.

श्रध्दया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरै: ।

अफलाकाङ्क्षिभिर्युक्तै: सात्विकं परिचक्षते ।।१७।।

श्रध्दया,परया,तप्तम्,तप:,त्रिविधम्,नरै: ।

अफलाकाङ्क्षिभि:,युक्तै:,सात्विकम्,परिचक्षते ।।१७।।

फळाची आशा न करणाऱ्या योगी पुरुषांनी परम श्रध्देने केलेल्या पूर्वोक्त तिन्ही प्रकारच्या तपास सात्विक तप असे म्हणतात.

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।

क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ।।१८।।

सत्कारमानपूजाथम्,तपो:,दम्भेन,च,एव,यत् ।

क्रियते,तत्,इह,प्रोक्तम्,राजसम्,चलम्,अध्रुवम् ।।१८।।

अनिश्चित - ज्याचे फळ असण्यात - न असण्यात शंका आहे.

जे तप सत्कार,मान व पूजेने अर्थात स्वार्थासाठी पाखंडी स्वभावाने केले जाते ते अनिश्चित तसेच क्षणिक फळ असणारे तप असून त्यास राजस तप असे म्हणतात.

मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तप: ।

परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ।।१९।।

मूढग्राहेण,आत्मन:,यत्,पीडया,क्रियते,तप: ।

परस्य,उत्सादनाथम्,वा,तत्,तामसम,उदाहृतम् ।।१९।।

जे तप मूढतापूर्वक हट्टाने,मन वाणी व शरीर पिडेसहित अथवा दुसऱ्याचे अनिष्ट करण्यासाठी केले जाते त्यास तामस तप असे म्हणतात.

दातव्यमिति **यद्दानं** दीयतेऽनुपकारिणे ।

देशे काले च पात्रे च **तद्दानं** सात्विकं स्मृतम् ।।२०।।

दातव्यम्,ईति,यत्,दानम्,दीयते,अनुपकारिणे ।

देशे,काले,च,पात्रे,च,तत्,दानम्,सात्विकम्,स्मृतम् ।।२०।।

दान करणे हे कर्तव्य समजून देश काळ तसेच योग्य पात्र (लायक) मिळाल्यावर (उपकार न करणाऱ्यास- त्याहेतूने ) दिले जाते असे दान सात्विक समजले जाते.(जेथे ज्याचा अभाव आहे त्याचे दान करण्यासाठी तो देश काळ योग्य व सर्व संपन्न असलेल्या ठिकाणी कोठलेही दान योग्य होय.)

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमु**द्दिश्य** वा पुन: ।

दीयते च परिक्लिष्टं **तद्दानं** राजसं स्मृतम् ।।२१।।

(यत्,तु,प्रत्युपकारार्थम्,फलम,उद्दिश्य,वा,पुन: ।

दीयते,च,परिक्लिष्टम्,तत्,**द्दा**नम्,राजसम्,स्मृतम् ।।२१।।)

जे दान क्लेशपूर्वक तसेच प्रत्युपकार (परतफेड) ह्याचा हेतु (फलेच्छा) मनात ठेऊन दिले जाते त्या दानास राजस दान असे म्हणतात.

अदेशकाले **यद्दान**मपात्रेभ्यश्च दीयते ।

असत्क्रृतवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ।।२२।।

अदेशकाले,यत्,दानम्,अपात्रेभ्य,च,दीयते ।

असत्क्रृतम्,अवज्ञातम्,तत्,तामसम्,उदाहृतम् ।।२२।।

जे दान सत्काराशिवाय,तिरस्कारपूर्वक अयोग्य देश,काळ व कुपात्र व्यक्तीस दिले जाते ते तामसी दान होय.

ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविध: स्मृत:।

ब्राह्मणस्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिता: पुरा ।।२३।।

ॐ,तत,सत्,इति,निर्देश,ब्रह्मण:,त्रिविध:,स्मृत:।

ब्राह्मणा,तेन्,वेदा,च,यज्ञा:,च,विहिता:,पुरा ।।२३।।

ॐ तत् सत् ह्या तीनप्रकारस सच्चिदानंदब्रह्म म्हंटले आहे,ज्याने सृष्टीच्या आदि काळात ब्राह्मण तथा वेद तसेच यज्ञ रचले गेले आहेत.

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतप:क्रिया: ।

प्रवर्तन्ते विधानोक्ता: सततं ब्रह्मवादिनाम् ।।२४।।

तस्मात्,ॐ,इति,उदाहृत्य,यज्ञदानतप:,क्रिया: ।

प्रवर्तन्ते,विधानोक्ता:,सततम्,ब्रह्मवादिनाम् ।।२४।।

ह्यासाठी वेदमंत्रांचे उच्चारण करणाऱ्या श्रेष्ठ पुरुषांची शास्त्रविधि ने नक्की केलेल्या यज्ञ,तप व दानरूप क्रिया सदा ॐ ह्या परमात्माचे नाम असणाऱ्या उचाराने आरम्भ होतात.

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतप:क्रिया ।

दानक्रियाश्च विविधा: क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभि:।।२५।।

तत्,इति,अनभिसंधाय,फलम्,यज्ञतप:क्रिया ।

दानक्रिया,च,विविधा:,क्रियन्ते,मोक्षकाङ्क्षिभि:।।२५।।

तत् ह्या नामाने परमात्म्याचेच सगळे आहे अश्या भावनेने फळाची अपेक्षा न करता नानाप्रकारचे यज्ञ व तपरूप क्रिया तथा दानरूप क्रिया कल्याणाच्या ईच्छेने पुरुषांकडून केली जाते.

सभ्दावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।

प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्द: पार्थ युज्यते ।।२६।।

सभ्दावे,साधुभावे,च,सत्,इति,एतत्,प्रयुज्यते ।

प्रशस्ते,कर्मणि,तथा,सत्,शब्द:,पार्थ,युज्यते ।।२६।।

'सत्' ह्याप्रकाराने परमात्म्याचे नाव सत्य व श्रेष्ठ भावाने केले जाते.हे !पार्थ उत्तम कर्मातही सत् ह्याचा उपयोग केला जातो.

यज्ञे तपसि दाने च स्थिति: सदिति चोच्यते ।

कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ।।२७।।

यज्ञे,तपसि,दाने,च,स्थिती:,सत्,इति,च,युच्यते ।

कर्म,च,एव,तदर्थीयम्,सत्,इति,एव,अभिधीयते ।।२७।।

यज्ञ,तप व दान त्यास सुध्दा सत् असेच म्हंटले आहे,परमात्म्यासाठी निश्र्चयपूर्वक केलेल्या कामासही 'सत्' असे म्हणतात.

अश्रध्दया हुतं दत्त तपस्तप्त्मं कृतं च यत् ।

असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ।।२८।।

अश्रध्दया,हुतम्,दत्तम्,तप:,तप्त्मम्,कृतम्,च,यत् ।

असत्,इति,उच्यते,पार्थ,न,च,तत्,प्रेत्य,नो,इह ।।२८।।

हे अर्जुना ! श्रध्देशिवाय केलेले हवन,दान,केलेली तपश्र्चर्या,केलेले शुभकार्य हे असत् ह्याप्रकारात मोडते.असे कार्य ना ह्या लोकात ना परलोकात (मृत्युपश्र्चात) उपयोगी आहे.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रध्दात्रयविभागयोगो नाम

सप्तदशोऽध्याय: ।।१७।।

## श्रीमदभगवदगीता अध्याय अठरावा

## "मोक्षसंन्यासयोग"

**त्याग व संन्यास ह्यातील फरक ह्यात स्पष्ट करून सर्व अध्यायांचे सार ह्यात सांगितले आहे.**

अर्जुन उवाच

संन्यासस्य महाबाहो तत्वमिच्छामि वेदितुम् ।

त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ।।१।।

संन्यासस्य,महाबाहो,तत्वम्,ईच्छामि,वेदितुम् ।

त्यागस्य,च,हृषीकेश,पृथक्,केशिनिषूदन ।।१।।

केशि - मायेची स्निघ्नदा (तिचा न तुटणारा मोह),केशिनिषुदन - मायेचा मोह त्यागलेला (श्रीकृष्ण)

हे ! महाबाहो हे अन्तर्यामिन् ! वासुदेव ! मी संन्यास व त्याग ह्या तत्वाचे पृथक पृथक (सविस्तर) वर्णन जाणू इच्छितो.

श्रीभगवानुवाच

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदु:।

सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणा:।।२।।

काम्यानाम्,कर्मणाम्,न्यासम्,संन्यासम्,कवय:,विदु: ।

सर्वकर्मफलत्यागम्,प्राहु:,त्यागम्, विचक्षणा:।।२।।

श्रीभगवान म्हणाले - कित्येक पंडितजन काम्यकर्माच्या फळाला त्याग समजतात,तसेच दुसरे विचारकुशल सर्व कर्माच्या फळाला त्याग समजतात (मनाने काम्यकर्मांचा त्याग व कर्म फळांचा मनाने त्याग करून सर्वसामान्य मनुष्य संन्यासी होतो)

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिण: ।

यज्ञदानतप:कर्म न त्याज्यमिति चापरे ।।३।।

त्याज्यम्,दोषवत्,इति,एकं,कर्म,प्राहु,मनीषिण: ।

यज्ञदानतप:,कर्म,न,त्याज्यम्,ईति,च,अपरे ।।३।।

बरेच विव्दान असे समजतात कि कर्म-फक्त दोषयुक्त आहे.त्यामुळे ते त्यागण्यास योग्य आहे.दुसरे विव्दान म्हणतात कि यज्ञ,दान,तपरूप कर्म ह्यांचा त्याग करणे योग्य नाही.

निश्चयं श्रृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।

त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविध: संम्प्रकीर्तित: ।।४।।

निश्चयम्,श्रृणु,मे,तत्र,त्यागे,भरतसत्तम ।

त्याग,हि,पुरुषव्याघ्र,त्रिविध:,संप्रकीर्तित: ।।४।।

स्त्री पुत्र धन ह्या प्रिय वस्तु तसेच रोग-संकटादि निवृत्तिसाठी केलेल्या यज्ञ,तप व उपासना आदिकर्म हे "***काम्य कर्म***" आहे,ईश्र्वरभक्ति,देवतापूजन,मातापिता गुरुजनांची सेवा तसेच यज्ञ,दान,तप तसेच वर्णाश्रम धर्म ह्या जीवनातील अजीविकेसाठी केलेल्या कामना रहित कर्मांचा त्याग हाच सर्व कर्मांचा त्याग ह्यास "***सर्व कर्म फळांचा त्याग***" म्हणतात.

हे भरतश्रेष्ठ ! ह्या दोन्हीमध्ये प्रथम त्यागाच्या विषयी तु माझा निश्र्चय ऐक! कारण त्याग सात्विक,राजस व तामस ह्या भेदांनी तीनही प्रकारचा आहे असे समजतात.

यज्ञदानतप:कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।

यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ।।५।।

यज्ञदानतप:कर्म,न,त्याज्यम्,कार्यम,एव,तत् ।

यज्ञ:,दानम्,तप:,च,एव,पावनानि,मनीषिणाम् ।।५।।

यज्ञ,दान व तप कर्म त्याग करण्यायोग्य नाहित,खरेतर ती आवश्यक कर्मे आहेत,कारण हि तीनही कर्मे बुध्दिमान पुरुषांना पवित्र करतात.

एतान्यपि तु कर्माणि सङ्गंत्यक्त्वा फलानि च ।

कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ।।६।।

एतानि,अपि,तु,कर्माणि,सङ्गम्,त्यक्त्वा,फलानि,च ।

कर्तव्यानी,इति,मे,पार्थ,निश्चितम्,मतम उत्तमम् ।।६।।

ह्यासाठी हे पार्थ ! यज्ञ,दान,तपरूप कर्मांचा तसेच इतर सुध्दा संपूर्णकर्मांचा आसक्ति व फळ ह्यांचा त्याग करणे,हे करणे आवश्यक आहे.असे माझे निश्र्चयात्मक असे उत्तम मत आहे.

नियतस्य तु संन्यास: कर्मणो नोपपद्दयते ।

मोहात्तस्य परित्यागस्तामस: परिकीर्तित: ।।७।।

नियतस्य,तु,संन्यास:,कर्मण:,उपपद्दयते ।

मोहात्,तस्य,परित्याग:,तामस:,परिकीर्तित: ।।७।।

प्रकृतिनुसार शास्त्रविधीने नियत केलेले वर्णाश्रम धर्म व सामान्य धर्मरूप स्वाभाविक कर्म आहे,त्यासच स्वधर्म,सहजधर्म,स्वकर्म,नियतकर्म स्वभावजकर्म स्वभावनियतकर्म इत्यादि नामांनी संबोधले जाते.

(निषिध्द व काम्य कर्मांचा स्वरूपाने त्याग करणे उचित आहे) नियत कर्मांचा त्याग स्वरूपाने करणे उचित नाही,म्हणून मोहाने त्याचा त्याग करणे हा तामस त्याग समजला जातो.

दु:खमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।

स कृत्वा राजसं त्याग नैव त्यागफलं लभेत् ।।८।।

दु:खम्,इति,एव,यत्,कर्म,कायक्लेशभयात्,त्यजेत् ।

स:,कृत्वा,राजसम्,त्यागम्,न,एव,त्यागफलम्,लभेत् ।।८।।

जे कर्म आहे ते सर्व दु:खरूप आहे असे समजून जर कोणी शारीरिक क्लेशाच्या भयाने कर्तव्य कर्मांचा त्याग करेल,तर असा राजस त्याग करून त्यागाचे कोठलेहि फळ प्राप्त होत नाही.

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।

सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्याग: सात्विको मत: ।।९।।

कार्यम्,इति,एव,यत्,कर्म,नियतम्,क्रियते,अर्जुन ।

सङ्गम्,त्यक्त्वा,फलम्,च,एव,स:,त्याग:,सात्विक:,मत: ।।९।।

हे अर्जुन ! जे शास्त्रविहित कर्म करणे,कर्तव्य आहे,ह्या भावाने आसक्ति व फळ ह्याचा त्याग करून केले जाते ह्यासच सात्विक त्याग असे समजले जाते.

न व्देष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।

त्यागी सत्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशय: ।।१०।।

न व्देष्टि,अकुशलम्,कर्म,कुशले,न,अनुषज्जत ।

त्यागी,सत्वसमाविष्ट:,मेधावी,छिन्नसंशय: ।।१०।।

शुध्द सत्वगुणांनी आसक्त असा पुरुष संशयरहित,बुध्दीमान व सच्चा त्यागी आहे जो अकुशल कर्मात व्देष करत नाही व कुशल कर्मात आसक्त होत नाही.

न हि देहभूता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषत: ।

यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ।।११।।

न,हि,देहभूता,शक्यम्,त्यक्तुम्,कर्माणि,अशेषत: ।

य:,तु,कर्मफलत्यागी,स:,त्यागी,इति,अभिधीयते ।।११।।

शरीरधारी व्दांरा संपूर्णपणे सर्व कर्माचा त्याग केला जाणे शक्य नाही म्हणून जो कर्मफळाचा त्याग करतो,तोच त्यागी आहे असे समजले जाते.

अनिष्यमीष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मण: फलम् ।

भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ।।१२।।

अनिष्टम्,इष्टम्,मिश्रम्,च,त्रिविधम्,कर्मण:,फलम् ।

भवति,अत्यागिनाम्,प्रेत्य,न,तु,संन्यासिनाम्,क्वचित् ।।१२।।

कर्माफळाचा त्याग न करणाऱ्यांसाठी चांगले,वाईट अथवा मिश्र प्रकारचे फळ मृत्युच्या पश्र्चात मिळते,परंतु कर्मफळाचा त्याग करणाऱ्यांसाठी कर्माचे फळ हे कोणत्याही काळी नसते.

पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।

सांङ्ख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ।।१३।।

पञ्च,एतानि,महाबाहो,कारणानि,निबोध,मे ।

सांख्ये,कृतान्ते,प्रोक्तानि, सिध्दये,सर्वकर्मणाम् ।।१३।।

हे महाबाहो ! सांख्यशास्त्रात संपूर्ण कर्मांच्या सिध्दिच्या कर्माचा अंत करण्यासाठी पाच उपाय सांगितले आहेत,ते तु माझ्याकडून निट समजून घे.

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।

विविधाश्च पृथक्चेष्टा दैव चैवात्र पञ्चमम् ।।१४।।

अधिष्ठानम्,तथा,कर्ता,करणम्,च,पृथग्विधम् ।

विविधा,च,पृथक,चेष्टा:,दैवम्,च,एव,अत्र,पञ्चमम् ।।१४।।

अधिष्ठान - ज्याच्या आश्रयाने कर्म केले जाते. , करण - ज्या ज्या इंद्रियादिक साधनांनी कर्म केले जाते,दैव - पूर्वकृत शुभाशुभ कार्मांचा संस्कार,सत्सङ्ग व शास्त्राचा अभ्यास ह्याने बुद्धि शुद्ध होते जो हे करत नाही त्याही बुद्धि अशुध्द आहे असे समजावे.

कर्मसिद्धीत अधिष्ठान व कर्ता,तसेच भिन्न भिन्न प्रकारचे करण व  विभिन्न चेष्टा (क्रिया), प्राणादिकांचे विभिन्न व्यापार आणि दैव अर्थात अदृष्ट अश्या प्रकारचे भिन्न भिन्न करण आहेत.

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नर: ।

न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतव: ।।१५।।

शरीरवाङ्मनोभि,यत,कर्म,प्रारभते,नर: ।

न्याय्यम्,वा,विपरीतम्,वा,पञ्च,एते,तस्य,हेतव: ।।१५।।

मनुष्य मन,वाणी व शरीराने शास्त्रानुकुल अथवा विपरीत जे कर्म करतो त्याची हि पाच कारणे आहेत.

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु य: ।

पश्यत्यकृतबुध्दित्वान्न स पश्यति दुर्मति: ।।१६।।

तत्र,एवम्,सति,कर्तारम्,आत्मनाम्,केवलम्,तु य: ।

पश्यति,अकृतबुध्दित्वात्,न,स:,पश्यति,दुर्मति: ।।१६।।

परंतु असे असून सुध्दा जो मनुष्य अशुध्द बुध्दि असल्याकारणामुळे त्या विषयांत केवळ शुध्दस्वरूप आत्म्यास कर्ता समजतो तो मलीन बुध्दिचा अज्ञानी यथार्थ (रहस्य) समजत नाही.

यस्य नाहङ्कृतो भावो बुध्दिर्यस्य न लिप्यते ।

हत्वापि स इमाँल्लोकान्त हन्ति न निबध्यते ।।१७।।

यस्य,न,अहंकृत,भाव:,बुध्दि:,यस्य,न,लिप्यते ।

हत्वा,अपि,स:,इमान्,लोकान्,न,हन्ति,न निबध्यते ।।१७।।

स्वार्थ रहित संसार हितासाठी केलेल्या त्या पुरुषाच्या शरीर व इंद्रियाव्दारे केलेली क्रिया चुकीची वाटली तरी ती त्यास बाध्य होत नाही.

ज्या पुरुषाच्या अंतःकरणात "मी कर्ता आहे" असा भाव नाही तसेच ज्याची बुध्दि संसारिक गोष्टींनी लिंपीत होत नाही,तो पुरुष सर्वांस मारून हि वास्तविक मारत नाही व पापाने बांधला जात नाही.

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।

करणं कर्म कर्तेति त्रिविध: कर्मसङ्ग्रह: ।।१८।।

ज्ञानम्,ज्ञेयम्,परिज्ञाता,त्रिविधा,कर्मचोदना ।

करणम्,कर्म,कर्ता,इति,त्रिविध:,कर्मसंगह: ।।१८।।

ज्ञाता,ज्ञान,ज्ञेय हे तीन प्रकार कर्मप्रेरणेचे आहेत व कर्ता,करण तथा क्रिया हा तीन प्रकारचा कर्म संग्रह आहे.

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदत: ।

प्रोच्यते गुणसङ्ख्याने यथावच्छृणु तान्यपि ।।१९।।

ज्ञानम्,कर्म,च,कर्ता,च,त्रिधा,एव,गुणभेदत: ।

प्रोच्यते,गुणसङ्ख्याने,यथावत्,शृणु,तानि,अपि ।।१९।।

जाणणारा "कर्ता",ज्या व्दारे जाणणे ते "ज्ञान",जाणण्यास येणारी वस्तु "ज्ञेय",कर्म करणारा "कर्ता",ज्या साधनांनी कर्म केले जाते ते "करण" व त्यासाठीची केलेले कर्म "क्रिया"

गुणांची संख्या करणाऱ्या शास्त्रात ज्ञान व कर्म तथा गुणांचा भेद तीन प्रकारचा सांगितला गेला आहे,तो तु माझ्या कडून नीट समजून घे.

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।

अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विध्दि सात्विकम् ।।२०।।

सर्वभूतेषु,येनं,एकम्,भावम्,अव्ययम्,ईक्षते ।

अविभक्तम्,विभक्तेषु,तत्,ज्ञानम्,विध्दि,सात्विकम् ।।२०।।

ज्या ज्ञानाने मनुष्य पृथक-पृथक (विभिन्न) सर्व भूतात एक अविनाशी परमात्मा विभागरहित सम-भावाने पाहतो,त्या ज्ञानास तु सात्विक ज्ञान समज.

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।

वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विध्दि राजसम् ।।२१।।

पृथक्त्वेन,तु,यत्,ज्ञानम्,नानाभावान्,पृथग्विधान् ।

वेत्ति,सर्वेषु,भूतेषु,तत्,ज्ञानम्,विध्दि,राजसम् ।।२१।।

परंतु जे ज्ञान अर्थात ज्या ज्ञानाव्दांरा मनुष्य संपूर्ण भूतात भिन्न-भिन्न प्रकारच्या नाना-भावास अलग-अलग प्रकाराने जाणतो,त्या ज्ञानास तु राजस ज्ञान असे समज.

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।

अतत्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ।।२२।।

यत्,तु,कृत्स्नवत्,एकस्मिन्,कार्ये,सक्तम् अहैतुकम् ।

अतत्वार्थवत्,अल्पम्,च,तत्,त्तामसम्,उदाहृतम् ।।२२।।

परंतु जे ज्ञान एका कार्यरूप शरीरातसुध्दा संपूर्णांप्रमाणे (आसक्त) सदृश आहे. तसेच जे युक्तीरहित,तात्विक अर्थ रहित व तृच्छ आहेत त्यास तामस असे म्हंटले आहे.

नियतं सग्ङरहितमरागव्देषत: कृतम ।

अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ।।२३।।

नियतम्,सग्ङरहितम्,अरागव्देषत:,कृतम ।

अफलप्रेप्सुना,कर्म,यत्,तत्,सात्विकम,उच्यते ।।२३।।

जे कर्म शास्त्रविधीने नियत केले आहे व कर्तेपणाच्या अभिमान रहित आहे,तसेच फळाची आशा न करणाऱ्या पुरुषाकडून राग व्देषरहित केले जाते,त्यास सात्विक असे म्हंटले जाते.

यत्तु कामेप्सुना कर्म साहक्ङारेण वा पुन: ।

क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ।।२४।।

यत्तु,कामेप्सुना,कर्म,साहंकारेण,वा,पुन: ।

क्रियते,बहुलायासम्,तत्,राजसम्,उदाहृतम् ।।२४।।

पण जे कर्म बऱ्याच परिश्रमाने युक्त असते,तसेच भोगाची इच्छा करणाऱ्या वा अहंकारयुक्त पुरुषाकडून केले जाते,त्यास राजस कर्म असे म्हणतात.

अनुबन्धं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ।

मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ।।२५।।

अनुबन्धम्,क्षयम्,हिंसाम्,अनवेक्ष्य,च,पौरुषम् ।

मोहात्,आरभ्यते,कर्म,यत्,तत्,तामसम्,उच्यते ।।२५।।

जे कर्म परिणाम,हानि,हिंसा व सामर्थ्य ह्याचा विचार न करता केवल अज्ञानाने आरंभ केले जाते,त्यास तामस कर्म असे म्हणतात.

मुक्तसग्ङोऽनहंवादी धृत्युत्साहससमन्वित: ।

सिध्दयसिध्दयोनिर्विकार: कर्ता सात्विक उच्यते ।।२६।।

मुक्तसङ्ग:,अनहंवादी,धृत्युत्साहससमन्वित: ।

सिध्द्यसिध्द्यो:,निर्विकार:,कर्ता,सात्विक:,उच्यते ।।२६।।

जो कर्ता रंगरहित,अहंकाराचे वचन न बोलणारा,धैर्य व उत्साह ह्यांनी युक्त तथा कार्य सिध्द होणे वा न होणे ह्यात हर्ष-शोकादि विकार रहित आहे,त्यास सात्विक असे म्हंटले आहे.

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचि: ।

हर्षशोकान्वित: कर्ता राजस: परिकीर्तित: ।।२७।।

रागी कर्मफलप्रेप्सु:,लुब्ध:,हिंसात्मक:अशुचि: ।

हर्षशोकान्वित:,कर्ता,राजस:,परिकीर्तित: ।।२७।।

जो कर्ता आसक्तीने युक्त,कर्म फळाची आशा करणारा व लोभी आहे तसेच दुसऱ्यांना कष्ट देणाऱ्या स्वभावाचा,अशुध्द आचरण व हर्ष-शोक ह्यांनी लिप्त आहे,त्यास राजस असे समजले जाते.

अयुक्त: प्राकृत: स्तब्ध: शठो नैष्कृतिकोऽलस: ।

विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ।।२८।।

अयुक्त:,प्राकृत:,स्तब्ध:,शठ:,नैष्कृतिक:अलस: ।

विषादी,दीर्घसूत्री,च,कर्ता,तामस:,उच्यते ।।२८।।

जो कर्ता अयुक्त,शिक्षा रहित,घमेंडी,धूर्त व दुसऱ्याच्या जीविकेचा नाश करणारा,तसेच शोक करणारा आहे,आळशी व दीर्घसूत्री (साधारण कार्य नंतर करू असे मानणारा) आहे त्यास तामसी असे समजले जाते.

बुध्दैर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं श्रृणु ।

प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय ।।२९।।

बुध्दे,भेदम्,धृते,च,एव,गुणत:,स्त्रिविधम्,शृणु ।

प्रोच्यमानम्,अशेषेण,पृथक्त्वेन,धनंजय ।।२९।।

हे धनंजय ! आता तु बुध्दीचा व धृतिचा सुध्दा गुणांनुसार तीन प्रकारचा भेद माझ्याकडून संपूर्णपणे विभागपूर्वक सांगतो ते ऐक.

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।

बन्धं मोक्षं च या वेत्ति बुध्दि: सा पार्थ सात्विकी ।।३०।।

प्रवृत्तिम्,च,निवृत्तिम्,च,कार्याकार्ये,भयाभये ।

बन्धम्,मोक्षम्,च,या,वेत्ति,बुध्दि:,सा,पार्थ,सात्विकी ।।३०।।

हे पार्थ! बुध्दी प्रवृत्तिमार्ग (गृहस्थाश्रमात केवळ लोकशिक्षेसाठी कार्य) व निवृत्तीमार्गास (देहाभिमान सोडून सच्चिदानन्द परमात्म्यात स्थित असलेला ) कर्तव्य व अकर्तव्य,भय व अभय तथा बंधन व मोक्ष ह्यास यथार्थपणे जाणते,ती बुध्दी सात्विक आहे.

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।

अयथावत्प्रजानाति बुध्दि: सा पार्थ राजसी ।।३१।।

यया,धर्मम्,अधर्मम्,च,कार्यम्,च,अकार्यम,एव,च ।

अयथावत्,प्रजानाति,बुध्दि:,सा,पार्थ,राजसी ।।३१।।

अशी बुध्दी राजसी आहे जी धर्म व अधर्म तथा कर्तव्य व अकर्तव्य ह्यास यथार्थपणे जाणत नाही,त्यास राजसी बुध्दी असे समजले जाते.

अधर्म धर्ममिति या मन्यते तमसावृता ।

सर्वार्थान्विपरीतांश्च बुध्दि: सा पार्थ तामसी ।।३२।।

अधर्मम्,धर्मम्,ईति,या,मन्यते,तमसा,आवृता ।

सर्वार्थान्,विपरीतान्,च,बुध्दि:,सा,पार्थ,तामसी ।।३२।।

हे अर्जुन ! तमोगुणांनी घेरलेली बुध्दी अधर्मास सुध्दा “हा धर्म आहे” असे मानते,तसेच अन्य त्याप्रकारच्या अन्य संपूर्ण पदार्थासही विपरीत (असते एक व समजते दुसरे) समजते अशी बुध्दी तामसी समजली जाते.

धृत्या यया धारयते मन:प्राणेन्द्रियक्रिया: ।

योगेनाव्यचारिण्या धृति: सा पार्थ सात्विकी ।।३३।।

धृत्या,यया,धारयते,मन:प्राणेन्द्रियक्रिया: ।

योगेन,अव्यभिचारिण्या,धृति:,सा पार्थ,सात्विकी ।।३३।।

हे पार्थ ! ज्या अव्याभिचारिणी धारणशक्तीने मनुष्य ध्यानयोगाने मन,प्राण व इंद्रिय ह्यांची क्रिया ह्यांना धारण करतो,अशी धृति सात्विक आहे.

यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।

प्रसग्डेन फलाकाङ्क्षी धृति: सा पार्थ राजसी ।।३४।।

यया,तु,धर्मकामार्थान्,धृत्या,धारयते,अर्जुन ।

प्रसग्डेन,फलाकाङ्क्षी,धृति:,सा,पार्थ,राजसी ।।३४।।

हे अर्जुन ! फळाची इच्छा असणारा मनुष्य ज्या धारण शक्तीने अत्यंत आसक्तीने धर्म,अर्थ व काम धारण करतो, ति वृत्ति राजसी आहे.

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।

न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ।।३५।।

यया,स्वप्नम्,भयम्,शोकम्,विषादम्,मदमेव,च ।

न,विमुञ्चति,दुर्मेधाः,धृतिः,सा,पार्थ,तामसी ।।३५।।

हे पार्थ दुष्ट बुध्दीचा मनुष्य ज्या धारणशक्तीने निद्रा,भय,चिन्ता व दुःख तथा उन्मतत्ता सुध्दा सोडत नाही अर्थात धारण करून ठेवतो,अशी धारणाशक्ती तामसी आहे,

सुखं त्विदानीं त्रिविधं श्रृणु मे भरतर्षभ ।

अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ।।३६।।

सुखम्,तु,इदानीम्,त्रिविधम्,शृणु,मे,भरतर्षभ ।

अभ्यासात,रमते,यत्र,दुःखान्तम्,च,निगच्छति ।।३६।।

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।

तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुध्दिप्रसादजम् ।।३७।।

यत्,तत्,अग्रे,विषम्,इव,परिणामे,अमृतोपमम् ।

तत्,सुखम्,सात्विकम्,प्रोक्तम,आत्मबुध्दिप्रसादजम् ।।३७।।

नावडीचा विषय प्रथम विषासारखा वाटतो,बळ,वीर्य,बुध्दि,धन,उत्साह व परलोक ह्याचा नाश करणारे विषय व इंद्रिये ह्यातील सुख परिणामी विषासारखे आहे.

आता तीनही प्रकारची सुखे माझ्याकडून ऐक ,ज्या सुखात मनुष्य ध्यान व सेवादि अभ्यासाने रममाण होतो व ज्या दुःखांच्या अंतास (दुःखाचा अन्त करतो) प्राप्त करतो,ते असे सुख आहे जे आरंभ काळात विषासारखे वाटते,परंतु परिणामाने अमृततुल्य आहे,म्हणून परमात्मा विषयक बुध्दीने उत्पन्न होणारे सुख सात्विक आहे.

विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।

परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ।।३८।।

विषयेन्द्रियसंयोगात्,यत्,तत्,अग्रे,अमृतोपमम् ।

परिणाम:,विषम्,इव,तत्,सुखम्,राजसम्,स्मृतम् ।।३८।।

जे सुख विषय व इंद्रिय ह्यांच्या संयोगाने होते,जे प्रथम अमृततुल्य प्रतीत होते पण नंतर परिणामांनी विषासारखे वाटते ह्यासाठी ते सुख राजस समजले जाते.

यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मन: ।

निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ।।३९।।

यत्,अग्रे,च,अनुबन्धे,च,सुखम्,मोहनम्,आत्मन: ।

निद्रालस्यप्रमादोत्थम्,तत्,तामसम्,उमुदाहृतम् ।।३९।।

जे सुख भोगकाळात तसेच परिणामात सुध्दा आत्म्यास मोहित करते,तसेच निद्रा,आळस व प्रमादाने उत्पन्न होते त्यास तामस सुख असे म्हणतात.

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुन: ।

सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभि: स्यात्त्रिभिर्गुणै: ।।४०।।

न,तत्,अस्ति,पृथिव्याम्,वा,दिवि,देवेषु,वा,पुन: ।

सत्त्वम्,प्रकृतिजै:,मुक्तम्,यत्,एभि:,स्यात्,त्रिभि:,गुणै: ।।४०।।

पृथ्वी ते आकाश अथवा देवता किंवा आणि कोठे असे कुठलेच सत्व (तत्व) नाही,जे प्रकृतीने उत्पन्न ह्या तीन गुणांरहित आहे.

ब्राह्मणक्षत्रियविशां शुद्राणां च परन्तप: ।

कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणै: ।।४१।।

ब्राह्मणक्षत्रियविशाम्,शुद्राणाम्,च,परतप, ।

कर्माणि,प्रविभक्तानि,स्वभावप्रभवै:,गुणै ।।४१।।

हे परंतप ! ब्राह्मण,क्षत्रिय व वैश्य तसेच शूद्र आपल्या कर्म स्वभावाने उत्पन्न गुणांव्दारा विभक्त केले गेले आहेत.

शमो दमस्तप: शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।

ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।।४२।।

शम:,दम:,तप:,शौचम्,क्षान्ति:,आर्जवम,एव,च ।

ज्ञानम्,विज्ञानम्,आस्तिक्यम्,ब्रह्मकर्म,स्वभावजम् ।।४२।।

अंतःकरणाचा निग्रह करणे,इंद्रियांचे दमन करणे,धर्मपालनासाठी कष्ट सहन करणे,बाहेरून आतून शुध्द राहणे,दुसऱ्याच्या अपराधास क्षमा करणे,मन,इंद्रिय व परलोक आदिमध्ये श्रध्दा ठेवणे,वेद शास्रांचे अध्ययन-अध्यापन करणे व परमात्म तत्वाचा अनुभव करणे,हे सर्वच्या सर्व ब्राह्मण स्वभावाचे कर्म आहे.

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युध्दे चाप्यपलायनम ।

दानमीश्र्वरभावश्र्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ।।४३।।

शौर्यम्,तेज:,धृति:,दाक्ष्यम्,युध्दे,च,अपि,अपलायनम् ।

दानम्,ईश्र्वरभाव:,च,क्षात्रम्,कर्म,स्वभावजम् ।।४३।।

शूरवीरता,तेज,धैर्य,चतुरता व युध्दात न पळून जाणे,दान देणे व स्वाभिमान हे सर्वच्या सर्व क्षत्रिय स्वभावाची कर्मे आहेत.

कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।

परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ।।४४।।

कृषिगौरक्ष्यवाणिज्यम्,वैश्यकर्म,स्वभावजम् ।

परिचर्यात्मकम्,कर्म,शूद्रस्य,अपि,स्वभावजम् ।।४४।।

शेती,गोपालन व क्रय-विक्रेयरूप सत्य व्यवहार हे वैश्यांचे स्वभाविक कर्म आहे तसेच सर्व वर्णाची सेवा करणे, हे शूद्रांचे स्वाभाविक कर्म आहे.

स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिध्दि लभते नर: ।

स्वकर्मनिरत: सिध्दिं यथा विन्दति तच्छृणु ।।४५।।

स्वे,स्वे,कर्मणि,यभिरत:,संसिध्दिम्,लभते,नर: ।

स्वकर्मनिरत:,सिध्दिम्,यथा,विन्दति,तत्,शृणु ।।४५।।

आपापल्या कर्मात तत्पर असलेला मनुष्य भगवत प्राप्तीरूप परम-सिध्दीस प्राप्त होतो.आपल्या स्वाभाविक कर्मात व्यस्त माणूस ज्या प्रकारांनी कर्म करून परम सिध्दीस प्राप्त करतो,त्याचा विधि तू ऐक.

यत: प्रवृत्तिर्भूतनां येन सर्वमिदं ततम् ।

स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिध्दिं विन्दति मानव: ।।४६।।

यत:,प्रवृत्ति:,भूतनाम्,येन,सर्वम्,इदम्,ततम् ।

स्वकर्मणा,तम्,अभ्यर्च्य,सिध्दिम्,विन्दति,मानव: ।।४६।।

ज्या परमेश्र्वरापासून संपूर्ण प्राण्यांची (प्रवृत्ती) उत्पत्ती झाली आहे व ज्याने हे सर्व जगत व्याप्त आहे,त्या परमेश्र्वराची आपल्या स्वाभाविक कर्मांनी पूजा करून मनुष्य परम सिध्दीस प्राप्त होतो (परमसिध्दि प्राप्त करतो.)

श्रेयान्स्वधर्मो विगुण: परधर्मात्स्वनुष्ठितात् ।

स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।।४७।।

श्रेयान्,स्वधर्म,विगुण:,परधर्मात्,स्वनुष्ठितात् ।

स्वभावनियतम्,कर्म,कुर्वन्,न,आप्नोति,किल्बिषम् ।।४७।।

(कुंडलिनी जागृती हि सहज व्हावी,शक्तीपात व इतर मार्गाने पिंडधर्मास प्रतिकूल पध्दतिने करणे योग्य नाही)

चांगल्या प्रकारचे आचरण करून व दुसऱ्याच्या धर्म गुणरहित (विगुणात्मक-कमी वाटला तरी) असून सुध्दा आपला धर्म श्रेष्ठ आहे,कारण स्वभावाने नियमन केलेले स्वधर्मरूप कर्म करताना मनुष्य पाप रहित राहतो. (स्वभावाने नियत केलेले कर्म मन,वाणी व शरीराने परमेश्र्वरासाठीच करणे म्हणजे

कर्माने परमेश्वराची आराधना करणे होय.) ज्याप्रमाणे पतीव्रता स्त्री पतीच्या आज्ञेनुसार मन,वाणी व शरीराने कर्म करते,

सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यज्येत् ।

सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृता: ।।४८।।

सहजम्,कर्म,कौन्तेय,सदोषम्,अपि,न,त्यज्येत् ।

सर्वारम्भा:,हि,दोषेण,धूमेन,अग्नि:,इव,आवृता: ।।४८।।

प्रकृतीनुसार शास्त्रविधीने नियुक्त केलेले वर्णाश्रम (पिंडधर्मानुसार) धर्मकर्म हेच स्वधर्म,सहजकर्म,स्वकर्म,नियतकर्म,स्वभावकर्म,स्वभावनियतकर्म ह्या नावांनी सांगितले आहे.

म्हणून हे कुंतीपुत्र ! दोषयुक्त असून सुध्दा स्वभावता सहज कर्माचा त्याग करणे योग्य नाही कारण अग्नी आहे तेथे धूर आहेच,ह्या नियमाने सर्व कर्म कोणत्या ना कोणत्या कारणांनी दोष युक्त आहेत.

असक्तबुध्दि: सर्वत्र जितात्मा विगतस्पृह: ।

नैष्कर्म्यसिध्दिं परमां सन्न्यासेनाधिगच्छति ।।४९।।

असक्तबुध्दि:,सर्वत्र,जितात्मा,विगतस्पृह: ।

नैष्कर्म्यसिध्दिम्,परमाम्,सन्न्यासेन,अधिगच्छति ।।४९।।

सर्वत्र आसक्तीरहित बुध्दी असणारा,स्पृहारहित (नि:स्पृह) व अंतःकरण जिंकलेला पुरुष सांख्ययोगाने त्या परम नैष्कर्म्य-सिध्दीस प्राप्त करतो.

सिध्दिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।

समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ।।५०।।

सिध्दिम्,प्राप्त:,यथा,ब्रह्म,तथा,अप्नोति,निबोध,मे ।

समासेन,एव,कौन्तेय,निष्ठा,ज्ञानस्य,या,परा ।।५०।।

जी ज्ञानयोगाची पराकाष्ठा आहे,त्या नैष्कर्म सिध्दीस प्राप्त करून मनुष्य ब्रह्मप्राप्ती करून घेतो.त्या प्रकारास हे कुंतीपुत्र ! तु संक्षेपात समजून घे.

बुध्दया विशुध्दया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।

शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागव्देषौ व्युदस्य च ।।५१।।

बुध्दया,विशुध्दया,युक्त:,धृत्या,आत्मानम्,नियम्य,च ।

शब्दादीन्,विषयान्,त्यक्त्वा,रागव्देषौ,व्युदस्य,च ।।५१।।

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानस: ।

ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रित: ।।५२।।

विविक्तसेवी,लघ्वाशी,यतवाक्कायमानस: ।

ध्यानयोगपर:,नित्यम्,वैराग्यम्,समुपाश्रित: ।।५२।।

अहक्ङारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।

विमुच्य निर्मम: शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ।।५३।।

अहक्ङारम्,बलम्,दपम्,कामम्,क्रोधम्,परिग्रहम् ।

विमुच्य,निर्मम:,शान्त:,ब्रह्मभूयाय,कल्पते ।।५३।।

विशुध्द बुध्दीने युक्त तसेच (चित्ताचा संयम असलेला) हलका,सात्विक व नियमित भोजन करणारा,शब्दादि विषयांचा त्याग करणारा,एकान्त व शुध्द,प्रीती व व्देषाचा त्याग करणारा,मिताहारी,सात्विक धारणाशक्तीने अंत:करण व इंद्रिये ह्यांचा संयम करणारा,मन वाणी व शरीरास वश करणारा,राग-व्देष सर्वथा नष्ट करून (नित्य ध्यानयुक्त) दृढ वैराग्याचा आश्रय करणारा ,तसेच अहंकार,बल,घमेंड,काम,क्रोध व परिग्रह ह्यांचा त्याग करून नित्य ध्यान योगात परायण रहाणारा,ममत्वरहित व शान्तियुक्त पुरुष सच्चिदानन्द ब्रह्मात अभिन्न भावाने स्थिर होण्यास योग्य आहे,

ब्रह्मभूत: प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।

सम: सर्वेषु भूतेषु मभ्दक्तिं लभते पराम् ।।५४।।

ब्रह्मभूत:,प्रसन्नात्मा,न,शोचति,न,काङ्क्षति ।

सम:,सर्वेषु,भूतेषु,मद्भक्तिम्,लभते,पराम् ।।५४।।

असा तो योगीपुरुष सच्चीदानंद ब्रह्मात एकीभावाने स्थित,प्रसन्न मनाचा असतो,जो कशासाठीही शोक करत नाही ना कश्याची आकांक्षा ठेवतो,असा समस्त प्राण्यात समभाव असणारा योगी माझ्या परमअवस्थेस प्राप्त करतो (पराभक्तीस प्राप्त होतो)

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्र्चास्मि तत्वत: ।

ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ।।५५।।

भक्त्या,माम्,अभिजानाति,यावान्,य:,च,अस्मि,तत्वत: ।

तत:,माम्,तत्वत:,ज्ञात्वा,विशत,तदनन्तरम् ।।५५।।

या पराभक्तीस (तत्वज्ञानाची पराकाष्ठा प्राप्त झाल्यावर काही जाणणे बाकी राहात नाही तिलाच नैष्कर्म सिध्दि,परमसिध्दि,ज्ञानाची पराकाष्ठा,परमनैष्कर्म असे म्हणतातइत्यादि नावाने सांगितले आहे.) प्राप्त झालेला योगी माझे यथार्थ ज्ञान जाणतो (मला यथार्थपणे जाणतो) व त्या तत्वात प्रवेश करतो.(माझ्या सारखा होतो)

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रय: ।

मत्पसादादवाप्नोति शाश्र्वतं पदमव्ययम् ।।५६।।

सर्वकर्माणि,अपि,सदा,कुर्वाण:,पदम्,अव्ययम् ।

मत्पसादात्,अवाप्नोति,शाश्र्वतम्,पदम्,अव्ययम् ।।५६।।

माझ्यासारखा झालेला तो कर्मयोगी,सर्व कर्म नेहमी करत असून माझ्या कृपेने अविनाशी व परमपदास जातो.

चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य मत्पर: ।

बुध्दियोगमुपाश्रित्य मच्चित्त: सततं भव ।।५७।।

चेतसा,सर्वकर्माणि,मयि,सन्यस्य,मत्पर:, ।

बुध्दियोगम्,उपाश्रित्य,मच्चित्त:,सततम्,भव ।।५७।।

सर्व कर्म मनाने मला अर्पण करून तसेच समबुध्दी रूप योगाचा अवलंब करून माझ्या सारखा व निरंतर माझ्यात चित्त असलेला होतो.

मच्चित्त: सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।

अथ चेत्त्वमहक्ङारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ।।५८।।

मच्चित्त:,सर्वदुर्गाणि,मत्प्रसादात्,तरिष्यसि ।

अथ,चेत्,त्वम,अहक्ङारात्,श्रोष्यसि,विनङ्क्ष्यसि ।।५८।।

वरीलप्रमाणे चित्त ठेऊन तु माझ्या कृपेने सर्व संकटांवर मात करू शकशील (संकटे कष्ट रहित सहज पार करू शकशील) अन्यथा जर अहंकाराने माझ्या वचनांस न ऐकशील तर नष्ट अर्थात परमार्थ मार्गात भ्रष्ट होशील.

यदहक्ङारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।

मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।।५९।।

यत्,अहक्ङारम्,आश्रित्य,न,योत्स्य,इति,मन्यसे ।

मिथ्या,एष:,व्यवसाय:,ते,प्रकृति,स्त्वाम्,नियोक्ष्यति ।।५९।।

वृत्तीयुध्द करणे स्वभावधर्माने तुला अटळ आहे.

जर अहंकाराचा आश्रय घेऊन तु “मी युध्द करणार नाही” असे म्हणशील तर तुझा हा निश्चय मिथ्या आहे,कारण तुझा क्षत्रिय स्वभाव तुला तसे करण्यास जबरदस्तीने युध्दास भाग पाडील.

स्वभावजेन कौन्तेय निबध्द: स्वेन कर्मणा ।

कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ।।६०।।

स्वभावजेन,कौन्तेय,निबध्द:,स्वेन,कर्मणा ।

कर्तुंम्,न,इच्छासि,यत्,मोहात्,करिर्षसि,अवश:,अपि,तत् ।।६०।।

हे कुंतीपुत्र ! जे कर्म तु मोहवश करण्यास तयार नाहीस ते तु स्वभाविक कर्माने बांधला गेल्याने प्रकृतिवश करशील.

ईश्वर: सर्वभूतानां हृद्ब्येशेऽर्जुन तिष्ठति ।

भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारुढानि मायया ।।६१।।

ईश्वर:,सर्वभूतानाम्,हृद्देशे,अर्जुन,तिष्ठति, ।

भ्रामयन्,सर्वभूतानि,यन्त्रारुढानि,मायया ।।६१।।

हे ! मायापाश चिरून जाणाऱ्या अर्जुना ! शरीररूप यंत्रावर मायेने आरूढ होऊन सर्व जीवांना अंतर्यामी परमेश्वर त्यांच्या कर्मानुसार फिरवून सर्वांच्या हृदयात स्थित आहे.हे जगत एखाद्या यंत्रानुसार मायेने चालत आहे.परंतु मी प्रत्येकाच्या हृदयात स्थित आहे हे तु जाणून घे !

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।

तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ।।६२।।

तम,एव,शरणम्,गच्छ,सर्वभावेन,भारत ।

तत्प्रसादात्,पराम्,शान्तिम्,स्थानम्,प्राप्स्यसि,शाश्वतम् ।।६२।।

हे ! ज्ञानात रत असलेल्या भारता ! त्या परमअवस्थेस तु सर्व भावाने शरण जा कारण माझ्या परमात्मा प्रसादाने (प्र - “पुढे जाणारा”,साद - “जमा करणे”) तुला शान्ति व शाश्वत पद मिळेल.

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।

विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ।।६३।।

इति,ते,ज्ञानम्,अख्यातम्,गुह्यात्,गुह्यतरम्,मया ।

विमृश्य,एतत्,अशेषेण,यथा,इच्छसि,तथा,कुरु ।।६३।।

अशाप्रकारे गोपनीयात अतिगोपनीय ज्ञान मी तुला सांगितले,अश्या ह्या रहस्यमय ज्ञानाचे विचार-मंथन करून तुला जे योग्य वाटेल तसे कर.

सर्वगुह्यतमं भूय: श्रृणु मे परमं वच: ।

इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ।।६४।।

सर्वगुह्यतमम्,भूय:,शृणु,मे,परमम्,वच: ।

इष्ट,असि,मे,दृढम,ईति,तत:,वक्ष्यामि,ते,हितम् ।।६४।।

संपूर्ण गोपनियात अतिगोपनीय अश्या माझ्या परम रहस्ययुक्त वचनांस पुन्हा ऐक! तु मला प्रिय आहेस म्हणून परमहितकारक वचन मी तुला सांगतो.

मन्मना भव मभ्दक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।

मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।६५।।

मन्मना:,भव,मदभक्त:,मद्याजी,माम्,नमस्कुरु ।

मामम्,एव,एष्यासि,सत्यम्,ते,प्रतिजाने,प्रिय:असि,मे ।।६५।।

माझ्यात (परमात्म्यात) मन गुंतव.माझा भक्त हो.माझे भजन कर,मला वंदन कर.ज्याने तु मलाच येऊन मिळशील हे मी प्रतिज्ञापूर्वक सांगतो.

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।

अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच: ।।६६।।

सर्वधर्मान्,परित्यज्य,माम्,एकम्,शरणम्,व्रज ।

अहम्,त्वा,सर्वपापेभ्य:,मोक्षयिष्यामि,मा,शुच: ।।६६।।

सर्वप्रकारच्या (पिंड) धर्मांचा त्याग करून तु केवल मला (परमात्म्याला) शरण जा ! मी तुला सर्व पापांपासून मुक्त करेन. तु शोक करू नकोस.

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।

न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ।।६७।।

इदम्,ते,न्,अतपस्काय,न,अभक्ताय,कदाचन ।

न,च,अशुश्रूषवे,वाच्यम्,न,च,माम्,य:,अभ्यसूयति ।।६७।।

लज्जा,भय,मान,अभिमान व आसक्ति ह्याचा त्याग करून शरीर व संसारात अहंता,ममता रहित होऊन परमेश्र्वराचा आश्रय,परमगती व सर्वस्व समजणे तसेच अनन्य भावाने श्रध्दा,भक्ती व प्रेमपूर्वक निरंतर भगवंताचे नाम गुण प्रभाव व स्वरूप ह्याचे चिंतन करणे व असे करताना आज्ञेनुसार कर्तव्यकर्मांचे नि:स्वार्थभावाने केवळ परमेश्र्वरासाठी आचरण करणे.असे सर्व प्रकारे परमेश्र्वरासच “***शरण जाणे***” होय.

भक्ती - वेद शास्त्र व परमेश्र्वरात तसेच महात्मा व गुरुजनांत श्रध्दा प्रेम व पूज्य भाव ह्यासच भक्ती असे म्हणतात,

हा उपदेश तपरहित,भक्तिरहित व ऐकण्याची इच्छा नसेल त्यास सांगु नये,माझ्याकडे दोषदृष्टी असलेल्यास तर कधीच सांगु नये.

य इमं परमं गुह्यं मभ्दक्तेष्वभिधास्यति ।

भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशय: ।।६८।।

य,इमम्,परमम्,गुह्यम्,मदभक्तेषु,अभिधास्यति ।

भक्तिम्,मयि,पराम्,कृत्वा,माम्,एव,एष्यति,असंशयम्: ।।६८।।

हे ! परमगुह्य माझ्या भक्तांना जो सांगेल,तो मलाच येऊन मिळेल ह्यात संशय नाही.

न च तस्मान्मनुष्येषु कश्र्चिन्मे प्रियकृत्तम: ।

भविता न च मे तस्मादन्य: प्रियतरो भुवि ।।६९।।

न,च,तस्मात,मनुष्येषु,कश्र्चित्,मे,प्रियकृत्तम: ।

भविता,न,च,मे,तस्मात्,अन्य:,प्रियतर:,भुवि ।।६९।।

त्याच्याशिवाय पृथ्वीवर माझा दुसरा प्रिय भक्त नाही व होणार नाही,असे नि:संदेह समज.

अध्येष्यते च य इमं धर्म्यं सम्वादमावयो: ।

ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्ट: स्यामिति मे मति: ।।७०।।

अध्येष्यते,च,य:,इमम्,धर्म्यम्,संवादम्,आवयो: ।

ज्ञानयज्ञेन,तेन,अहम्,इष्ट:,स्याम्,इति,मे,मति: ।।७०।।

माझे असे मत आहे जो कोणी हि संवादरूप गीता ऐकेल,वाचेल त्याच्यामार्फत मी ज्ञान यज्ञाने पूजित होईन.

श्रध्दावाननसूयश्र्च श्रृणुयादपि यो नर: ।

सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ।।७१।।

श्रध्दावान्,अनूसूय:,च,शृणुयात्,अपि,य:,नर:,स:,अपि, ।

मुक्त:,शुभान्,लोकान्,प्राप्नुयात,पुण्यकर्मणाम् ।।७१।।

त्याचप्रमाणे ह्यात दोष न काढता जो कोणी हि गीता श्रध्देने ऐकेल तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शुभ-लोकात जाईल.

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।

कच्चिदज्ञानसम्मोह: प्रनष्टस्ते धनञ्जय ।।७२।।

कच्चित्,एतत्,श्रृतम्,पार्थ,त्वया,एकाग्रेण,चेतसा ।

कच्चित्,अज्ञानसम्मोह:,प्रनष्ट:,ते,धनंजय ।।७२।।

हे पार्थ ! काय तु हे एकाग्रपणे श्रवण केलेस ? व हे धनंजय ! काय तुझा अज्ञानजनित मोह नाहिसा झाला?

अर्जुन उवाच --अर्जुन उवाच

नष्टो मोह: स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।

स्थितोऽस्मि गतसन्देह: करिष्ये वचनं तव ।।७३।।

नष्ट:,मोह:,स्मृति,लब्धा,त त्वत्प्रसादात्,मया,अच्युत ।

स्थित:,अस्मि,गतसन्देह:,करिष्ये,वचनम्,तव ।।७३।।

अर्जुन म्हणाले ! हे अच्युत ! तुमच्या कृपेने माझा मोह नाहिसा झाला व मला स्मृतिप्राप्त झाली ! आता मी संशयरहित होऊन स्थिर आहे.आता मी आपल्या आज्ञेचे पालन करेन.

संजय उवाच -- संजय उवाच

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मन: ।

संवादमिमश्रौषमभ्दुतं रोमहर्षणम् ।।७४।।

इति,अहम्,वासुदेवस्य,पार्थस्य,च,महात्मन: ।

संवादम्,इमम्,अश्रौषम्,अभ्दुतम्,रोमहर्षणम् ।।७४।।

संजय म्हणाले,अशाप्रकारे मी श्रीवासुदेव व महात्मा अर्जुन ह्यांचा अद्‌भूत रहस्ययुक्त संवाद ऐकला.

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतग्दुह्यमहं परम् ।

योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयत: स्वयम् ।।७५।।

व्यासप्रसादात्,श्रृतवान,एतत्,गुह्यम्,अहम्,परम् ।

योगम्,योगेश्वरात,कृष्णात्,साक्षात्,कथयत:,स्वयम् ।।७५।।

श्रीव्यास कृपेने दिव्यदृष्टी मिळून मी हा परम गोपनीय योग अर्जुनास सांगताना स्वतः श्रीयोगीश्वर कृष्ण ह्यांच्याकडून स्वतः ऐकला.

राजन्संस्मृत्य संस्मृत्य सम्वादमिमम‌भ्दुतम् ।

केशवार्जुनयो: पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहु: ।।७६।।

राजन,सस्मृत्य,संस्मृत्य,संवादम्,इमम्,अदभुतम् ।

केशवार्जुनयो:,पुण्यम्,हृष्यामि,च,मुहुर्मुहु: ।।७६।।

हे राजन ! भगवान श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांचा रहस्ययुक्त,कल्याणकारी व अद्‌भुत संवाद पुन:पुन: स्मरण करून मी परत-परत हर्षित होत आहे.

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यभ्दतं हरे: ।

विस्मयो मे महान् राजन्हृष्यामि च पुन: पुन: ।।७७।।

तत्,च,संस्मृत्य,संस्मृत्य,रूपम्,अति,अदभूतम्,हरे: ।

विस्मय,मे,महान्,राजन्,हृष्यामि,च,पुन:,पुन: ।।७७।।

हे राजन ! श्रीहरींच्या अत्यंत विलक्षण रूपाचे पुनःपुन: स्मरण करून माझ्या चित्तास महान आश्चर्य होते व मी सारखा-सारखा हर्षित होतो.

यत्र योगेश्वर: कृष्णो यत्रपार्थो धनुर्धर: ।

तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।।७८।।

यत्र,योगेश्वर:,कृष्ण:,यत्र,पार्थ,धनुर्धर: ।

तत्र,श्री,विजय:,भूति,धृवा,नीति:,मति:,मम ।।७८।।

हे राजन ! जेथे योगेश्वर श्रीकृष्ण आहेत,जेथे गाण्डीव धनुष्यधारी धनुर्धर पार्थ आहे,तेथे विजय,विभूती व अचल निती आहे असे माझे मत आहे.

ॐ तत्सविति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टदशोऽध्याय: ।।१८।।